ज्ञहृत्। हृद्दर्पसर्पसर्पघ्नः सुकृताढ्यः कृतान्तकृत्॥ ' या श्लोकांत ( समाधि ) योगाच्या ठिकाणीं सर्पघ्नाचा म्ह० गरुडाचा अभेदारोप केला आहे. या रूपकाला, अंगरूपक ( म्ह० दर्पाच्या (अहंकाराच्या) ठायीं केलेला सर्पाचा अभेदारोप ) निमित्त[1] झालें आहे. ( अर्थात् हें अंगरूपक नसतें तर ' योगः गरुडः ' या मुख्य रूपकाची सिद्धि झाली नसती–तें मुख्य-रूपक असंबद्ध झालें असतें– ) म्हणून हें परंपरितरूपक होय.

एका उपमेयाच्या ठिकाणीं अनेक उपमानांचा अभेदारोप केल्यास मालोपमेप्रमाणें मालारूपक तयार होतें. याशिवाय सांगरूपकाचे 'समस्त-वस्तुविषय; एकदेशविवर्ति,' असे दोन, परंपरिताचे 'श्लिष्ट, अश्लिष्ट' इ. चार असे, या रूपकाचे अनेक प्रभेद काव्यप्रकाशकारांनीं सांगितले आहेत.

' तद्रूपकमभेदो य उपमानोपमेययोः ' ( का. प्र. ) असें या अलंकाराचें सामान्य लक्षण असून .' रूपयति = एकतां नयतीति रूपकम् ' अशी रूपक शब्दाची व्युत्पत्ति आहे. १–७८, १–८७, १–९४, १–११२, १–१२९, १–१३४, २–२९, २–३६, २–४१, २–५४, २–६५, २–६९, २–७४, ३–२८, ३–७६, ३८२.

---

( १ ) मुख आणि चंद्र यांचें आल्हादकत्वादि साम्य लोकप्रसिद्ध असून त्याच साम्याचें दार्ढ्य म्ह. आधिक्य दाखविण्याकरितां आपण त्यां-मध्यें अभेदारोप करूं शकतों. पण योग आणि गरुड यांमध्यें असें कोण-तेंच सादृश्य प्रसिद्ध नसल्यानें त्यांत एकदम अभेदारोप होऊं शकत नाहीं. तर अगोदर त्यांचें साम्य दाखवावें लागतें. हें साम्य दाखविण्याचें काम अंगरूपक करतें. अर्थात् त्यामुळें ' गरुड जसा सर्पाचा नाश करतो तसा हा समाधि योग अहंकाराचा नाश करतो ' असें ज्ञान होतें. आणि मग या साम्याच्या आधिक्याकरितां ' योगः सर्पघ्नः ' असा अभेदारोप होऊं शकतो. एवंच सांग आणि परंपरित या दोन्ही रूपकांमध्यें अंगरूपक असतेंच. पण उपमानोपमेयांचें सादृश्य प्रसिद्ध असेल तर ' सांग ' आणि अप्रसिद्ध असेल तर ' परंपरित ' रूपक होतें हें यांतील मर्म आहे.

# ८ अतिशयोक्तिः

१ केवळ उपमानवाचक शब्दानेंच उपमेयाचें वर्णन, २ (तीच असली तरी) ती वस्तु दुसरीच आहे असें वर्णन, ३ नसलेला संबंध असल्याचें वर्णन, ४ असलेला संबंध नसल्याचें वर्णन, ५ कार्य आणि कारण एकदम उत्पन्न झाल्याचें वर्णन, ६ केवळ कारणाच्या ज्ञानानेंच कार्योत्पत्ति झाल्याचें वर्णन, आणि ७ आधीं कार्याची, मग कारणाची उत्पत्ति झाल्याचें वर्णन या सातांपैकीं कोणता तरी एक प्रकार असला कीं अतिशयोक्ति हा अलंकार असतो. अर्थात् या अलंकाराचे (अप्पय्यदीक्षितांच्या मताप्रमाणें) सात प्रभेद आहेत. प्रत्येक प्रकारांत 'चमत्कृतिजनकत्व' असलेंच पाहिजे ही गोष्ट सांगावयास नको. या सातहि प्रकारांचीं नांवें निरनिराळीं आहेत. ती जाणण्याकरितां कुवलयानंदांच्या अतिशयोक्तिप्रकरणांतील सात कारिकाच आपण पाहूं या. म्हणजे नांवाबरोबर उदाहरणांचेंहि ज्ञान होईल-'रूपकातिशयोक्तिः स्यान्निगीर्याध्यवसानतः। पश्य नीलोत्पलद्वन्द्वान्निःसरान्ति

(१) (उपमेयवाचक शब्दानें उपमेयाचा निर्देश न करतां) उपमानवाचक शब्दानेंच उपमेयाचा निर्देश करून उपमेय हें उपमानच आहे असें भासविणें याला 'निगीर्याध्यवसान' म्हणतात. रूपकाप्रमाणें यांतहि हें ज्ञान आहार्य निश्चयात्मकच असतें. पण रूपकामध्यें उपमेयाचा स्वशब्दानें उल्लेख असतो, तो यांत नसतो. हा या दोन अलंकारांतील मुख्य फरक आहे. 'पश्य-' या उदाहरणांत 'नेत्र-कटाक्ष' हे उपमेयवाचक शब्द अजीबात टाळून 'नीलोत्पल, शर' या उपमानवाचक शब्दांनींच त्या उपमेयांचें ज्ञान, (उपमान रूपानें) कवि आपणांस करून देत आहे. म्हणून या ठिकाणीं 'रूपकातिशयोक्ति' हा अलंकार आहे. [विषयस्य स्वशब्देनोल्लेखनं विना विषयिवाचकेनैव शब्देन ग्रहणं विषयनिगरणं, तत्पूर्वकं विषयस्य विषयिरूपपतयाऽध्यवसानमाहार्यनिश्चयः' तस्मिन्सति रूपकातिशयोक्तिः। यथा-नीलोत्पलशरशब्दाभ्यां लोचनयोः कटाक्षाणां च ग्रहणपूर्वकं तद्रूपताध्यवसानम् (कुवलयानंद)]

शिताः शराः ॥ भेदकातिशयोक्तिस्तु तस्यैवान्यत्ववर्णनम् । अन्यदेवास्य गाम्भीर्यमन्यद्धैर्यं महीपतेः ॥ सम्बन्धातिशयोक्तिः स्यादयोगे योगकल्पनम् । सौधाग्राणि पुरस्यास्य स्पृशन्ति विधुमण्डलम् ॥ योगेऽप्ययोगोऽसम्बन्धातिशयोक्तिरितीर्यते । त्वयि दातरि राजेन्द्र । स्वर्द्रुमान्नाद्रियामहे ॥ अक्रमातिशयोक्तिः स्यात्सहत्वे हेतुकार्ययोः । आलिङ्गन्ति समं देव । ज्यां शराश्च परांश्च ते ॥ चपलातिशयोक्तिस्तु कार्ये हेतु प्रसक्तिजे । यास्यामीत्युदिते तन्व्या वलयोऽभवदूर्मिका ॥ अत्यन्तातिशयोक्तिस्तु पौर्वापर्यव्यतिक्रमे । अग्रे मानो गतः पश्चादनुनीता प्रियेण सा ॥'

श्रीदत्तचम्पूच्या 'सदयं हृदयं यस्य तेन प्रस्थापितोऽपि सः । वाचा मोचातिरसया स्थितश्चित्र इवाग्रतः ॥' ( स्तबक १ श्लोक ९२ ) या श्लोकांतील 'वाचा मोचातिरसया' या भागांत ( वाणीमध्यें केळीपेक्षां जास्त गोडीचा संबंध वस्तुतः नसून तो आहे असें वर्णन केलें असल्यानें ) यांतील तिसरा प्रकार म्ह० सम्बन्धातिशयोक्ति हा अलंकार आहे.

'अतिशयेन=सम्भवातिरेकेण योग्यताऽतिक्रमेण वा उक्तिः अतिशयोक्तिः अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे. याच अभिप्रायानें काव्यादर्शकारांनीं

---

या अतिशयोक्ति अलंकाराची महती, याचें सामान्य लक्षण इत्यादिकांविषयीं चन्द्रिकाकारांनीं फार सुंदर विवेचन केलें असून त्यांतील कांहीं भाग खालीं उद्धृत करीत आहे—

'रूपकभिन्नत्वे सति चमत्कृतिजनकाहार्यारोपनिश्चयविषयत्वमेवातिशयोक्तिसामान्यलक्षणम् । रूपकवारणाय सत्यन्तम्, भ्रान्तिवारणायाहार्येति, उत्प्रेक्षानिरासाय निश्चयेति । रूपकातिशयोक्तावभेदस्य, द्वितियप्रभेदेऽन्यत्वस्य, तृतीये सम्बन्धस्य, चतुर्थेऽसम्बन्धस्य, पञ्चमे सहत्वस्य, षष्ठे हेतुप्रसक्तिजन्यत्वस्य, सप्तमे पूर्वापरत्वयोश्च तथाविधाहार्यारोपविषयत्वसत्त्वात्सर्वत्र लक्षणसमन्वयः । न च एवंविधारोपस्य रूपकस्वभावोक्ति-

असें म्हटलें आहें--' विवक्षा या विशेषस्य लोकसीमातिवर्तिनी । असा-वतिशयोक्तिः स्यादलङ्कारोत्तमा यथा ॥ '

१-९२, १-१०७, १-१०८, १-१२६, १-१४८, १-१५१, २-१६ २-८९, ३-२८, ३-६०, ३-८९, ३-९८

---

भिन्नेषु प्रायशः सर्वालङ्कारेषु सत्त्वादतिप्रसङ्ग इति वाच्यम् । इष्टापत्तेः । अलङ्कारान्तराणां चमत्कारे प्रधानतया तदङ्गत्वेनावस्थितताया अतिशयोक्ते-रप्राधान्येन व्यपदेशानर्हत्वात् । 'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति' इति न्याया-दलङ्काराणामेव प्रधानत्वेन व्यपदेशार्हत्वात् । ' अत एव काव्यप्रकाशकृता विशेषालङ्कारप्रसङ्गेऽभिहितम्–' सर्वत्रैवंविधे विषयेऽतिशयोक्तिरेव प्राणत्वे-नावतिष्ठते । तां विना प्रायेणालङ्कारत्वाभावात् । अत एवोक्तम्–' सैषा सर्वत्र वक्रोक्तिरनयार्थो विभाव्यते । यत्नोऽस्यां कविभिः कार्यः कोऽलङ्कारोऽनया विना ॥ '' इति । दण्डिनाऽप्युक्तम्–' अलङ्कारान्तराणामप्येकमाहुः परायणम् । वागीशमहितामुक्तिमिमामतिशयाह्वयाम् ' इति ।

---

# ९ विभावना

' विरोधाभासः ' पाहा

१-९४

---

# १० उत्प्रेक्षा

उपमेय हें जणूं उपमानच आहे. अशा संभावनेला ( कल्पनेला ) उत्प्रेक्षा म्हणतात. [उपमेयस्य उपमानत्वेन सम्भावना उत्प्रेक्षा इति निष्कर्षः (का. प्र. टी.) ] ' ( श्रीदत्तस्य ) मुखं चन्द्रं मन्ये ' या वाक्यांत ' मुख ' या उपमेयाची ' चन्द्र ' या उपमानाच्या रूपानें संभावना केली आहे म्हणून उत्प्रेक्षालंकार आहे.

कारणरूपानें सम्भावना, फलरूपानें सम्भावना, ( एतद्भिन्न ) सामान्य सम्भावना असें या अलंकाराचे तीन मुख्य प्रकार असून क्रमानें, हेतूत्प्रेक्षा फलोत्प्रेक्षा, वस्तूत्प्रेक्षा अशी त्यांचीं नांवें आहेत. वर दाखविलेली ' मुखं

---

(१) संभावना म्हणजे संशय आणि निश्चय यांच्या मधल्या अवस्थेंतलें ज्ञान. तीनीसांजेच्या वेळीं दुरून एखादें ( झाडाचें ) खोड दृष्टीस पडलें तर ' हें माणूस असेल कीं खोड ' (अयं स्थाणुर्वा पुरुषो वा) असा आपणांस प्रथम संशय येतो. थोडा वेळ तसाच पहात राहिलों, त्या वस्तूंत कांहीं हालचाल आढळली नाहीं म्हणजे 'हें बहुतेक खोडच असावें' (मन्ये स्थाणुरेवायम् ) असें दुसरें ज्ञान उत्पन्न होतें. नंतर पुढें जावून स्पष्ट पाहिलें कीं ' हें खोडच आहे ' ( स्थाणुरेवायम् ) असा निश्चय होतो. यांपैकीं पहिल्या ज्ञानामध्यें म्ह. संशयामध्यें ( स्थाणु व पुरुष हे) दोन्ही पक्ष समान असतात. शेवटच्या निश्चयांत ( ' पुरुष ' हा ) दुसरा पक्ष नाहींसाच होतो. मधल्या ज्ञानांत दोन्ही पक्ष असले तरी त्यांतील एक ( ' पुरुष ' हा ) पक्ष दुर्बल असून दुसरा ( ' स्थाणु ' हा ) पक्ष प्रबळ असतो. अशा मधल्या ज्ञानालाच ' सम्भावना ' म्हणतात. हें ज्ञानहि संशय जातींचेंच मानलें जातें. याला ' उत्कटैककोटिकज्ञान' म्ह. 'एका पक्षाविषयीं निश्चयप्राय झालेले ज्ञान ' असें नांव आहे. उपमानोपमेयाविषयीं शुद्ध म्ह. दोन्ही पक्ष समान असलेला ( सुंदर असा ) संशय वर्णिला असेल तर ' ससन्देह ' हा अलंकार होतो. तोच निश्चय=म्ह. आहार्य अभेदारोपनिश्चय असेल तर ' रूपक ' अलंकार असतो. आणि तेंच ज्ञान, वर दाखविल्याप्रमाणें मधलें म्ह. आहार्य संभावनात्मक असलें कीं हा आपला उत्प्रेक्षालंकार तयार होतो.

चन्द्रं मन्ये ' ही वस्तूत्प्रेक्षा होय. कारण त्या वाक्यामध्यें कोणत्याहि कार्य-कारणभावाची उत्प्रेक्षा न करितां केवल मुखाच्या ठायीं चन्द्रतादात्म्य उत्प्रेक्षिलें आहे, श्रीदत्तचम्पूच्या ' पद्मिभिः सततोत्सृष्टैर्दानोदैश्च सुगन्धिभिः । मुनेः पृथ्वी गन्धवतीत्युक्तिः सार्था कृता स्फुटम् ॥ ' ( १-१०७ ) या श्लोकांत ' गन्धवती पृथिवी ' या न्यायशास्त्रवाक्याचें सार्थकीकरण, गज-मदोदकत्यागाचें ( वस्तुतः फळ नसून ) फळ म्हणून वर्णिलें असल्यानें फलोत्प्रेक्षा आहे. याच चम्पूग्रंथाच्या ' वडवातनयः खण्डपिण्डाशीतीर्ष्ये-याऽऽगताः । वडवातनयाः खण्डपिण्डाः सन्तो मृतं गताः ॥' (१-११०) या पद्यांत अश्वांच्या आगमनाला, विशिष्ट ईर्ष्या ( वस्तुतः कारण नसून ) कारण म्हणून वर्णन ( संभावन ) केल्यामुळें हेतूत्प्रेक्षा आहे. यांशिवाय ' उक्तविषया, अनुक्तविषया, सिद्धविषया, असिद्धविषया ' इत्यादि अनेक अवांतर प्रकार या उत्प्रेक्षालंकाराचे सांगितले आहेत. साहित्यदर्पणांत यांची एकंदर संख्या १७६ दाखविली आहे.

हा अलंकार व्यक्त करण्याकरितां ' ध्रुवम्, प्रायः, नूनम्, मन्ये, शङ्के, अवैमि, ऊहे , जाने, उत्प्रेक्षे ' इत्यादिकांपैकीं एखादा शब्द वापरीत असतात. उपमान अप्रसिद्ध असलें तर ' इव ' शब्दहि उत्प्रेक्षाच दाखविते. ( उपमा प्रसिद्ध असेल तर ' इव ' शब्द उपमेचा बोधक होतो ) अशा एखाद्या शब्दानें व्यक्त होणाऱ्या उत्प्रेक्षेला ' वाच्योत्प्रेक्षा ' आणि अशा शब्दांशिवाय भासणाऱ्या उत्प्रेक्षेला गम्योत्प्रेक्षा म्हणतात. वर दाखविलेल्या तीन उदाहरणांमध्यें पहिल्या दोन उदाहरणांत वाच्योत्प्रेक्षा असून तिसऱ्यांत गम्योत्प्रेक्षा आहे.

---

( १ ) यदाऽयमुपमानांशो लोकतः सिद्धिमृच्छति
तदोपमैव येनेवशब्दः साधर्म्यवाचकः ॥
यदा पुनरयं लोकादसिद्धः कविकल्पितः
तदोत्प्रेक्षैव येनेवशब्दः सम्भावनापरः ॥ ( का. प्र. टी. )

'सम्भावनमथोत्प्रेक्षा प्रकृतस्य समेन यत्' ( काव्यप्रकाश ) हें या अलंकाराचें सामान्य लक्षण असून 'उत्कटा प्रकृष्टस्य उपमानस्य ईक्षा उत्प्रेक्षा' अशी उत्प्रेक्षाशब्दाची व्युत्पत्ति आहे.

१-१०७, १-११०, १-१३६, २-४४, २-७१, ३-१२, ३-२७, ३-६०

---

# ११ मुद्रा

प्रकृत अर्थांत अन्वित असणाऱ्या पदांनींच, त्या श्लोकांतलें वृत्त, त्या काव्याची रीती[1] अथवा पुढील कथाभाग इत्यादिकांचें मार्मिक रीतीनें सूचन केल्यास त्यास 'मुद्रा' (अलंकार) म्हणतात.

'विद्युद्दास्वत्स्वं परितोऽस्त्रं विधुनानं मेवध्वानं मेघरुचोऽलं हृतमानम्।
दृष्ट्वा मेघो मुव्यवतीर्णः किमिहास्ते मत्वापीत्थं मत्तमयूरा ननृतुस्ते ॥'

( १–१२८ ) या श्रीदत्तचम्पूच्या श्लोकांत प्रकृतार्थान्वित 'मत्तमयूर' शब्दानें या श्लोकाच्या 'मत्तमयूर' वृत्ताचेंहि सूचन केल्यानें मुद्रालंकार आहे.

असाच—'धन्यासि वैदर्भि ! गुणैरुदारैर्यया समाकृष्यत नैषधोऽपि।
इतः स्तुतिः का खलु चन्द्रिकाया यदब्धिमप्युत्तरलीकरोति ॥'

( ३–११६ ) या नैषध महाकाव्याच्या श्लोकांत दमयंतीच्या उद्देशानें वापरलेल्या 'वैदर्भि !' पदानें त्या काव्यांतील वैदर्भी[2]नामक रीतीचाहि अप्रत्यक्ष निर्देश केल्यानें तेथेंहि हा अलंकार निष्पन्न होतो.

---

( १ ) 'पदसङ्घटना रीतिरङ्गसंस्थाविशेषवत्। उपकर्त्री रसादीनाम्।
( साहित्यदर्पण )

( २ ) माधुर्यव्यञ्जकैर्वर्णैः रचना ललितात्मिका।
अवृत्तिरल्पवृत्तिर्वा वैदर्भी रीतिरिष्यते ॥ ( साहित्यदर्पण )

संस्कृत भाषेंतल्या बहुतेक सर्व नाटकांत नांदीश्लोकानें पुढील कथाभाग सुचविला जात असतो. ( शाकुंतल अनर्घराघव इत्यादि नाटकांतील नांदीश्लोकांची टीका पाहा. ) त्या स्थळींहि हा अलंकार असतोच.

'सच्यार्थसूचनं मुद्रा प्रकृतार्थपरैः पदैः' (कुवलयानंद) असें या अलंकाराचें लक्षण सांगितलें असून 'अर्थान्तरसूचनेन मुदं सन्तोषं राति ददातीति मुद्रा, मुद्रा ( शिक्का-मोहोर ) सदृशत्वाद्वा मुद्रा' अशी मुद्रा शब्दाची व्युत्पत्ति होऊं शकते.

१-१२८, १-१५०, ३-४४, ३-४५, ३-४६, ३-४७, ३-४८, ३-४९, ३-१००

---

# १२ अपन्हुतिः

उपमानोपमेयांचा अभेद वर्णन करण्याकारितां उपमेयाचा किंवा उपमानाचा निषेध केल्यास म्ह० 'हें उपमेय नसून उपमान आहे. (अथवा) उपमान नसून उपमेय आहे' असें वर्णिल्यास 'अपन्हुति' हा अलंकार होतो. हा निषेध बहुतेक अभेदारोपाला उपपादक ( अङ्ग ) व क्वचित्स्थळीं उपपाद्य ( अङ्गी ) हि असतो. 'न नो' इत्यादि शब्दांनीं तो ( निषेध ) सांगितला, अथवा 'कपट, मिष' इत्यादि शब्दांनीं सुचविला, किंवा मूर्ख लोक असें म्हणतात' इत्यादि रीतीनें व्यक्त केला तरी हरकत नाहीं. [ अभेदप्रदिपत्तिनिरूपिताङ्गाङ्गित्वान्यतरवान्निषेधोऽपन्हुतिरिति अपन्हुतिसामान्यलक्षणम् । निषेधश्च नञादिसत्त्वे वाच्यः, क्वचित्तु तदभावात्कैतवादिपदैः पर-मतत्त्वोपन्यासादिभिश्च व्यङ्ग्यः ( चंद्रिका ) ] रूपकामध्यें अभेदारोप असला तरी निषेध नसतो. अर्थात् रूपकास-उपमानोपमेयांच्या आहार्याभेदारोपास-वर दाखविल्याप्रमाणें निषेधाची पुस्ती जोडली कीं, 'अपन्हुति' तयार.

' नेदं नभोमण्डलमम्बुराशिर्नैताश्च तारा, नवफेनभङ्गाः।
नायं शशी, कुण्डलितः फणीन्द्रो नासौ कलङ्कः शयितो मुरारिः ।।
( साहित्यदर्पण ) या श्लोकांत ' हें आकाशमण्डल नसून समुद्र आहे. ' इ. रीतीनें उपमेयनिषेधपूर्वक उपमानाभेद वर्णिल्यानें ' अपन्हुति ' आहे. या स्थळीं निषेध ( ' न ' शब्द- ) वाच्य असून अभेदारोपाला उपपादक अर्थात् अंगभूत आहे.

' अत्यानन्दयति स्वान्तं, धनं किं, न, गुरोः पदम् ' या ( भ्रान्तापन्हुतीच्या ) उदाहरणांतहि निषेध वाच्यच आहे. पण तो उपपादक नसून स्वतःच उपपाद्य म्ह० ' अङ्गी ' असा आहे.

'जातमात्रं तु तं वीक्ष्य बोधदुग्धमपाययत्। स्तन्यं तु प्राणधृतय उल्लापनमिषेण सा ।। " (स्तवक २ श्लोक १९) या आपल्या चम्पूश्लोकांतहि हाच अलंकार आहे. या ठिकाणीं निषेध ( ' नेदमुल्लापनम्, किन्तु बोधदुग्धपानम् ' अशा रीतीनें ) साक्षात् न सांगतां ( ' उल्लापनमिषेण ' अशा ) पर्यायानें सुचविला आहे.

' प्रकृतं यन्निषिध्यान्यत्साध्यते सा त्वपन्हुतिः। ' असें, काव्यप्रकाशांत या अलंकाराचें लक्षण सांगितलें असून ' अपन्हूयते निषिध्यते उपमानमुपमेयं वा अत्र इति अपन्हुतिः' अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे. २-१९

---

# १३ व्यतिरेकः

उपमेय हें उपमानापेक्षां उत्कृष्ट अथवा निकृष्ट असल्याचें वर्णिल्यास 'व्यतिरेक' हा अलंकार होतो. [ ' उपमानादुपमेयस्य...येन केन प्रकारेण उत्कर्षः, अथवा उपमानादुपमेयस्य......येन केन प्रकारेण निकर्षो व्यतिरेको नामालङ्कारः स्यात्। एतेन उपमानोपमेययोर्यत्किचिद्वैधर्म्यं व्यतिरेक इति लक्षणं फलितम् ' (कुसुमप्रतिमा = साहित्यदर्पणटीका). ' किञ्चिद्धर्मप्रयुक्तसाम्यवत्तया प्रतीयमानयोः किञ्चिद्धर्मप्रयुक्तवैलक्षण्यं व्यतिरेकशरीरम्। ' (चन्द्रिका) ]

'निष्कलङ्कं दत्तमुखं शशाङ्कादतिरिच्यते' या वाक्यांत, मुखाच्या (म्ह० उपमेयाच्या) ठिकाणीं चंद्रा (म्ह० उपमाना) पेक्षां निष्कलंकत्वरूपी आधिक्य म्ह० उत्कर्ष वर्णिला असल्यानें उपमेयाधिक्यपर्यवसायी व्यतिरेक आहे.

'स्वनाम यन्नाम मुधाभ्यधामहं महेन्द्रकार्यं महदेतदुज्झितम्।
हनूमदाद्यैर्यशसा मया पुनर्द्विषां हसैर्दूतपथः सितीकृतः ॥'

या नैषध महाकाव्याच्या (सर्ग ९ श्लोक १२३) श्लोकांत उपमानापेक्षां उपमेयाचा म्ह० मारुतीपेक्षां नलराजाचा अपकर्ष वर्णिला आहे. म्हणून उपमेयन्यूनत्वपर्यवसायी व्यतिरेक आहे. या दोन्ही उदाहरणांमध्यें हा अलंकार शुद्ध श्लेषासंकीर्ण असून आपल्या दत्तचम्पूच्या 'क्षमैकभद्रासनानां—' या गद्यांत मात्र हा (व्यतिरेक) श्लेषमूलक आहे.

साहित्यदर्पणकारांनीं या अलंकाराचे एकंदर अठ्ठेचाळीस (४८) भेद सांगितले असून 'आधिक्यमुपमेयस्योपमानान्न्यूनताऽथवा। व्यतिरेकः' असें याचें सामान्य लक्षण दिलें आहे. 'व्यतिरिच्यते = उपमानादुपमेयं किञ्चिद्वैषम्येणावगम्यते येन स व्यतिरेकः' (सा. द. टी.) अशी, व्यतिरेक शब्दाची व्युत्पत्ति आहे. २–३८, ३–६, ३–७, ३–८ ३–६०.

---

# १४ दृष्टान्तः

उपमान, उपमेय, (असतील तितके) संबंधीं पदार्थ, आणि साधारण धर्म या सर्वांचा बिंबप्रतिबिंबभावानें निर्देश केला तर 'दृष्टान्त' हा अलंकार होतो. [प्रकृतवाक्यार्थघटकानामुपमानादीनां साधारणधर्मस्य च बिम्बप्रतिबिम्बभावे दृष्टान्तः। (रसगंगाधर) हा अलंकार तयार होण्याला दोन वाक्यें असावीं लागतात. एकांत उपमेय; संबंधी पदार्थ आणि साधारणधर्म यांचा निर्देश असतो तर दुसऱ्यांत, उपमान; संबंधी पदार्थ

आणि साधारण धर्म यांचा निर्देश असतो. या दोन्ही वाक्यांतले सगळे पदार्थ–म्हणजे उपमान आणि उपमेय, सगळे संबंधीं पदार्थ आणि दोन्ही साधारण धर्म हे- वस्तुतः परस्परभिन्न असतात. पण ते परस्पर अगदीं सदृश असल्यामुळें त्यांना अभिन्न–जणूं एकाचें प्रतिबिंबच दुसरें असें- मानून ( हि ) भिन्न शब्दांनीं त्यांचें ग्रहण केलें जातें. यालाच ' बिम्बप्रतिबिम्बभाव ' म्हणतात. [ वस्तुतो भिन्नयोरप्युपमानोपमेयधर्मयोः परस्परसादृश्यादभिन्नयोः पृथगुपादानं बिम्बप्रतिबिम्बभावः ( कुवलयानंद ) ] हे दोन्ही वाक्यार्थ सामान्यतः निराकांक्ष असले तरी उपमानवाक्यार्थानें उपमेयवाक्यार्थाचें समर्थन केलें जातें. सरते शेवटीं या दोन्ही वाक्यार्थांचे पर्यवसान सादृश्यामध्यें होते.

अविदितगुणापि सत्कविभणितिः कर्णेषु वमति मधुधाराम् ।

अनधिगतपरिमलाऽपि हि हरति दृशं मालतीमाला ।। (वासवदत्ता) हें दृष्टान्तालंकाराचें उदाहरण असून यांतल्या पदार्थांची व्यवस्था अशीं आहे- सत्कविभणिति–उपमेय, मालतीमाला–उपमान, अविदितगुणत्व आणि अनधिगतपरिमलत्व–संबंधीं पदार्थ (विशेषण), मधुधारावमन आणि दृग्धरण ( दृष्ट्याकर्षण ) साधारणधर्म. सत्कविभणिति आणि मालतीमाला हे दोन्ही पदार्थ वस्तुतः भिन्न असून यांतल्या अतिशय सादृश्यामुळें हे ( सहृदयांना ) अभिन्नच भासतात. ( तरी पण ) यांचा निर्देशमात्र भिन्न-

---

(१) यांत समर्थ्य आणि समर्थक दोन्ही वाक्यार्थ, सामान्यरूपी अथवा विशेषरूपी असावे लागतात. अर्थात् हें समर्थन, 'सामान्यानें विशेषाचें' अथवा 'विशेषानें सामान्याचें' असें नसतें. कारण तसें असलें कीं, अर्थान्तरन्यास' हा अलंकार होतो.

(२) पण 'इव, यथा' वगैरे उपमावाचक शब्द मात्र नसावा. तो असला कीं 'दृष्टांता'ऐवजीं 'उपमा' (वाक्यार्थोपमा) अलंकारच निष्पन्न होतो.

भिन्नशब्दांनींच केला आहे. संबंधीं पदार्थ आणि साधारण धर्म यांचीहि हीच स्थिति आहे. अर्थात् या सर्वांमध्यें ‘ बिंबप्रतिबिंबभाव ’ आहे, म्हणून या ठिकाणीं ‘ दृष्टान्त ’ हा अलंकार आहे.

श्रीदत्तचंपूच्या ‘ द्वयतोऽद्वयमात्मविद्यया पुनरैक्यं न भजेत्पृथक्कृतम् । मथनेन पृथक्कृतं पुनर्नवनीतं न हि तक्र ऐक्यभाक् ॥ ’ ( २–९६ ) या श्लोकांतहि, उपमानोपमेयादिकांचा बिंबप्रतिबिंबभाव; उपमानवाक्यार्थानें उममेयवाक्यार्थाचें समर्थन; विचाराअन्तीं दोन्ही वाक्यार्थांचें सादृश्यांत पर्यवसान हें सगळें असल्यानें दृष्टान्तालङ्कारच आहे. ( विशेष शंका-समाधानांकरितां त्रिशती सर्ग ३, श्लोक १०४ पाहा. )

काव्यप्रकाशकारांनीं या अलंकाराचें लक्षण–‘ दृष्टान्तः पुनरेतेषां सर्वेषां प्रतिबिम्बनम् ’ असें सांगितलें आहे. या शब्दाची व्युत्पत्ति–‘ दृष्टः अन्तः निश्चयः यस्मिन् सः दृष्टान्तः ’ [ एवं च यत्र दृष्टान्तवाक्येन दार्ष्टान्तिकवाक्यार्थनिश्चयस्य प्रामाण्यग्रहो भवति स दृष्टान्त...इत्यर्थः । ‘ अन्तोऽध्यवसिते मृत्यौ स्वरूपे निश्चयेऽन्तिके ’ इति वैजयन्ती । ( का. प्र. टी. ) ] अशी आहे. (१) २–९६.

---

(१ ) या दृष्टांतालंकारामध्यें दोन वाक्यांत दोन विभिन्न साधारण धर्म असून त्यांमध्यें बिंबप्रतिबिंबभाव असतो ही गोष्ट आतां आपल्या ध्यानीं आलींच आहे. पण तो साधारण धर्म दोन्ही वाक्यांमध्यें वस्तुतः एकच, असून विभिन्न शब्दांनीं प्रतिपादिला गेला असेल तर (अशा प्रतिपादनाला ‘वस्तुप्रतिवस्तुभाव’ अशी संज्ञा आहे. [ ‘एकस्यार्थस्य शब्दद्वयेनाभिधानं वस्तुप्रतिवस्तुभावः’ का. प्र. टी. ] ‘प्रतिवस्तूपमा’ हा अलंकार होतो. [ यत्रोपमानोपमेयवाक्ययोरेकः समानो धर्मः पृथङ्निर्दिश्यते सा प्रतिवस्तूपमा । प्रतिवस्तु प्रतिवाक्यमुपमा समानधर्मोऽस्यामिति व्युत्पत्तेः ।

# १५ अर्थान्तरन्यासः

'काव्यलिङ्गम्' पहा. २-९८, ३-१९, ३-२०, ३-९९.

---

(कुवलयानंद) ] बाकी-दोन्ही वाक्यार्थामध्यें समर्थ्यसमर्थकभाव, शेवटीं औपम्यामध्यें पर्यवसान हें-सगळें दृष्टान्तालंकारासारखेंच.

तवामृतस्यन्दिनि पादपङ्कजे निवेशितात्मा कथमन्यदिच्छति ।

स्थितेऽरविन्दे मकरन्दनिर्भरे मधुव्रतो नेक्षुरसं समीक्षते ॥ (कुवलयानंद)

या भक्तोक्तींत दोन्ही वाक्यांमध्यें, 'कथमिच्छति? न समीक्षते' या विभिन्न शब्दांनीं 'अनिच्छा'रूपी एकच साधारण धर्म सांगितला असल्यानें 'प्रतिवस्तूपमा' हा अलंकार आहे. अप्पय्यदीक्षितांनीं या अलंकाराचें लक्षण-'वाक्ययोरेकसामान्ये प्रतिवस्तूपमा मता' असें दिलें आहे. व्युत्पत्ति वर दाखविलीच आहे.

—xxx—

# वृत्तें

अक्षरें किंवा मात्रा यांच्या नियत परिमाणाला[1] 'छंद' अथवा 'वृत्त' अशी संज्ञा आहे. अर्थात् 'अक्षरवृत्त, मात्रावृत्त' असें वृत्तांमध्यें दोन प्रकार आहेत.

# अक्षरवृत्त

ज्यांत अक्षरांची संख्या ठराविक असते तें अक्षरवृत्त, प्रत्येक वृत्तांत (म्ह० वृत्तघटित श्लोकांत) चार पाद म्ह० भाग असतात. ते सगळे एकसारखे असल्यास तें 'समवृत्त'[2] होय. पहिला आणि तिसरा हे दोन पाद एका तऱ्हेचे व दुसरा आणि चौथा हे एका तऱ्हेचे असल्यास तें वृत्त 'अर्धसम' आणि ज्याचे सर्व पाद एकमेकांपासून भिन्न तें 'विषम'. पहिला व तिसरा या पादांना 'विषम, अयुग्म, ओज' अशा, व दुसरा आणि चौथा या पादांना 'सम, युग्म, अनोज' अशा संज्ञा आहेत. प्रचारांत असलेल्या वृत्तांमध्यें अर्धसम आणि विषम यांपेक्षां समवृत्तांची संख्या फार मोठी आहे. या समवृत्तांच्या[3] एकेका पादांत एकापासून

---

(१) यदक्षरपरिमाणं तच्छन्दः।

(२) अङ्घ्रयो यस्य चत्वारस्तुल्यलक्षणलक्षिताः। तच्छन्दःशास्त्रतत्त्वज्ञाः समं वृत्तं प्रचक्षते ॥ प्रथमाङ्घ्रिसमो यस्य तृतीयश्चरणो भवेत्। द्वितीयस्तुर्यवद्वृत्तं तदर्धसममुच्यते ॥ यस्य पादचतुष्केऽपि लक्ष्म भिन्नं परस्परम्। तदाहुर्विषमं वृत्तं छन्दःशास्त्रविशारदाः ॥

(३) आरभ्यैकाक्षरात्पादादेकैकाक्षरवर्धितैः। पृथक्छंदो भवेत्पादैर्यावत् षड्विंशतिं गतम् ॥ उक्ताऽत्युक्ता तथा मध्या प्रतिष्ठान्या सुपूर्विका। गायत्र्युष्णिगनुष्टुप् च बृहती पङ्क्तिरेव च ॥ त्रिष्टुप् च जगती चैव तथाऽतिजगती मता। शक्करी साऽतिपूर्वा स्यादष्ट्यत्यष्टी ततः स्मृते ॥ धृतिश्चातिधृतिश्चैव कृतिः प्रकृतिराकृतिः। विकृतिः सङ्कृतिश्चैव तथाऽतिकृतिरुत्कृतिः ॥

( क्रमानें एकेक अक्षर वाढत ) सव्वीसापर्यंत अक्षरें असलीं म्हणजे तयार होणाऱ्या सव्वीस प्रकारांना 'जाति' अशी संज्ञा आहे. या सव्वीस जातींचीं नांवें क्रमानें अशीं आहेत—१ उक्ता, २ अत्युक्ता, ३ मध्या, ४ प्रतिष्ठा, ५ सुप्रतिष्ठा, ६ गायत्री, ७ उष्णिक्, ८ अनुष्टुप्, ९ बृहती, १० पङ्क्ति, ११ त्रिष्टुप्, १२ जगती, १३ अतिजगती, १४ शक्करी, १५ अतिशक्करी, १६ अष्टि, १७ अत्यष्टि, १८ धृति, १९ अतिधृति २० कृति, २१ प्रकृति, २२ आकृति, २३ विकृति, २४ सङ्कृति, २५ अतिकृति, २६ उत्कृति. यांतल्या प्रत्येक जातींत अवांतर अनेक प्रकार होतात. उदाहरणांत प्रत्येक पादांत एकेक याप्रमाणें चार अक्षरें असलीं कीं 'उक्ता' तयार होते हें आपण वर पाहिलेंच आहे. हीं चारीं अक्षरें 'लघु' ठेविलीं तर पहिला आणि 'गुरु' ठेविलीं तर दुसरा असे यांत दोन प्रकार होतात. याच रीतीनें अत्युक्तेचे चार, मध्येचे आठ, प्रतिष्ठेचे सोळा, असे दुपटीनें वाढत वाढत शेवटच्या म्ह० उत्कृति जातीचे '६७१०८८६४' इतके अवांतर प्रकार बनतात. या व अशा रीतीनें अर्धसम आणि विषम वृत्तांत संभवणाऱ्या अनंत प्रकारांपैकीं प्रचारांत असलेल्या कांहीं विवक्षित प्रकारांना 'श्री, स्त्री, नारी तनुमध्या, मदलेखा, वसंततिलका, शिखरिणी, स्रग्धरा, हरिणप्लुता, पुष्पिताग्रा, कलिका, लवली, अमृतधारा इ० नांवें देऊन छंदःशास्त्रकारांनीं त्यांचें लक्षण वगैरे सांगितलें आहे. यांमध्यें कोणकोणतीं अक्षरें लघु किंवा गुरु असावीं हें सुलभतेनें सांगण्याकरितां आठ 'गण' कल्पिले आहेत. प्रत्येक गणांत तीन पूर्ण अक्षरें ( स्वर अथवा स्वरसहित व्यंजनें ) असतात. हीं तीन्ही अक्षरें गुरु, किंवा तीन्ही लघु, अथवा कांहीं गुरु व कांहीं लघु असूं शकतात. असे प्रकार आठ होतात. हेच आठ 'गण' होत. लघु अक्षराबद्दल '।' व गुरु अक्षराबद्दल 'ऽ' अशीं चिन्हें वापरतात. हींच चिन्हें वापरून या आठ गणांचीं स्वरूपें व नांवें खालीं दिलीं आहेत. पहिल्या चार गणांच्या व्युत्क्रमानें दुसरें चार गण तयार होतात—

| | |
|---|---|
| मगण[1]=SSS | नगण= ||| |
| यगण= |SS | भगण=S|| |
| रगण=S|S | जगण |S| |
| सगण=||S | तगण SS| |

अ इ उ इत्यादि ऱ्हस्व अक्षरांना ' लघु ' ही संज्ञा आहे. आ ई ऊ इत्यादि दीर्घ ( वा प्लुत ) अक्षरांना ' गुरु ' म्हणतात. ' ऱ्हस्व ' अक्षर देखील अनुस्वारसहित[2] असेल; ( त्याच्या ) पुढें विसर्ग किंवा द्वित्ताक्षर येईल तर 'गुरु' गणलें जातें. पादाच्या शेवटीं असलेलें ऱ्हस्वाक्षर आवश्यकतानुसारेण लघु अथवा गुरु कसेंहि मानायला हरकत नाहीं. ' प्र ' आणि ' ऱ्ह ' या दोन्हींपैकीं एखादें द्वित्ताक्षर पुढें असलें तरी त्याच्या मागचें ऱ्हस्व अक्षर स्थलविशेषीं ' लघु 'च मानलें जातें.

अक्षरांची संख्या, प्रसिद्ध (चत्वारि पञ्च इ.) संख्यावाचकशब्दांनीं न सांगतां ' अब्धि[3], भूत, रस.' इ. लाक्षणिक शब्दांनीं सांगण्याची छंदःशास्त्रांत वहिवाट आहे. असें कांहीं लाक्षणिक शब्द व तद्बोध्यसंख्याविशेष दिग्दर्शनाकरितां खालीं दिले आहेत्—

अब्धि= ४, भूत= ५, रस= ६, मुनि= ७, वसु= ८, ग्रह= ९, दिशा= १०, रुद्र= ११, आदित्य= १२ इ. इ.

उच्चारसौलभ्यार्थ घेतल्या जाणाऱ्या विश्रान्तीला ' यति[4] ' म्हणतात.

---

(१) म्यरस्तजभ्नगैर्लान्तैरेभिर्दशाभिरक्षरैः । समस्तं वाङ्मयं व्याप्तं त्रैलोक्यमिव विष्णुना ॥ सर्वगुर्मो मुखान्तलौं यरावन्तगलौ सतौ । ग्मध्याद्यौ ज्भौ त्रिलो नोऽष्टौ भवन्त्यत्र गणास्त्रिकाः ॥

(२) सानुस्वारो विसर्गान्तो दीर्घो युक्तपरश्च यः । वा पादान्ते त्वसौ ग्वक्रो ज्ञेयोऽन्यो मात्रिको लृजुः ॥

(३) अब्धि-भूत-रसादीनां ज्ञेयाः संज्ञास्तु लोकतः ।

(४) यतिर्विच्छेदसंज्ञितः । यतिः सर्वत्र पादान्ते श्लोकार्धे तु विशेषतः ।

ही प्रत्येकपादाच्या शेवटीं असतेच शिवाय निरनिराळ्या वृत्तांत कितव्या अक्षरापुढें यति असावी याबद्दल विशिष्ट नियम आहेत. वृत्तरत्नाकरादि ग्रंथामध्यें प्रत्येक वृत्ताच्या लक्षणांत बहुतेक त्याचा यतिनियमहि सांगितलाच आहे. यति असलेलें अक्षर पदाच्या शेवटचें असावें अर्थात् पदाच्या मध्यें यति होऊं नये. तसें झाल्यास 'यतिभङ्ग[2]' दोष सांगितला आहे. श्लोकार्धाच्या शेवटीं समास अपुरा[3] राहिला तरी हा दोष मानतात. 'भरत' वगैरे कांहीं ग्रंथकार, यतिनियम अजीबात मानीत नाहींत. अर्थात् त्यांच्या मतांत यतिभंग दोषहि नाहीं.

## मात्रावृत्त

ज्यांत मात्रांची संख्या नियत असते तें मात्रावृत्त. लघु अक्षराची एक मात्रा व गुरु अक्षराच्या दोन मात्रा मानतात. चार मात्रांचा एक गण होतो. लघुगुरुभेदांमुळें असे गण पांच होतात[1]—

| सर्वगुरु | अन्त्यगुरु | मध्यगुरु | आदिगुरु | सर्वलघु |
|---|---|---|---|---|
| SS | ।।S | ।S। | S।। | ।।।। |

हीं मात्रावृत्तें बहुतेक अर्धसम अथवा विषम असतात. यांतल्या समवृत्तांना 'मात्रासमक' म्हणतात. 'आर्या, वैतालीय, मात्रासमक' हे मात्रा वृत्ताचे मुख्य प्रभेद होत. अक्षरवृत्तांप्रमाणें यांचेही अवांतर प्रभेद अनंत होतात. उ. 'पथ्या' आणि 'विपुला' हे आर्येच्या अनेक प्रभेदापैकीं दोन प्रभेद असून फक्त यांतल्या अवांतर प्रकारांची संख्याच १६३८-४०००० इतकी आहे. कांहीं मात्रावृत्तांत चार भाग (पाद) न मानतां दोन अर्धे मानलीं आहेत अशा वृत्तांना 'द्विखण्डक' म्हणतात.

---

(१) ज्ञेयाः सर्वान्तमध्यादिगुरवोऽत्र चतुष्कलाः। गणाश्चतुर्लघूपेताः पञ्चार्यादिषु संस्थिताः॥

(२) उदाहरण—'नमस्तस्मै महादेवाय शशाङ्कार्धधारिणे।'

(३) उ० 'सुरासुरशिरोरत्नस्फुरत्किरणमञ्जरी- । पिञ्जरीकृतपादाब्ज-द्वन्द्वं वन्दामहे शिवम्'॥

छंदोग्रंथांत[1] सांगितलेलें कोणतेंहि लक्षण जमत नसेल अथवा तीन पांच सहा असे पाद असतील तर अशा वृत्तास ‘ गाथा ’ अशी संज्ञा आहे.

आपल्या श्रीदत्तचम्पूंत वापरलेल्या बहुतेक सगळ्या वृत्तांचीं लक्षणें वगैरे त्रिशतीकाव्याच्या वृत्तादिविवृतीमध्यें दिलींच आहेत. ( त्रिशती-वृत्तानुक्रमणिका पाहा. ) आतां त्रिशतींत न आलेल्या ( या चंपूंतल्या ) पांच सात वृत्तांचीं लक्षणें वगैरे कशीं काय आहेत पाहूं—

---

| स्त.श्लो. | वृत्ताचें नांव | वृत्ताचें लक्षण | समन्वय |
|---|---|---|---|
| | | | स स स ल.गु. |
| १–४६ | एक रूपम् | ‘उपचित्रमिदं ससस लगौ’ | क्वचदो·षउए·षवदा·न्यतः<br>\| \| S \| \| S \| \| S \| S |

**विशेष माहिती**—वृत्तरत्नाकरांत या वृत्ताचें नांव ‘उपाचित्रम्’ असें आढळतें.

२–२० गीतम् हें मात्रावृत्त असून याच्या प्रत्येक पादांत बहुतेक १२ मात्रा आहेत. याचें विशिष्ट नांव किंवा लक्षण छंदो ग्रंथांत नसल्यानें याचा ‘गाथा’ मध्यें अंतर्भाव होतो.

| | | | |
|---|---|---|---|
| २–२५ | गीतिः (उपचित्रा) | ‘उपचित्रा नवमे परयुक्ते’ | मास्वपमास्वपरे निजरूपे<br>S \| \| S \| \| S \| \| SS |

हें वृत्त ‘मात्रासमकां’पैकीं असून याच्या प्रत्येक पादांत सोळा मात्रा असतात. श्रीशंकराचार्यांच्या ‘चर्पटपञ्जरिका’ स्तोत्रांत हेंच वृत्त आहे.

२–१०० गीतिः। हें मात्रावृत्त असून बहुतेक याच्या प्रत्येक पादांत चौदा मात्रा आहेत. याचाही ‘ गाथा ’ मध्येंच अन्तर्भाव मानावा लागतो. ‘शांत हो श्रीगुरुदत्ता !’— या प्रसिद्ध पदामध्यें श्रीमहाराजांनीं हेंच वृत्त वापरलें आहे.

---

(१) विषमाक्षरपादं वा पादैरसमं दशधर्मवत्। यच्छन्दो नोक्तमत्र गाथेति तत्सूरिभिः प्रोक्तम् ॥

| स्त.श्लो. | वृत्ताचें नांव | वृत्ताचें लक्षण | समन्वय |
|---|---|---|---|
| | | | म त न स गु.गु. |
| ३–१९ | असम्बाधा | 'म्तौ न्सौ गावक्षग्रहविरतिरसम्बाधा' | शूरन्दा-तारंसु-रवर-सुतमु-त्तारम् SSSSSIIII IISSS |

या श्लोकाच्या पहिल्या व शेवटच्या पादांमध्यें हें वृत्त जरा चुकतें.

| | | | |
|---|---|---|---|
| ३–२० | अपराजिता | 'ननरसलघुगैःस्वरैरपराजिता' | न न र स ल.गु. प्रभूर-पिचत-थाविधा-त्मजल-ब्धये IIIIII SIS IIS IS |
| ३–२१ | प्रहरणकलिता | 'ननभनलघुगैःप्रहरणकलिता | न न भ न ल.गु. सनिज-पुरम-गात्सुफ-लमिद-मदात् III III SII IIII S |
| ३–४७ | चित्रपदा | 'भौगिति चित्रपदा गः' | भ भ गु.गु. चित्रपभ-दार्थसु-चौर्यात् SII SII SS |

सज्जनमानसहंसा ! चिन्नभहंसा[१] ! तुझ्या च या अंशा[२] ।
जनन-ध्वंसां वारुनि तारी बा ! वासुदेव परहंसा ! ॥

श्रीगुरुचरणार्पणमस्तु । ॐ तत्सत् ॥

---

(१) 'भानुर्हंसः सहस्रांशुः—' अमरसिंह. (२) 'ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः'—वासुदेव.

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः ॥

# श्रीगुरुचरित्रकाव्य

## प्रथमशतक

### मराठी भाषान्तर मूळ श्लोक व अन्वयासहित

भाषांतरकार—'काव्यतीर्थ' वे. शा. सं. श्रीपादशास्त्री कवीश्वर,
नरसोबावाडी.

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः ॥

# गुरुचरित्रकाव्यप्रथमशतक
# मराठी भाषांतर

**सुशंकरं सन्तमजं गुरुं परं**
**परंपराध्रं प्रणमत्पुरंदरम्।**
**दरं हरन्तं प्रवरं सुसादरं**
**भजेऽत्रिजं योगिवरं निरन्तरम् ॥ १ ॥**

जयाच्या कृपादृष्टिनें सर्व भक्त
अविद्यालयें, पूर्ण होताति मुक्त।
जया वंदिती सर्वही ते सुदेव
विराजे यतिश्रेष्ठ तो वासुदेव ॥

**अन्वयः**—सुशंकरं, सन्तं, परं, अजं, गुरुं, परंपराध्रं, प्रणमत्पुरंदरं, दरं हरन्तं, प्रवरं, योगिवरं, अत्रिजं, सुसादरं, निरन्तरं, भजे ॥

**अर्थः**—जो संपूर्ण कल्याणकारी असून अविनाशी आहे, श्रेष्ठ पुरुष असल्यानें ज्याला जन्मादि विकार नाहींत, व म्हणूनच जो सर्वांचा गुरु आहे, अवधूतादि रूपांनीं अवतरून जो धर्म, नीति इत्यादींची परंपरा अबाधित ठेवतो, इन्द्रादि देवहि ज्याच्या चरणीं नम्र होतात व जो भक्तांची भीति दूर करणारा श्रेष्ठ योगिराज आहे अशा त्या अत्रिमहर्षींच्या सुपुत्राची (दत्तात्रेयाची) मी अत्यंत नम्रतापूर्वक सेवा करतों ॥ १ ॥

**विकाराभावेऽपि प्रभुरभवदाकारविदजोऽ-**
**धिकाराभावेऽपि स्वविमलयशोऽवाचयदतः।**
**पिता पुत्रस्याऽऽस्यादिव नववचो यो निजमुदे**
**स देवोऽद्याप्युक्तिं शिव इह मुहुर्वाचयति हि ॥ २ ॥**

**अन्वयः**—सः अजः प्रभुः विकाराभावे अपि आकारित्वत् अभवत्; यः अधिकाराभावे अपि अतः स्वविमलयशः अवाचयत्, पिता पुत्रस्य आस्यात् नववचः इव सः शिवः देवः निजमुदे मुहुः इह उक्तिं हि वाचयति ।।

**अर्थः**—वस्तुतः जन्मादि विकार नसतांहि श्रीदत्तराज जणुं देहधारी झाले ! ग्रन्थ रचण्याची माझी पात्रता ती काय ? पण पिता ज्याप्रमाणें मनोरंजनार्थ बालकाच्या तोंडून बोबडे बोल वदवून घेतो त्याप्रमाणें दत्तराजानेंच स्वसंतोषार्थ आपलें विशुद्ध यशोगान माझ्याकडून करविलें. खरोखर, तो शुभकारी दत्तात्रेय या जगतांत माझ्या तोंडूनच पुनः पुनः काव्यरूपवाणी वदवून मला वक्त्याचें श्रेय देत आहे ।। २ ।।

**मुग्धा जग्धा दग्धा म्लिष्टा वाऽर्भस्य वाक् पितुर्मिष्टा ।**
**शिष्टाल्पदोषदुष्टा दिष्टाद्यूनोऽपि साऽस्य किं नेष्टा ।। ३ ।।**

**अन्वयः**—मुग्धा जग्धा दग्धा म्लिष्टा वा अर्भस्य वाक् पितुः मिष्टा। यूनः अपि दिष्टात् शिष्टाल्पदोषदुष्टा वाक् अस्य न इष्टा किं ? ।।

**अर्थः**—लहान बाळाचे बोबडे, तुटक, अस्पष्ट व रागामुळें अशुभ असणारेहि बोल पित्याला प्रियच असतात ना ? इतकेंच काय पण, वयांत आलेल्या तरुण पुत्राची तरी प्रारब्धामुळें सदोष असलेली वाणी पित्याला अप्रिय वाटते काय ? तर मग, माझी तरी वाणी दत्तराजाला अप्रिय कशी असेल ? ।। ३ ।।

**धीशुद्ध्यै प्राक्चरित्रार्थ एष संगृह्यते स्फुटः ।**
**प्राज्ञैः प्रेक्ष्योऽत्र तत्सारो दर्पणेऽल्पे यथा मठः ।। ४ ।।**

**अन्वयः**—धीशुद्ध्यै एषः प्राक्चरित्रार्थः स्फुटः अत्र संगृह्यते; तत्सारः प्राज्ञैः प्रेक्ष्यः अल्पे दर्पणे यथा मठः ।।

**अर्थः**—ज्या परमेश्वराच्या बाबतींत–नेति नेति–म्हणून वेदांनाहि स्वस्थ बसावें लागलें, त्या परमेश्वराचें संपूर्ण वर्णन करण्यास जरी मी

असमर्थ असलों तरी माझ्या कुवतीप्रमाणें मी स्वतःच्या व दुसऱ्याच्याहि बुद्धीचें मालिन्य जावें म्हणून या ग्रन्थांत पूर्वीच्या गुरुचरित्रांतील अर्थ सुलभपणें एकत्र करीत आहें. जसें लहान आरशांत मोठें घर दिसतें, तसें विस्तृत गुरुचरित्राचेंहि सार विद्वानांना या ग्रन्थांत आढळेल. ॥ ४ ॥

**गन्धर्वपूर्या प्रथिता क्षितौ गो-**
**गन्धर्वपूर्णाऽमरजापरीता ।**
**गन्धर्वपूर्वामरमण्डिता च**
**गन्धर्वपूस्तुल्यकुसंसृतिघ्नी ॥ ५ ॥**

**अन्वयः**—या क्षितौ गन्धर्वपः प्रथिता; गोगन्धर्वपूर्णा अमरजापरीता गन्धर्वपूर्वामरमण्डिता गन्धर्वपूस्तुल्यकुसंसृतिघ्नी च ॥

**अर्थः**—जी नगरी पृथ्वीवर गन्धर्वपूर (गाणगापूर) म्हणून प्रसिद्ध आहे, ती नगरी धेनु, अश्व इत्यादि सर्व धनांनीं समृद्ध असून अमरजा नांवाची नदी त्या नगरींत आहे. तसेंच, गन्धर्वादि देव तेथें राहत असून कल्पित गन्धर्वनगराप्रमाणें मिथ्या असणाऱ्या संसाराचा नाश करणारी अशी ती नगरी आहे. ॥ ५ ॥

**सुचिरार्जितपातकान्तकं रुचिरागारमिदं ह्यकान्तकम् ।**
**अचिरादखिलार्थदं पुरं शुचिराजेन विराजितं वरम् ॥ ६ ॥**

**अन्वयः**—सुचिरार्जितपातकान्तकं रुचिरागारं हि अकान्तकं आचिरात् आखिलार्थदं शुचिराजेन विराजितं इदं पुरं वरम् ॥

**अर्थः**—अनेक जन्मांतील पातकांना नष्ट करणारें, शोभायमान घरें असणारें, जिथें वास्तव्य केलें असतां दुःख विलयास जाऊन धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी पुरुषार्थांची विनासायास प्राप्ति होते व विशेष म्हणजे अग्नि, वायु व तीर्थोदक या पवित्रतम देवतांचाहि राजा जो दत्तात्रेय त्याच्यामुळें जें सुशोभित आहे, असें तें गाणगापूर सर्वांत श्रेष्ठ दर्जाचें आहे. ॥ ६ ॥

सत्रक्रिया द्राक् सफला भवन्ति
यत्र प्रियार्थाश्च नरा भवन्ति ।
आपन्नदुःखाः सुखिनश्च दत्त
आपन्न दुःखानि यतोऽत्र दत्तः ॥ ७ ॥

**अन्वयः**—यत्र सत्रक्रियाः द्राक् सफलाः भवन्ति, च नराः प्रियार्थाः, आपन्नदुःखाः सुखिनः, (यत्र) आपत् दुःखानि न दत्ते, यतः अत्र दत्तः (वसति) ॥

**अर्थः**—ज्या नगरांत सर्व सत्कर्में तत्काल सफल होतात, प्रत्येक मनुष्याची इच्छा पर्ण होऊन तो वैराग्यसंपन्न होतो, दुःखी लोक सुखी होतात, जिथें दुःख, संकट हे पदार्थ औषधालाहि मिळत नाहींत, असें असामान्य ऐश्वर्य गाणगापुरास कां लाभलें ? तर तेथें प्रत्यक्ष भगवान् दत्तात्रेयांचें वास्तव्य आहे म्हणून ! ॥ ७ ॥

नरसिंहसुनामधारको नरसिंहः किमनामधारकः ।
इति तद्दृशयेऽवधारकः प्रथितः प्राप स नामधारकः ॥८॥

**अन्वयः**—नरसिंहसुनामधारकः (अतएव) अनामधारकः नरसिंहः किं ? इति अवधारकः प्रथितः सः नामधारकः तद्दृशये प्राप ॥

**अर्थः**—नरसिंह असें ज्याचें सुंदर नांव आहे व म्हणूनच तो जणुं नांव नसलेला मानवसिंहच आहे कीं काय, असें समजणारा प्रसिद्ध नामधारक त्या नरसिंहावतारी दत्तात्रेयाच्या दर्शनासाठीं गाणगापुरांत आला. ॥ ८ ॥

सायंदेवान्नागनाथोऽथ देव-
रावोऽस्माद्गंगाधरोऽस्मात्स एव ।
पूर्वे सर्वे भक्तिमन्तोऽथ तद्वत्
स्यामित्याकांक्षी सरस्वत्यभिख्यः ॥ ९ ॥

**अन्वयः**—सायंदेवात् नागनाथः, अथ देवरावः, अस्मात् गंगाधरः, अस्मात् स एव ( जातः ), पूर्वे सर्वे भक्तिमन्तः (जाताः) अथ अहं तद्वत् स्यां इति आकांक्षी सरस्वत्यभिख्यः (वक्ष्यमाणं उवाच) ।

**अर्थः**—श्रीनरसिंहसरस्वती गुरूंच्या शिष्यांत प्रसिद्ध जो सायंदेव त्याला नागनाथ नांवाचा पुत्र झाला. त्यापासून देवराव, त्याला गंगाधर व गंगाधराचा सुपुत्र तोच नामधारक होय. त्यानें मनाशीं विचार केला कीं माझे सर्व पूर्वज सद्गुरूचे परम भक्त झाले. मी मात्र मन्दभागी. आतां मात्र मी वाडवडिलांप्रमाणें भक्तिमान् झाल्याशिवाय राहणार नाहीं. अशी आकांक्षा बाळगून सरस्वती नांवाचा तो नामधारक पुढें म्हणतो... ॥ ९ ॥

**मां नो वेत्स्यपि नेक्षसे न शृणुषे सर्वज्ञ साक्षिन् विभो**
**नोपेक्षाऽर्हति सर्व मेऽज्ञनृपवत्त्वं नासि पूर्वप्रभो ।**
**किंदाता सतृडब्दवद्वितर मेऽतोऽर्थ्यं पिताम्बा गुरु-**
**स्त्वं रुष्टो भव माऽऽगतोऽस्मि शरणं ह्यागःक्षमां मे कुरु ॥१०॥**

**अन्वयः**—भो सर्वज्ञ ! मां नो वेत्सि अपि, भो साक्षिन् ! (मां) न ईक्षसे, विभो ! ( मद्वचः ) न शृणुषे, मे उपेक्षा न अर्हति, हे सर्व ! अज्ञनृपवत् त्वं नासि, हे पूर्वप्रभो ! (यः) सतृट् (सः) दाता किं ? अतः अब्दवत् मे अर्थ्यं वितर, त्वं पिताम्बा गुरुः (असि) रुष्टः मा भव, शरणं आगतः अस्मि, मे आगःक्षमां कुरु ॥

**अर्थः**—हे सर्वज्ञ दत्ता ! मला ओळखत रे कसा नाहींस ? तूं साक्षी असून माझ्याकडे दुर्लक्ष कां ? सर्वव्यापी असून माझा टाहो तुला ऐकूं कसा येत नाहीं ? नाहीं रे शोभत तुला ही उपेक्षा ! हे सर्वज्ञ प्रभो ! अज्ञानी राजाप्रमाणें कां तुला कोणाची ओळख पटत नाहीं ? जरी साक्षात् माझा तसा संबंध नसला तरी माझ्या पूर्वजांचे आपणच गुरु आहांत ना ? जो लालसेनें दान करतो तो खरा दाता होईल काय ? तर मग

माझ्याकडूनहि सेवेची अपेक्षा न करतां, मेघ जसा निरपेक्ष वृष्टि करतो तसेंच आपणहि मला दर्शन द्या ना ! माझे आई, वडील, गुरु आपणच आहांत. मजवर रागावूं नका. मी शरण आलेलों आहें. माझे सर्व अपराध पोटांत घाला. ॥ १० ॥

**द्विज इति नुतिमुक्त्वाऽगात्स मोहं समोऽहं**
**न्विति निजभजकेभ्यः शंसमानः समानः ।**
**नरहरिरथ तं चाश्वासयत्स्वप्न एव**
**प्रकटितनिजधाम्नाऽत्राखिलं स्वप्न एव ॥ ११ ॥**

**अन्वयः**—सः द्विजः इति नुतिं उक्त्वा मोहं अगात्, अहं समः नु, इति निजभजकेभ्यः शंसमानः नरहरिः अथ प्रकटितनिजधाम्ना तं स्वप्ने एव आश्वासयत्, अत्र अखिलं स्वप्नः एव ॥

**अर्थः**—अशा प्रकारें देवाची स्तुति गाऊन तो नामधारक ब्राह्मण मूर्छित झाला.—मी सर्वान्तर्यामी सम आहें—असें आपल्या भक्तांना पटविणाऱ्या त्या नरहरीनें स्वतःचें खरें स्वरूप दाखवून स्वप्नांतच त्या नामधारकाला धीर दिला. नरहरी म्हणजे दुसरा कोणी नसून ज्याच्या ठिकाणीं सर्व जगत् स्वप्नवत् मिथ्या आरोपित आहे तो सच्चिदानन्दरूप परमात्माच होय ! ॥ ११ ॥

**ततः प्रबुद्धः स तदा प्रबुद्धं**
**जगत्प्रसिद्धं स ददर्श सिद्धम् ।**
**विचिन्त्य दत्तं स मुदाऽवदत्तं**
**कं येन दत्तं सुदृशाऽन्यदत्तम् ॥ १२ ॥**

**अन्वयः**—ततः प्रबुद्धः सः प्रबुद्धं जगत्प्रसिद्धं सिद्धं ददर्श तदा दत्तं विचिन्त्य सः तं मुदा अवदत्, येन सुदृशा कं दत्तं अन्यत् अत्तम् ॥

**अर्थः**—स्वप्नांतून जागे होतांच नामधारकाला जगप्रसिद्ध सिद्धमुनींचें दर्शन झालें. तेव्हां, दत्ताचें चिंतन करून नामधारकानें त्या सिद्धांना कीं ज्यांनीं–स्नेहमय दृष्टीनें उल्हसित करून दुःखाचा विसर पाडला–आनंदित होऊन विचारलें. ॥ १२ ॥

**को भवान् कुत आयाति क्वैति भाति पितेति सः ।**
**पृष्टः सिद्धोऽवदच्छुद्धो बुद्धोऽनद्धोऽजमानसः ॥ १३ ॥**

**अन्वयः**—भवान् कः, कुतः आयाति, क्व एति, (मे) पिता इति भाति, इति पृष्टः, शुद्धः बुद्धः अनद्धः अजमानसः सः सिद्धः अवदत्...॥

**अर्थः**—आपण कोण ? कोठून आलांत ? जाणार कुणीकडे ? मला तर आपण प्रत्यक्ष पित्यासारखें वाटतां !–असें नामधारकानें विचारल्यावर रागद्वेषशून्य, ज्ञानी, त्यागी व ज्यांचें चित्त सदा दत्तचरणीं स्थिर आहे; असे ते सिद्ध मुनि उत्तर देतात...॥ १३ ॥

**गुरोश्चरित्रामृतशांततर्षः**
**सिद्धोऽयमीशेक्षणजातहर्षः ।**
**भूपृष्ठचारी विधिलब्धतोषः**
**सदा गुरोरस्य च संनिकर्षः ॥ १४ ॥**

**अन्वयः**—गुरोः चरित्रामृतशांततर्षः, ईशेक्षणजातहर्षः, भूपृष्ठचारी, विधिलब्धतोषः, सदा गुरोः अस्य च संनिकर्षः, (अयं सिद्धः) ॥

**अर्थः**—अमृततुल्य गुरुचरित्राच्या श्रवणानें ज्याच्या सर्व इच्छा तृप्त आहेत, श्रीदत्तदर्शनानें जो सुखी आहे, लोककल्याणार्थ पृथ्वीतलावर सर्वत्र संचार करून अयाचित वृत्तीनें मिळेल त्यावर संतुष्ट होणारा व श्रीगुरु दत्तात्रेय नेहमीं ज्याच्याजवळ असतात तोच हा सिद्ध नांवाचा मी समोर उभा आहें. ॥ १४ ॥

**तिष्ये गन्धर्वस्थश्चिन्तामणिरिव स नो गुरुर्द्विशयः ।**
**सभ्यो माधवतनयो योऽम्बागर्भाशयोदयोऽस्त्यभयः ॥ १५ ॥**

**अन्वयः**—तिष्ये गन्धर्वस्थः, चिन्तामणीः इव द्विशयः सभ्यः माधव-तनयः अम्बागर्भाशयोदयः अभयः सः गुरुः (अस्ति) ॥

**अर्थः**—जो कलियुगांत गाणगापुरीं राहून चिंतामणीप्रमाणें चिंतित मनोरथ पूर्ण करतो, जो दोन हाताचा व वंद्य आहे, ज्याच्या पित्याचें नांव माधव व आईचें अम्बा, असा तो निर्भय नरसिंहावतारी दत्त माझा गुरु आहे.

**दुसरा अर्थः**—जो कलियुगांत अश्वारूढ होतो, जो चिंतामणी-समान इच्छापूरक व पूज्य आहे, ज्याचा पिता शंकर व माता पार्वती आहे, असा तो विघ्ननाशन गजानन माझा गुरु आहे. ॥ १५ ॥

**नामधारक उवाच नो गुरुः**
**सोऽपि कष्टमसुखं च नो गुरु ।**
**वारयत्यपि कथं भवाम्बुधे–**
**स्तारयत्यवितथाद्याम्बुधे ॥ १६ ॥**

**अन्वयः**—नामधारकः उवाच, "सः नो अपि गुरुः, गुरु कष्टं असुखं च कथं नो वारयति । हे दयाम्बुधे ! अवितथात् भवाम्बुधेः कथं तारयति अपि ? ॥

**अर्थः**—यावर नामधारक म्हणतो, तोच दत्तराज आमचाहि गुरु आहे. असें असतांना तो आमचे अपार दुःख व त्रास कां बरें दूर करीत नाहीं ? सामान्य दुःखाच्या बाबतींत जर ही स्थिति तर मग, हे परम दयाळू सिद्धमहाराज ! असत्य संसारसागरांतून तो आम्हांस वांचविणार तरी कसा ? ॥ १६ ॥

उवाच सिद्धः शृणु वाचमद्धा
त्वं द्वैतविद्धात्मक इत्यबोद्धा ।
श्रद्धाविहीनश्च मुधा सुदीनः
सिद्धाधिपे दोषमु मा निधा नः ॥ १७ ॥

**अन्वयः**—सिद्धः उवाच, (मे) वाचं अद्धा शृणु, त्वं द्वैतविद्धात्मकः अबोद्धा श्रद्धाविहीनः सुदीनः च, नः सिद्धाधिपे उ मुधा दोषं मा निधाः॥

**अर्थः**—सिद्ध उत्तरतात–खरं सांगू ? नीट ऐक. तूं संशयी, अज्ञ, श्रद्धाहीन व अनुत्साही आहेस. अशी व्यक्ति इथें वा परलोकींहि कधींच सुखी होत नसते. तेव्हां निष्कारण मूढपणें आमच्या योगिराज दत्तगुरूला दोष देऊं नकोस. ॥ १७ ॥

रुष्टे गुरावस्य न कोऽपि पाता तुष्टे गुरावस्य न कोऽपि हन्ता ।
इत्यब्जयोनिः कलये शशंस स किं न देयात् सविमर्श शंस॥ १८॥

**अन्वयः**—गुरौ रुष्टे सति अस्य कः अपि पाता न, गुरौ तुष्टे सति अस्य कः अपि हन्ता न, इति अब्जयोनिः कलये शशंस, सः किं न देयात् ? हे सविमर्श ! शंस ! !

**अर्थः**—अरे, गुरु जर शिष्यावर संतापले तर कोणीहि त्याचें संरक्षण करूं शकत नाहीं व प्रसन्न झाले तर कोणीहि त्या शिष्यास मारूं शकत नाहीं. असें प्रत्यक्ष ब्रह्मदेवानेंच नाहीं का कलीला सांगितलें ? तर मग, असा समर्थ गुरु काय देऊं शकणार नाहीं बरें ? हे संशयी नामधारका ! तूंच सांग पाहूं. ॥ १८ ॥

काश्यां कष्टेन चेष्टार्पगत उत मुदा तं विशिष्टेष्टजुष्टं
पृष्ट्वा पृष्ट्वाऽपि रुष्टं स्वगुरुमविरतं प्रेष्ठमेतं गरिष्ठम् ।
मिष्टान्नाद्यैश्च तुष्ट्वा वरदहरिहरौ दीपकोऽतीत्य वेद-
धर्माख्यात् स प्रकृष्टर्द्धिमलभदुभयीमित्यवादीद्विधाता ॥ १९ ॥

**अन्वयः**—काश्यां दीपकः विशिष्टैःजुष्टं गरिष्टं प्रेष्टं रुष्टं एतं स्वगुरुं, अविरतं पृष्ट्वा पृष्ट्वा, कष्टेन उत च इष्टार्पणतः मिष्टान्नाद्यैः च तं तुष्ट्वा, वरदहरिहरौ अतीत्य, वेदधर्माख्यात् सः उभयीं प्रकृष्टर्द्धि अलभत्, इति विधाता ( कलिं ) अवादीत् ॥

**अर्थः**—काशी क्षेत्रांत दीपक नांवाच्या शिष्यानें, थोर प्रतिष्ठितांनींहि सेविलेल्या व सर्वत्र अत्यंत प्रिय अशा आपल्या वेदधर्म नांवाच्या गुरूची सतत एकवीस वर्षेंपर्यंत–काय हवं ? काय नको ? ते सर्व पुनः पुनः विचारावें, कष्ट करून वा भिक्षा मागून ती ती इच्छित पक्वान्नें द्यावीं, मलमूत्राचीं कामेंहि मनोभावें करावीं व गुरु रागावले तरी शांतच राहावें–अशा कडक रीतीनें इतकी सेवा केली कीं प्रत्यक्ष विष्णु व शंकर दीपकाला वर मागण्याचा आग्रह करूं लागले; पण, दीपकानें तिकडे दुर्लक्ष करून गुरूच्या सेवेंतच धन्यता मानली. नंतर त्या परम कृपालु वेदधर्मानें संतुष्ट होऊन दीपकाला इहपर लोकांतील उच्चतम ऐश्वर्य मिळवून दिलें. हीच कथा ब्रह्मदेवानें कलीला सांगितली आहे. ॥१९॥

**सत्त्वावृतो गुरुस्नेहभरितोऽस्ततमा द्युमान् ।**
**दीपको दीपक इव दिदीपे लोक उत्तमः ॥ २० ॥**

**अन्वयः**—सत्त्वावृतः गुरुस्नेहभरितः अस्ततमा द्युमान् दीपकः दीपकः इव लोके दिदीपे ॥

**अर्थः**—तैलपूर्ण दीप जसा अंधार नष्ट करून स्वप्रकाशानें शोभून दिसतो, तसा सत्त्वगुणी, गुरुप्रेमानें भारावलेला व तेजस्वी दीपक अज्ञान नष्ट झाल्यानें सर्व लोकांत अधिकच शोभला. ॥ २० ॥

**लौकिकस्य तु गुरोर्महिमैवं किं पुनस्त्रिवपुषोऽस्य हि मेवम् ।**
**कुर्वशेषविदि नूनमसूयां यं ह्यजीजनदघेरनसूया ॥ २१ ॥**

**अन्वयः**—लौकिकस्य तु गुरोः एवं महिमा, किं पुनः अस्य त्रिव-

पुषः, एवं हि नूनं अशेषविदि असूयां मा कुरु, यं हि ऋषेः अनसूया अजीजनत् ॥

**अर्थः**—सिद्ध म्हणतात–सामान्य मानवी गुरूचा (वेदधर्माचा) जर हा महिमा, तर मग ब्रह्मा विष्णु-महेश-रूपी असणाऱ्या दैवी दत्तगुरूचा महिमा काय वर्णावा ? आणि म्हणून सर्वज्ञ दत्ताला नसते दोष तूं देऊं नकोस. प्रत्यक्ष महासाध्वी अत्रिमुनींची पत्नी अनसूया ही दत्तगुरूची माता आहे, हें लक्षांत ठेव. ॥ २१ ॥

**अतनुः सतनुः कुत आस तनुस्त्रितनुर्नृतनुः कथमत्रिजनुः ।**
**इति पृष्ट उवाच स तच्चरणं मतिजुष्टमवेक्ष्य जगच्छरणम् ॥ २२ ॥**

**अन्वयः**—त्रितनुः तनुः अतनुः सतनुः नृतनुः कुतः आस, कथं अत्रिजनुः, इति पृष्टः सः मतिजुष्टं जगच्छरणं तच्चरणं अवेक्ष्य उवाच ॥

**अर्थः**—स्वतः सच्चिदानंदरूप, सर्वव्यापक व अशरीरी असूनहि परमेश्वर कोणत्या कारणास्तव मानव देहानें साकार झाले ? विशेषतः अत्रिऋषीकडेच कां अवतीर्ण झाले ? हा नामधारकाचा प्रश्न ऐकून सिद्ध-महाराज, विश्वपालक व अंतःकरणसेवित अशा दत्तचरणाचें ध्यान करून उत्तरतात... ॥ २२ ॥

**लीलयैक इह भाति स स्वया मायया पुरुतनुर्ह्यमायया ।**
**नैव मुह्यति यदर्चको द्विज स्वैरगः स वरदानतो द्विजः ॥ २३ ॥**

**अन्वयः**—सः लीलया एकः अपि इह स्वया मायया पुरुतनुः भाति, हि अमायया यदर्चकः न एव मुह्यति, हे द्विज ! स्वैरगः सः वरदानतः द्विजः ( अभूत् ) ॥

**अर्थः**—परमेश्वर स्वतः एकच असला तरी लीलेनें या जगतांत स्वतःच्या मायाशक्तीमुळें तो अनेकरूप भासतो. पण, जो भक्तियुक्त अंतःकरणाचा सेवक आहे तो मात्र देहाला आत्मा मानण्यांत वंचित होत नाहीं. हे ब्राह्मणा ! तो स्वच्छंदचारी परमेश्वर मुख्यतः वरदाना-मुळेंच अत्रिमुनीकडे द्विजरूपानें अवतरला. ॥ २३ ॥

**सासूयात्मीयशक्तीरितकहरिहराख्याऽतिथिभ्योऽनसूया**
**तत्कामा याप्तकामा परिहृतवसनान्नं ददौ बालदृष्ट्या ।**
**बाला जातास्तदा ते सपदि सुवनितातीर्थविख्यापकास्त-**
**द्वत्सोत्थौ वत्सलत्वाद्रसमपि ददतुर्लोचनाभ्यां च साकम् २४**

**अन्वयः**—सासूयात्मीयशक्तीरितकहरिहराख्यातिथिभ्यः आप्तकामा अपि तत्कामा या अनसूया बालदृष्ट्या परिहृतवसना अन्नं ददौ । तदा ते सुवनितातीर्थविख्यापकाः सपदि बालाः जाताः, तद्वत्सोत्थौ वत्सलत्वात् लोचनाभ्यां च साकं रसं अपि ददतुः ॥

**अर्थः**—सावित्री, लक्ष्मी व पार्वती या आपल्या मत्सरी स्त्रियांच्या हट्टामुळें अत्रींच्या आश्रमीं अतिथीरूपानें आलेल्या ब्रह्मा-विष्णु-महेशांना अनसूयेनें स्वतः पूर्णकाम असूनहि केवळ त्यांच्या इच्छेसाठीं—अतिथि हे बालक आहेत—अशा भावनेनें नग्न स्थितींत भिक्षा वाढली. साध्वी स्त्री म्हणजे पवित्रतम तीर्थ हें दाखवून देणारे ते देव तत्काल बालक झालेहि ! तेव्हां, त्या बाळांना अनसूयेनें वात्सल्यानें प्रेमाश्रुपूर्वक स्तन-पान दिलें. ॥ २४ ॥

**अथ सा विभून्सुयशसा पयसा**
**शमिताशिषोऽत्रिदयिता शयितान् ।**
**प्रमितात्मपालकहितान्प्रमिता-**
**क्षरगीति शायितवती वरगीः ॥ २५ ॥**

**अन्वयः**—वरगीः सा अत्रिदयिता सुयशसा पयसा शमिताशिषः प्रमितात्मपालकहितान् शयितान् विभून् प्रमिताक्षरगीति शायितवती ॥

**अर्थः**—मधुरवाणीच्या अनसूयेनें आपल्या सुप्रसिद्ध दुधानें, झोंप आलेल्या ब्रह्मा-विष्णु-महेशांना तृप्त करून व नंतर लहानशा पाळण्यांत ठेवून प्रमिताक्षरावृत्तांत गात गात त्यांना निजविलें. ॥ २५ ॥

**पालकाहितसुबालकालकालोचनात्कुटिललोचना न सा ।**
**सद्दृशेर्न हि विपर्ययोऽमताऽसद्दृशिस्तु कुटिलाऽपि चादृता२६**

**अन्वयः**—सा पालकाहितसुबालकालकालोचनात् कुटिललोचना न, हि सद्दृशेः विपर्ययः न, असद्दृशिः तु आदृता अपि कुटिला, ( अतएव ) अमता ॥

**अर्थः**—पाळण्यांत निजविलेल्या त्या मनोहर बाळांचे कुरळे केस पाहूनहि अनसूयेची नजर मात्र कुटिल झाली नाहीं. कारण, मुळांत चांगल्या दृष्टीची स्त्री कधींच चळत नाहीं. पण, कुटिल नजरेची स्त्री कितीहि आदर केला तरी ती वाममार्गीतच राहते नी म्हणूनच अशी स्त्री सज्जनांना तिरस्करणीय असते. ॥ २६ ॥

**श्रुत्वोद्गीतं गेहमाप्तस्तदाऽत्रि-**
**र्ज्ञात्वा सर्वं तान्स तुष्टाव सत्री ।**
**पुत्रीभूता नौ भवन्तोऽद्य दिष्ट्या**
**सृष्ट्याद्याः स्वो वोऽद्य धन्यौ सुदृष्ट्या ॥ २७ ॥**

**अन्वयः**—सत्री अत्रिः गेहं आप्तः उद्गीतं श्रुत्वा, सर्वं ज्ञात्वा, तान् तुष्टाव । भो सृष्ट्याद्याः भवन्तः नौ अद्य पुत्रीभूताः एतत् दिष्ट्या; अद्य वः सुदृष्ट्या धन्यौ स्वः ॥

**अर्थः**—गृहस्थाश्रमी अत्रिमुनींनीं घरीं आल्यावर अनसूयेचें उच्च स्वरांतील गायन ऐकून व एकंदर सर्व घटना ज्ञानदृष्टीनें ताडून त्या बालकांची स्तुति केली. सृष्टीच्या उत्पत्ति-स्थिति-लयाला कारण असलेल्या हे देवांनो ! तुम्हीं आज आमचे पुत्र झालां, हें फार उत्तम झालें. आज आम्ही तुमच्या शुभ दृष्टीनें धन्य झालों...॥ २७ ॥

**यो विश्वं सृजति च पाति हन्त्यधीशो**
**यो विश्वं विशति च वीक्षते त्र्यधीशः ।**

**योऽध्यक्षो गुणरहितोऽप्यजो गुणात्मा**
**योऽज्ञेयस्त्वमसि परा गतिः स आत्मा ॥ २८ ॥**

**अन्वयः**—यः अधीशः विश्वं सृजति, पाति, हन्ति; यः त्र्यधीशः विश्वं विशति वीक्षते च, यः अजः गुणरहितः अपि अध्यक्षः गुणात्मा, यः अज्ञेयः सः त्वं परा गतिः आत्मा असि ॥

**अर्थः**—जो परमात्मा विश्वाचा पालक, रक्षक व नाशकहि आहे, जो त्रिगुणात्मक मायेचा अधिपति जीवरूपानें जगतांत व्यक्त होऊनहि साक्षी म्हणून पाहतो, जो अजन्मा व निर्गुण असूनहि प्रत्यक्ष व साकार झाला, जो प्रत्यक्ष, अनुमानादि कोणत्याहि प्रमाणांनीं अगम्य आहे असा तो सर्वान्तर्यामी व पुनर्जन्म चुकविणारा आत्मा तूंच आहेस. ॥ २८ ॥

**वरं वृणीष्वेत्युदितोऽथ स स्तुतैः**
**परंतपः सत्यनुमोदितोऽमृतैः ।**
**नुतं सुतं वव्र इमे तथेति तं**
**मतं जगुर्जग्मुरथो यथागतम् ॥ २९ ॥**

**अन्वयः**—अथ स्तुतैः वरं वृणीष्व इति उदितः सः परंतपः सत्यनुमोदितः अमृतैः नुतं सुतं वव्रे, इमे मतं तं तथा इति जगुः, अथो यथागतं जग्मुः ॥

**अर्थः**—या स्तुतीनें संतुष्ट झालेल्या देवांनीं—वर माग—असें म्हटल्यावर जितेंद्रिय अत्रींनीं अनसूयेनें सुचविल्यावरून सर्व देवांना वंद्य अशा पुत्ररत्नाची इच्छा व्यक्त केली. ते देवहि माननीय अत्रि महर्षींना—ठीक आहे—असें म्हणून आपापल्या स्थानीं निघून गेले. ॥ २९ ॥

**अजानसूत जगति गतिदा इह येऽत्रिजाः ।**
**साऽदादत्रेर्द्युमत्तेज आधाद्गर्भमथो द्विज ॥ ३० ॥**

**अन्वयः**—सा अत्रेः द्युमत् तेजः अदात्, हे द्विज ! गर्भं आधात्, अथ काले अजान् अपि तान् असूत, ये इह गतिदाः अत्रिजाः (स्युः) ॥

**अर्थः**—ईशकृपें अनसूयेनें अत्रीपासून दैदीप्यमान तेज ग्रहण केलें. आणि हे नामधारका! गर्भधारणा झाल्यावर दहाव्या महिन्यांत वस्तुतः जन्मादि विकारशून्य अशा त्या पुत्रांना जन्महि दिला कीं जे परोपकारी अत्रिपुत्र जगतांत दत्त, चन्द्र व दुर्वास या नांवांनीं परिचित झाले.॥३०॥

**मार्गे मार्गप्रदो मार्गशीर्षेऽभूच्छ्रुतिमार्गितः ।**

**सौम्यः सौम्यदिने पूर्णः पूर्णमास्यां निशामुखे ॥ ३१ ॥**

**अन्वयः**—मार्गप्रदः मार्गे, श्रुतिमार्गितः मार्गशीर्षे, सौम्यः सौम्य-दिने, पूर्णः पूर्णमास्यां निशामुखे अभूत्॥

**अर्थः**—भक्तांचे मार्गदर्शक असल्यानें मार्गशीर्ष महिन्यांत, वेदांनीं शोधिल्यानें मृगशीर्ष नक्षत्रावर, आल्हादक म्हणून बुधवारीं व सकल ऐश्वर्यांनीं पूर्ण म्हणून पौर्णिमेला प्रदोषसमयीं श्रीदत्तराज जन्मले. ॥३१॥

**दत्तो मया तेऽहमितीह दत्तः**
**पूर्वोऽपरश्चन्दनतश्च चन्द्रः ।**
**दुर्वासआख्यः प्रथितस्तृतीयः**
**साक्षात् प्रभुर्दत्त इहाद्वितीयः ॥ ३२ ॥**

**अन्वयः**—मया ते अहं दत्तः इति पूर्वः दत्तः, चन्दनतः च अपरः चन्द्रः, तृतीयः दुर्वासआख्यः प्रथितः, इह अद्वितीयः दत्तः साक्षात् प्रभुः॥

**अर्थः**—हा मी तुला दिलेलाच आहे-असें विष्णूंनीं म्हटल्यानेंच जणूं प्रथम दत्तराज व दुसरा आल्हादकारी चन्द्र झाला. तिसरा जो दुर्वास त्याची चांगलीच ख्याति आहे. यांपैकीं विशेषतः अद्वितीय दत्त-राज हेच साक्षात् भगवान् होत. ॥ ३२ ॥

**यद्वर्जुनालर्कमुखोऽदुदाद्यो**
**वंशौषधीस्त्वृद्धिकृदिन्दुराप्यः ।**
**तमाम्बरीषाक्ष इवाम्बरीषं**
**शप्त्वाऽप्यजं निन्य उतान्यथात्वम् ॥ ३३ ॥**

**अन्वयः**—यद्वर्जुनालर्कमुखोद्धृत् आद्यः वंशौषधीस्वृद्धिकृत् आप्यः इन्दुः ( द्वितीयः ) तप्ताम्बरीषाक्षः इव अम्बरीषं शप्त्वा ( यः ) अजं अपि अन्यथात्वं उत निन्ये ( सः तृतीयः ) ॥

**अर्थः**—यदु, कार्तवीर्यार्जुन, अलर्क इत्यादि भक्तांना तारणारा दत्तात्रेय हा पहिला; कुलाची व वनस्पतींची वृद्धि करणारा जलरूप चंद्र हा दुसरा व तिसरा म्हणजे तापलेल्या लाल लोहाप्रमाणें नेत्र असणारा क्रोधी दुर्वास होय. या दुर्वासानें—पुनः पुनः जन्म घेशील—असा अंबरीष राजास शाप दिला असतां, भक्तकैवारी विष्णूंनीं तो शाप आपल्यावर उलटवून घेतल्यानें अजन्मा असूनहि त्याला वारंवार जन्म घ्यावे लागले. ॥ ३३ ॥

**नवसुधा वसुधातल आहृता–ऽद्य भवता भवतापहृता सता ।**
**इयमथाऽन्यकथां कथयेत्ययं द्विजनुतो विरतोऽप्यवदद्यव्ययम्**

**अन्वयः**—अद्य सता भवतापहृता भवता वसुधातले इयं नवसुधा आहृता, अथ अन्यकथां कथय, इति द्विजनुतः विरतः अपि व्ययं अवदत् ॥

**अर्थः**—संसारताप शमविणाऱ्या आपल्यासारख्या साधूंनीं आज पृथ्वीतलावर आणलेलें हें कथामृत अभिनव आहे. तेव्हां, कृपा करून आणखी कांहीं कथा सांगा—अशी नामधारकानें प्रार्थना केल्यावरून इतका वेळ स्तब्ध राहिलेले सिद्ध पुनः अनेक शुभ घटनांनीं भरलेलें गुरुचरित्र सांगूं लागले. ॥ ३४ ॥

**सकलेश्वरे दिवमिते सकले सकले प्रवेशनमिहास कलेः ।**
**कुतलेऽप्यवातरदृषिः सुकुले विकलेऽहसा सति जने सकले ३५**

**अन्वयः**—सकलेश्वरे सकले दिवं इते इह सकले कुतले कलेः प्रवेशनं आस, तदा सकले जने अंहसा विकले ऋषिः अपि सुकुले अवातरत् ॥

**अर्थः**—बळरामासह श्रीकृष्ण निजधामीं निघून गेल्यावर कलीनें संपूर्ण जगतावर आपला अंमल बसविला. त्यामुळें सर्व लोक पातकांनीं दीन झाले असतां दत्तात्रेयांना सत्कुलांत पुनः अवतार घ्यावा लागला. ३५

**प्राच्यदेशेऽत्रिजस्तारवाच्य एत्य स्म याचते।**
**श्राद्धाहेऽन्नं द्विजस्य प्राक् श्राध्दाद्गेहमदीनवाक् ॥ ३६ ॥**

**अन्वयः**—अदीनवाक् तारवाच्यः अत्रिजः प्राच्यदेशे द्विजस्य गेहं एत्य श्राद्धाहे श्राद्धात् प्राक् अन्नं याचते स्म ॥

**अर्थः**—अधिकारी वाणीच्या ओंकाररूपी दत्तराजांनीं पूर्व देशांत पीठापूर नगरांतील राजा नांवाच्या द्विजाच्या घरीं येऊन श्राद्धदिनीं श्राद्ध होण्यापूर्वीच भिक्षा मागितली. ॥ ३६ ॥

**सुमतिर्नाम्नाऽस्य सती सुमतिः**
**सुदती कृत्वाऽतिथये सुनतिम् ।**
**यशसाऽऽनर्च प्रेम्णा यशसा**
**सरसाऽतो द्यौर्व्याप्ता महसा ॥ ३७ ॥**

**अन्वयः**—सुदती सुमतिः सती नाम्ना अपि सुमतिः अतिथये सुनतिं कृत्वा प्रेम्णा यशसा आनर्च, अतः सरसा द्यौः महसा यशसा व्याप्ता ॥

**अर्थः**—सुंदर दांतांच्या व–सुमति–हें नांव सार्थ करणाऱ्या त्या द्विजपत्नीनें अतिथिरूप दत्ताला प्रणाम करून श्राद्धापूर्वीच भाक्तिपूर्वक श्राद्धान्न देऊन संतुष्ट केलें. त्यामुळें सुमतीची कीर्ति त्रैलोक्यांत दुमदुमली व म्हणूनच तिनें श्राद्धापूर्वी केलेलें भिक्षा-दान अनुचित म्हणतां येणार नाहीं. ॥ ३७ ॥

**कुपुत्रदुःखं परिहर्तुमस्याः सुपुत्रतां दत्त इतः सदस्याः ।**
**श्रीपादमाहुस्तमु योऽर्च्यवर्यः श्रीपा दयार्द्रेक्षणजीवितार्यः ३८**

**अन्वयः**—कुपुत्रदुःखं परिहर्तुं अस्याः. सुपुत्रतां दत्तः इतः, तदा सदस्याः तं श्रीपादं आहुः, यः अर्च्यवर्यः श्रीपाः दयार्द्रेक्षणजीवितार्यः ॥

**अर्थ:**—एक पुत्र आंधळा तर दुसरा पांगळा अशा या संततीमुळें असमाधानी असलेल्या सुमतीच्या दुःखपरिहारासाठीं दत्त तिच्या उदरीं अवतरले. त्याचेंच नांव ज्योतिषांनीं श्रीपाद असें ठेवलें. जो श्रीपाद सर्व देवांत वरेण्य असून ज्यानें आपल्या दयार्द्र दृष्टीनें चोरांना मारून एका द्विजास सजीव केलें, तोच हा प्रसिद्ध श्रीपाद. ॥ ३८ ॥

**व्रात्योऽपि योऽव्रात्य इवात्र वेद-**
**वेद्योऽप्यखेदं खलु वेद वेदम् ।**
**कलाधराभः सकलाः कलाश्च**
**विद्याधरार्च्योऽपि च सर्वविद्याः ॥ ३९ ॥**

**अन्वय:**—व्रात्यः अपि यः अत्र अव्रात्य इव, वेदवेद्योऽपि वेदं अखेदं वेद खलु, कलाधराभः सकलाः कलाः च वेद, विद्याधरार्च्यः अपि सर्वविद्याः वेद ॥

**अर्थ:**—स्वतः शुद्ध असलेले विष्णु लौकिक दृष्टीनें संस्कार नसल्यानें व्रात्य असूनहि या श्रीपादावतारांत संस्कारामुळें जणूं अव्रात्य झाले. खरोखर वेदांनीं ज्यांस जाणावें त्यानेंच सर्व वेद विनासायास जाणले. चंद्राप्रमाणें आल्हादक कांतीच्या श्रीपादावतारी विष्णूंनीं समग्र कला हस्तगत केल्या. बृहस्पतीसारख्या विद्वान् देवांनींहि विद्याप्राप्तीस्तव ज्याची आराधना करावी त्यानेंच सर्व विद्या अवगत केल्या. ॥ ३९ ॥

**शुशुभे त्रिवृतः श्रीमान् सुशुभेलः स बुद्धिमान् ।**
**या त्वस्य वाक् स्वतो मिष्टा किमु श्रेष्ठाऽथ शास्त्रतः ॥ ४० ॥**

**अन्वय:**—त्रिवृतः श्रीमान् सुशुभेलः बुद्धिमान् सः शुशुभे, या तु अस्य वाक् स्वतः मिष्टा, अथ शास्त्रतः श्रेष्ठा इति किमु (वक्तव्यम्) ॥

**अर्थ:**—मौंजीबंधनानें सुंदर दिसणारा व मधुर वाणीचा बुद्धिमान् श्रीपाद खुलून दिसला. स्वभावतःच मधुर असलेली त्याची वाणी शास्त्राध्ययनानें अधिक श्रवणरम्य झाली तर त्यांत नवल तें काय ? ॥ ४० ॥

आजन्मात्मजसंस्कारं कर्तुकामौ मुदाऽन्वहम् ।
तातौ गणयतो वारानियं हि प्रकृतिस्तयोः ॥ ४१ ॥

**अन्वयः**—आजन्मात्मजसंस्कारं कर्तुकामौ तातौ मुदा अन्वहं वारान् गणयतः इयं हि तयोः प्रकृतिः ॥

**अर्थः**—आपल्या जन्मादिविकारशून्य पुत्राचा विवाहसंस्कार करावा, या इच्छेनें श्रीपादाचे आई, वडील (राजा व सुमति) स्वभावानुसार दररोज आनंदानें दिवस मोजूं लागले. ॥ ४१ ॥

श्रीपाद आनन्दभरो जगाद
श्रीवेदसद्वादविदस्तवादः ।
योगश्रियं तात वृणेऽम्ब मान्यां
भोगश्रियं नैव कदाऽप्यमान्याम् ॥ ४२ ॥

**अन्वयः**—श्रीवेदसद्वादवित् अस्तवादः आनंदभरः श्रीपादः जगाद, हे तात ! भो अम्ब ! मान्यां योगश्रियं वृणे, अमान्यां भोगश्रियं कदा अपि न एव ॥

**अर्थः**—श्रीमान् यथार्थ वेदज्ञानी व प्रतिवादींना निरुत्तर करणारा श्रीपाद आनंदातिशयानें म्हणतो–बाबा ! आई ! साधूंना मान्य अशा योगश्रीला मी अवश्य वरेन. पण, सज्जनांना अमान्य अशा भोगश्रीला वरण्यास मी कदापि तयार नाहीं. ॥ ४२ ॥

उक्त्वा तदेति विरराम स धर्मसेतुः
श्रुत्वा पिताऽस्य वचनं द्विजवंशकेतुः ।
किं प्रव्रजिष्यति सुतोऽयमितीतकम्प्रो
विप्रोऽप्यकम्पत विनाऽनिलमेकपुत्रः ॥ ४३ ॥

**अन्वयः**—सः धर्मसेतुः इति उक्त्वा विरराम, तदा द्विजवंशकेतुः एकपुत्रः पिता अस्य वचनं श्रुत्वा, अयं सुतः प्रव्रजिष्यति किं इति इत-कम्प्रः अनिलं विना अपि अकम्पत ॥

**अर्थः**—धर्मतारक श्रीपाद इतकें बोलून थांबला असतां, त्याचें तें व्याख्यान ऐकून, खऱ्या अर्थानें ज्याला एकच पुत्र आहे अशा त्या द्विजश्रेष्ठ पित्याला–आतां हा लाडका लेक संन्यासाच्या वेडानें घर सोडून जातो काय–या विचारानें वायूवांचूनच कांपरें भरलें. ।। ४३ ।।

**वाचा मोचातिरसया हर्षदः सोऽप्यमर्षदः ।**
**इति मत्वाऽब्रवीत्पुत्रमम्बा निम्बातितिक्तगुम् ।। ४४ ।।**

**अन्वयः**—मोचातिरसया वाचा हर्षदः अपि सः अमर्षदः इति मत्वा अम्बा निम्बातितिक्तगुं पुत्रं अब्रवीत् ।।

**अर्थः**—पिकलेल्या केळापेक्षांहि रसाळ अशा वाणीनें नेहमीं रिझविणारा श्रीपाद आज मात्र कर्णकटु बोलतो आहे, हें पाहून विवाहानुचित असें कडुलिंबाहून कडू बोलणाऱ्या श्रीपादाला आई म्हणते...४४

**त्वमेकपुत्रोऽस्यत एधि गेही**
**यजाध्वरैर्यैश्च कृतीह देही ।**
**कृत्वाऽप्तपुत्रः पितृसांप्ररायं**
**व्रजान्यथा प्राप्स्यसि चान्तरायम् ।। ४५ ।।**

**अन्वयः**—त्वं एकपुत्रः असि, अतः गेही एधि, अध्वरैः यज, यैः देही इह, कृती, आप्तपुत्रः पितृसांपरायं कृत्वा व्रज, अन्यथा च अन्तरायं प्राप्स्यसि ।।

**अर्थः**—इतर निरुपयोगी अंध व पंगु पुत्रांत तूंच एक खरोखरी आम्हांस पुत्र आहेस. तेव्हां लवकर गृहस्थाश्रमी हो. त्यामुळें यज्ञयागादि कर्मांनीं देवांना संतुष्ट करतां येऊन तूं कृतार्थ होशील. पुत्रवान् होऊन पितृऋणांतूनही मुक्त होशील. आणि मग संन्यास घे. पण, ऋणांतून मुक्त न होतांच संन्यासी होशील तर मात्र पुनर्जन्म घ्यावा लागेल. ।। ४५ ।।

**श्रीपदाह कति लालिताः सुता**
**नापि मेऽम्ब वनिता मता वृताः ।**
**ते क ताः क जननि क चाप्यहं**
**पान्थसंगम इवैष संगमः ॥ ४६ ॥**

**अन्वयः**—श्रीपत् आह, हे अम्ब ! ( मया पूर्वं ) कति सुताः न लालिताः ? मे मताः वनिताः अपि न वृताः ? हे जननि ! ते क, ताः क, अहं अपि च क ? एषः संगमः पान्थसंगमः इव ॥

**अर्थः**—सृष्टीच्या जन्म-मरण परंपरेला अनुसरून श्रीपाद उत्तर-तात–आई ! पूर्वजन्मांत मी माझ्या मुलांना स्नेहानें गोंजारलें नसेल किंवा प्रिय वनिता वरल्या नसतील असें का तुला वाटतें ? हें सर्व कांहीं केलें होतें. पण, आज तीं मुलें, त्या स्त्रिया कुठें व मी कुठें ? आई ! याचाच अर्थ हा नव्हे काय, कीं हा सर्व स्त्रीपुत्रांचा सहवास म्हणजे प्रवाशांच्या भेटीसारखा तात्पुरता क्षणभंगुर आहे ! ॥ ४६ ॥

**सांपरायाधिलाभोऽम्ब ते न्यासतः**
**सद्गतिर्मेऽप्यतः काऽऽप्तिरन्यासतः ।**
**इत्युदीर्याग्रजौ स्वक्षिपादौ तदा**
**संविधायाऽऽह सेव्यौ गुरू वां सदा ॥ ४७ ॥**

**अन्वयः**—हे अम्ब ! न्यासतः ते सांपरायाधिलाभः, मे अपि अतः सद्गतिः, असतः अन्या का आप्तिः, इति उदीर्य अग्रजौ स्वक्षिपादौ संविधाय आह, सदा वां गुरू सेव्यौ ॥

**अर्थः**—हे आई ! माझ्या संन्यासानें तुला क्रियेपेक्षां पारलौकिक श्रेष्ठतर नरजन्म लाधणार असल्यानें अधिकच लाभ होईल. शिवाय मलाहि सद्गति मिळेल. मिथ्या संसारांत गुरफटून काय साधणार बरें ? असें बोलून व स्वबंधूंना दृष्टि आणि चरणांच्या लाभानें अव्यंग करून त्यांना श्रीपाद म्हणाले—बाबांनो ! तुम्ही सदा मातापितरांच्या सेवेंत तत्पर राहा. ४७

**पुत्रैः पिताऽर्च्यो हि गृहिपुत्रदेवः श्रुतो यतः ।**
**मातृदेवो भवेत्यादिश्रुतेर्माताऽधिका ततः ॥ ४८ ॥**

**अन्वयः**—पुत्रैः पिता अर्च्यः, हि गृहिपुत्रदेवः श्रुतः, मातृदेवो भव, इत्यादिश्रुतेः ततः माता अधिका ॥

**अर्थः**—गृहस्थाश्रमी पुत्राला पिता देवतुल्य असल्याचा उल्लेख वेदांत असल्यानें जरी पिता हा पुत्रांना वंद्य असला तरी तत्पूर्वी वेदांत 'मातृदेवो भव' असा प्रथम उच्चार असल्यानें विशेषतः माताच अधिक वंदनीय आहे. ॥ ४८ ॥

**स्वरूपं दर्शयित्वाऽम्बामाश्वास्य विजहार सः ।**
**गामटन्नेत्य गोकर्णं जनशोकं जहार सः ॥ ४९ ॥**

**अन्वयः**—अम्बां स्वरूपं दर्शयित्वा आश्वास्य च सः विजहार, गां अटन् गोकर्णं एत्य सः जनशोकं जहार ॥

**अर्थः**—पूर्वस्मरणासाठीं आईला आपलें दत्तरूप दाखवून व—कांहीं चिंता करूं नको—असें सांत्वन करून श्रीपादांनीं सर्वसंगपरित्याग केला. नंतर पृथ्वीवर तीर्थें हिंडत हिंडत गोकर्णक्षेत्रीं येऊन त्यांनीं तत्त्वज्ञानामृतानें तेथील लोकांचा भवताप दूर केला. ॥ ४९ ॥

**स्वं लिङ्गं दत्तमीशा निशिचरपतये गीतहर्षाद् गणेशा**
**व्याजाद्विष्ण्वाज्ञया तन्निहितमिह पुराऽभून्महाबल्यभिख्यम् ।**
**क्षेत्रं गोकर्णकं चान्वहमिह हि सह स्वैरिहाऽऽस्तेऽत्र मुक्ता**
**चण्डालीत्याह मित्रसहनरपतये गौतमस्तद्धि सोऽगात् ॥ ५० ॥**

**अन्वयः**—ईशा गीतहर्षात् निशिचरपतये स्वं लिङ्गं दत्तं विष्ण्वाज्ञया गणेशा व्याजात् तत् इह पुरा निहितं महाबल्यभिख्यं गोकर्णकं च क्षेत्रं अभूत्, इह हि ( ईशः) स्वैः सह अन्वहं आस्ते, अत्र चण्डाली मुक्ता इति गौतमः मित्रसहनरपतये आह, तत् हि सः अगात् ॥

**अर्थः**—भोलानाथ शंकरानें रावणाला त्याच्या स्तुतीनें खूष होऊन आत्मलिंग दिलें. ही गोष्ट अनिष्ट समजून विष्णूच्या आज्ञेनें ब्रम्हचारी मिषानें रावणाच्या संध्यासमयीं तें लिंग गणपतीनें घेऊन भूमीवर ठेविलें. नंतर रावणानें तें उपटण्याचा प्रयत्न करूनहि न निघाल्यानें महाबळेश्वर व गायीच्या कानासारखें मुरडल्यानें गोकर्ण या नांवानें हें क्षेत्र प्रसिद्ध झालें. इथें प्रत्यक्ष शंकर सर्व परिवारासह नेहमीं राहतात. या क्षेत्रांत एक अत्यंत महापापी चांडाळीण तिच्या हातून अजाणतांहि बिल्वपत्र शिवलिंगावर पडल्यानें मुक्त झाली. ही कथा प्रख्यात गौतम महर्षींनीं वसिष्ठाच्या शापानें ब्रह्मराक्षस झाल्यावर त्या अवस्थेंत ब्रह्महत्येचें पातक लागलेल्या मित्रांसह राजाला सांगितलेली आहे असें हें पुण्यक्षेत्र म्हणून श्रीपाद गोकर्णांत गेले. ॥ ५० ॥

**अपर्णापस्य तत्क्षेत्रमपर्णा यन्निवासिनः ।**
**गोकर्णाख्येऽवसत्त्र्यब्दं गोकर्णाकृतिलिङ्गभाक् ॥ ५१ ॥**

**अन्वयः**—अपर्णापस्य तत् क्षेत्रं, यन्निवासिनः अपर्णाः, गोकर्णाख्ये गोकर्णाकृतिलिङ्गभाक् त्र्यब्दं अवसत् ॥

**अर्थः**—पार्वतीपति शंकराचें तें क्षेत्र आहे. तेथील नागरिक ऋणत्रयांतून ( पितृऋण, देवऋण व ऋषिऋण ) मुक्त होतात असें माहात्म्य असलेल्या गोकर्णक्षेत्रीं श्रीपाद गोकर्णाकार शिवलिंगाचें पूजन करीत तीन वर्षें राहिले. ॥ ५१ ॥

**स विघने गगने गमने गुरुर्मतिमतीव नतीकृतगोतरुः ।**
**सुखकरोऽप्यकरोदकरोगहृत् द्रुतविलम्बितगोऽखिलगोऽघहृत् ५२**

**अन्वयः**—अखिलगः अघहृत् अकरोगहृत् द्रुतविलम्बितगः सुखकरः अपि अतीव नतीकृतगोतरुः सः गगने विघने सति गमने मतिं अकरोत् ॥

**अर्थः**—सर्वव्यापी, पापहारी, दुःखरोगनिवारक, कामाच्या निकडीप्रमाणें शीघ्रचालीच्या व भक्तांच्या कामनापूर्तीनें कल्पवृक्षालाहि लाज-

विणाऱ्या श्रीपादगुरूंनीं आकाश निरभ्र असतांना कृष्णातीरीं जाण्याचा बेत केला. ॥ ९२ ॥

**कृष्णातीरं ययौ भक्ततृष्णाहृच्छ्रीपदस्ततः ।**
**ययौ कुरुपुरं तारं सुयौवनतनूद्वहः ॥ ५३ ॥**

**अन्वयः**—भक्ततृष्णाहृत् श्रीपदः ततः कृष्णातीरं ययौ, सुयौवन-तनूद्वहः तारं कुरुपुरं ययौ ॥

**अर्थः**—भक्तकामनापूरक व चित्ताकर्षक शरीराचे श्रीपाद गुरु कृष्णा-तीरीं येऊन पुढें मोक्षप्रद अशा कुरुपुरीं (कुरुगड्डी) रवाना झाले. ॥९३॥

**स्वयं तीर्थरूपोऽपि तीर्थप्रकाशं**
**करिष्यन्स्वगत्या जनानुद्धरिष्यन् ।**
**स सस्नौ सुरादेः करोति स्म तृप्तिं**
**सुरर्ष्यादिवर्गः करोत्यस्य तृप्तिम् ॥ ५४ ॥**

**अन्वयः**—स्वयं तीर्थरूपः अपि तीर्थप्रकाशं करिष्यन् स्वगत्या जनान् उद्धरिष्यन् सः सस्नौ, सुरर्ष्यादिवर्गः अस्य तृप्तिं करोति सः सुरादेः तृप्तिं करोति स्म ॥

**अर्थः**—स्वतः श्रीपाद तीर्थरूप असूनहि तीर्थांचा (पुण्यक्षेत्रांचा) महिमा लोकांना कळावा व स्वतःच्या चरणधूलीनें लोकोद्धार व्हावा या इच्छेनें त्यांनीं कृष्णातीर्थांत स्नान केलें. सर्व देव व ऋषींनीं ज्यास वंदनानें संतुष्ट करावें त्या श्रीपादगुरूंनीं त्या सर्वांचें तर्पण केलें. ॥९४॥

**रेजे राजेव यतिः क्षितितलभद्रासनः शशिच्छत्रः ।**
**दिग्धृतयशःप्रकीर्णः स्वच्छन्दगतिः क्षमेट् समानश्च ॥ ५५ ॥**

**अन्वयः**—क्षितितलभद्रासनः शशिच्छत्रः दिग्धृतयशःप्रकीर्णः स्वच्छन्दगतिः क्षमेट् समानः यतिः राजा इव रेजे ॥

**अर्थः**—भूतल हेंच ज्याचें सिंहासन, चंद्र ज्याचें छत्र, दिगन्त कीर्ति हींच जणूं चामरें, स्वच्छन्दगामी, शांत वृत्तीचे व सर्व प्राणिमात्रांचे

ठायीं समान वागणारे यतिराज श्रीपाद एखाद्या सार्वभौम राजाप्रमाणें शोभून दिसले.

आसमुद्र पृथ्वीतलावर ज्याचें सिंहासन आहे, चंद्राप्रमाणें शुभ्र छत्र-धारी, दिगन्त कीर्तीचा, अकुण्ठित गति असलेला, शांत व सर्व दर्जाच्या प्रजेला समान लेखणारा जसा आदर्श सम्राट असावा, त्याप्रमाणें श्रीपाद-राज शोभले. ॥ ५५ ॥

**विश्वस्ता वनितार्दिता सकुसुता मर्तुं नदीमागता**
**काचित्तां तु गतागतापहृदयं सद्भाषितैः सांत्वयन् ।**
**आवन्तेयकचन्द्रसेनमणिसन्मन्दप्रदोषव्रता–**
**ख्यानैस्तत्कुसुतं व्यधाद्बुधमदादिष्टं वरं श्रीवरः ॥ ५६ ॥**

**अन्वयः**—विश्वस्ता अर्दिता काचित् वनिता सकुसुता मर्तुं नदीं आगता; गतागतापहृत् अयं आवन्तेयकचन्द्रसेनमणिसन्मन्दप्रदोषव्रता-ख्यानैः सद्भाषितैः तां सान्त्वयन् तत्कुसुतं बुधं व्यधात्; श्रीवरः इष्टं वरं अदात् ॥

**अर्थः**—कोणी एक दुःखी विधवा आपल्या मूढ पुत्रासह जीव देण्यासाठीं नदीवर आली असतां, जन्ममरण दूर करणाऱ्या श्रीपाद-स्वामींनीं आपल्या परिणामकारक वाणीनें अवन्ति देशाच्या चंद्रसेन राजानें आचरिलेल्या शनिप्रदोष व्रताचें आख्यान सांगून तिचें सांत्वन केलें. नंतर तिच्या मंदबुद्धि पुत्राला विद्वान् करून तिला असा वरहि दिला कीं, तुला जन्मान्तरीं माझ्यासारखा पुत्र होईल. ॥ ५६ ॥

**स यतिरथ भवान्तरेऽपि तस्यै**
**निजसदृशोत्तमपुत्रलब्धयेऽजः ।**
**अकथयदभयं शनिप्रदोष-**
**व्रतमथ सापि च तं जगौ दयालुम् ॥ ५७ ॥**

**अन्वयः**—अजः सः यतिः अथ भवान्तरे अपि तस्यै स्वसदृशोत्तमपुत्रलब्धये अभयं शनिप्रदोषव्रतं अकथयत्, अथ च सा अपि तं दयालुं जगौ ॥

**अर्थः**—नंतर निर्विकार श्रीपाद यतींनीं त्या द्विजस्त्रीला पुढील जन्मांत स्वतःसारखा गुणसंपन्न पुत्र लाभावा म्हणून भयनाशक असें शनिप्रदोषाचें व्रत सांगितलें. यानंतर परम दयाळू श्रीपादस्वामींना ती स्त्री स्तुतिपूर्वक म्हणाली... ॥ ५७ ॥

**भवत्तोऽभवत्तोकरक्षाऽकरक्षा**
**नमस्ते नमस्ते प्रसीद प्रसीद ।**
**स्मरामि स्मरामित्रपादं त्रपादं**
**न मन्ये त्वदन्येशितारं सुतारम् ॥ ५८ ॥**

**अन्वयः**—भवत्तः तोकरक्षा अकरक्षा अभवत्, नमस्ते नमस्ते प्रसीद,प्रसीद,स्मरामित्रपादं त्रपादं स्मरामि, सुतारं त्वदन्येशितारं न मन्ये॥

**अर्थ**—महाराज ! आपल्यामुळेंच माझ्या मूढ मुलाचें रक्षण होऊन दुःखहि लयास गेलें. हे यतिराया ! तुम्हांला त्रिवार प्रणाम असो. पामरावर अशीच कृपा असूं द्या. आपल्या आज्ञेप्रमाणें मी हरेक शनिप्रदोषसमयीं मदनारि शंकराचें लज्जाहर चरण पूजीन. भक्ततारक असा अन्य देव आपल्याशिवाय कोणी असेलसें वाटत नाहीं. ॥ ५८ ॥

**अणोरणिम्ने महतो महिम्ने**
**श्रीपादनाम्ने परतत्त्वसीम्ने ।**
**नमोऽस्तु भूम्नेऽमितसन्महिम्ने**
**सच्चित्कधाम्ने दितमोहदाम्ने ॥ ५९ ॥**

**अन्वयः**—अणोः अणिम्ने महतः महिम्ने भूम्ने परतत्त्वसीम्ने अमितसन्महिम्ने सच्चित्कधाम्ने दितमोहदाम्ने श्रीपादनाम्ने नमः अस्तु ॥

**अर्थः**—सर्वांत सूक्ष्म अशा परमाणूपेक्षांहि जो अति सूक्ष्म व सर्वांत विस्तृत अशा आकाशापेक्षांहि विस्तृत असून जो सर्वोच्च तत्त्वाची मर्यादा व सर्वान्तर्यामी आहे, ज्याचा महिमा अगाध असून ज्यानें सर्व मोहपाश तोडले आहेत अशा त्या सच्चिदानंदरूपी व श्रीपाद नांव धारण करणाऱ्या आपणांस नमस्कार असो. ।। ५९ ।।

**स्तुत्वेति साऽभ्यनुज्ञाता नत्वेशं गृहमागता ।**
**त्यक्त्वेहां भेज इतरां कृत्वेशव्रतमादरात् ।। ६० ।।**

**अन्वयः**—सा ईशं इति स्तुत्वा नत्वा अभ्यनुज्ञाता गृहं आगता आदरात् ईशव्रतं कृत्वा इतरां ईहां त्यक्त्वा ( श्रीपादं ) भेजे ।।

**अर्थः**—याप्रमाणें त्या विधवा द्विजस्त्रीनें श्रीपादस्वामींची स्तुति केल्यावर त्यांच्या अनुज्ञेनें ती घरी गेली. तिथें तिनें श्रद्धापूर्वक शिवव्रत आचरून व इतर सर्व कामनांचा त्याग करून श्रीपादयतींची सेवा केली. ।। ६० ।।

**ततः प्रेत्य साऽम्बाऽभवद्विप्रकन्या**
**प्रभुः सोऽप्यदृश्योऽभवद्यो वदान्यः ।**
**स्वतुल्यांग्यभावात्स्वसत्यत्वसिद्ध्यै**
**स्थितोऽत्रापि गुप्तोऽपि भक्तेष्टसिद्ध्यै ।। ६१ ।।**

**अन्वयः**—ततः सा प्रेत्य अम्बा विप्रकन्या अभवत्; यः वदान्यः सः अपि अदृश्यः अभवत्; स्वतुल्यांग्यभावात् स्वसत्यत्वसिध्यै गुप्तः अपि भक्तेष्टसिद्ध्यै अत्र अपि स्थितः ।।

**अर्थः**—कालान्तरानें त्या स्त्रीनें दिवंगत झाल्यावर 'अम्बा' या नांवानें ब्राह्मणकन्येचा जन्म घेतला. उदार अंतःकरणाचे श्रीपादहि अदृश्य झाले. कारण, स्वतःसारखा पुत्र होण्याचें जें सत्य वचन त्या स्त्रीला दिलेलें आहे, त्याच्या परिपालनासाठीं स्वतःसारखा अन्य देह-

धारी दुर्मिळ असल्यानेंच ते गुप्त झाले. तथापि भक्तांच्या कामनापूर्तीसाठीं वस्तुतः श्रीपाद कुरवपुरींच राहिलेले आहेत. ॥ ६१ ॥

**लब्धसंकल्पितेष्टार्थं द्विजं यान्तं गुरुं प्रति ॥**
**व्याजमैत्र्याऽनुगाः कंचिज्जघ्नुश्चोरा हि निर्जने ॥ ६२ ॥**

**अन्वयः**—लब्धसंकल्पितेष्टार्थं, गुरुं प्रति यान्तं कंचित् द्विजं, चोराः व्याजमैत्र्या अनुगाः निर्जने तं जघ्नुः हि ॥

**अर्थः**—गुरुकृपेनें स्वमनोरथ पूर्ण झाल्यानें श्रीपादगुरूंच्या दर्शनार्थ कुरवपुरास निघालेल्या एका ब्राह्मणाचा कपटमैत्रीनें जवळ राहिलेल्या चोरांनीं निर्जन अरण्यांत वध केला. ॥ ६२ ॥

**सद्यो विद्योतितस्तत्र शंकरः किंकरार्तिहा ।**
**सहसा तरसाऽऽगत्य श्रीपदो विपदोऽहरत् ॥ ६३ ॥**

**अन्वयः**—किंकरार्तिहा शंकरः श्रीपदः तत्र सद्यः विद्योतितः सहसा तरसा आगत्य विपदः अहरत् ॥

**अर्थः**—भक्तांचे दुःखहारी व कल्याणकारी श्रीपाद तात्काळ त्या ठिकाणीं प्रगटले व लगेच त्या मृत ब्राह्मणाजवळ जाऊन त्यांनीं त्याचें संकट दूर केलें. ॥ ६३ ॥

**यन्मूर्ध्न्यभान्निर्मलचन्द्रहास-**
**स्तेनोज्झितो दस्युषु चन्द्रहासः ।**
**क्षणेन सर्वानकरोद्गतासून्-**
**स्मृत्याऽऽत्मतां योऽनयदुद्गतासून् ॥ ६४ ॥**

**अन्वयः**—यन्मूर्ध्नि निर्मलचन्द्रहासः अभात्; तेन दस्युषु चंद्रहासः उज्झितः क्षणेन सर्वान् गतासून् अकरोत् यः स्मृत्या उद्गतासून् आत्मतां अनयत् ॥

**अर्थः**—मस्तकीं शुभ्र चंद्रकोर शोभलेल्या श्रीपादांनीं त्या चोरांवर अर्धचंद्राकार खड्ग चालवून त्यांना क्षणार्धांतच गतप्राण केलें. जे श्रीपाद

गुरु अंतकाळीं स्वत:चें केवळ स्मरण करणाऱ्यांनाहि सायुज्यमुक्ति देतात, ते त्या चोरांनाहि अमुक्तच कसे ठेवतील ? ॥ ६४ ॥

**एकस्तत्रागतश्चोरः शरणं करुणं जगौ ।**
**तस्करोऽहं न हि भवान्तस्करो भास्करोऽपि सन् ॥ ६५ ॥**

**अन्वयः—**तत्र एकः चोरः शरणं आगतः करुणं जगौ अहं तस्करः न हि; भवान् भास्करः अपि सन् तस्करः ।

**अर्थः—**त्यांपैकीं एक चोर शरण येऊन दीन वाणीनें श्रीपादांना म्हणाला, " महाराज, मी चोर नाहीं. तेव्हां, आपण मला मारूं नका. उलट आपणचसूर्याप्रमाणें स्वयंप्रकाशी असूनहि चोर आहांत; कसें ते पाहा... ॥ ६५ ॥

**महाचोरो हि भगवान्विलीयान्तर्विशन् द्युमान् ।**
**रहस्यमप्यघं धीमान्सर्वं हरति नो भवान् ॥ ६६ ॥**

**अन्वयः—**हि भगवान् अपि महाचोरः; द्युमान् अपि विलीय अन्तः विशन् धीमान् भवान् रहस्यं सर्वं अघं हरति ॥

**अर्थः—**इतर चोर कुटुंबपोषणासाठीं तरी चोरी करतात. पण, आपण मात्र सामान्य चोर नसून महाचोर आहांत. कारण, स्वयंप्रकाशी असूनही अदृश्यपणें देहांत शिरून सर्व कांहीं अज्ञेय असा पाप-संग्रह लुटणारे आपण अत्यंत चतुर चोर आहांत.

[ सर्वैश्वर्यसंपन्न दत्तमहाराजांना पोटासाठीं चोरी करण्याचें काय कारण ? उलट, ते तर परोपकारार्थ वरीलप्रमाणें अलौकिक चोरी करतात म्हणून ते महाचोर होत ! ] ॥ ६६ ॥

**जन्मप्रभृति न स्तेयं ज्ञातं सुकृतमर्जितम् ।**
**तेन धर्मेण भगवन्नुध्दृतोऽस्मि न संशयः ॥ ६७ ॥**

**अन्वयः—**जन्मप्रभृति स्तेयं न ज्ञातं; सुकृतं अर्जितं; तेन धर्मेण भगवन् उद्धृतः अस्मि, संशयः न ॥

**अर्थः**—महाराज, जन्मल्यापासून चोरी करणें मला माहीत नाहीं. कांहीं पुण्य मी संपादिलें असेल त्या पुण्याईनेंच आपण माझा उद्धार केला यांत संशय नाहीं. ॥ ६७ ॥

**पदान्मुखाच्च भवतो गङ्गा धर्मश्च निर्गतः ।**
**गङ्गा मज्जयति स्पष्टं धर्म उद्धरति स्फुटम् ॥ ६८ ॥**

**अन्वयः**—भवतः पदात् गङ्गा मुखात् च धर्मः निर्गतः; गंगा मज्जयति स्पष्टं, धर्म उद्धरति स्फुटं ॥

**अर्थः**—आपल्या चरणकमलांतून गंगेचा व मुखांतून धर्माचा उगम झालेला आहे. पैकीं गंगा ही तर पाप बुडविणारी व धर्म तर पाप्याला उद्धरणारा आहे; हें काय माहीत नाहीं ? ॥ ६८ ॥

**क्वाहं मन्दमतिः क्वेमे त्वद्गुणा भूकणाधिकाः ।**
**तथापि गुणवर्धिन्या दयया तेऽर्हताऽऽगता ॥ ६९ ॥**

**अन्वयः**—मन्दमतिः अहं क्व; भूकणाधिकाः इमे त्वद्गुणाः क्व; तथापि ते गुणवर्धिन्या दयया अर्हता आगता ॥

**अर्थः**—वस्तुतः मंदबुद्धीचा मी कुठें व पृथ्वीच्या रजःकणाइतके असंख्य असे आपले गुण कुठे ! तरीहि आपलें जें अल्पसें गुणवर्णन मला करतां आलें याचें खरें कारण म्हणजे आपली 'गुण वाढविणारी असामान्य कृपा' होय.'' ॥ ६९ ॥

**श्रीपादोऽपि सकारुण्यां पुण्यामाकर्ण्य तद्गिरम् ।**
**दत्त्वाऽभयं ह्यभयकृदजो द्विजमजीवयत् ॥ ७० ॥**

**अन्वयः**—अभयकृत् अजः श्रीपादः अपि सकारुण्यां पुण्यां तद्गिरं आकर्ण्य अभयं दत्वा द्विजं अजीवयत् ॥

**अर्थः**—याप्रमाणें त्या चोराची दीन व पावन वाणी ऐकून, भीति निरस्त करणाऱ्या व जन्मादिविकारशून्य अशा श्रीपादांनीं त्या चोरास अभय दिलें व त्या मृत ब्राह्मणासहि सजीव केलें. ॥ ७० ॥

**हततस्करशोणितशोणनिभे सति पूषणि सन्मणिवध्युदिते ।**
**प्रभुरन्तरधाद्वसुधाविबुधः स च बुद्धवदुत्थित ईशदृशा ॥ ७१ ॥**

**अन्वयः**—हततस्करशोणितशोणनिभे सन्मणिवत् पूषणि उदिते सति प्रभुः अन्तरधात्; सः वसुधाविबुधः च ईशदृशा बुद्धवत् उत्थितः ॥

**अर्थः**—त्या मारलेल्या चोरांच्या रक्ताप्रमाणें लालबुंद व लाल माणकाप्रमाणें दिसणारें सूर्यबिम्ब उगवतांच श्रीपादराज अदृश्य झाले. त्याच सुमारास प्रभुकृपेनें तो ब्राह्मणहि (वस्तुतः मृत झाला होता तरी) जणूं झोपेंतून जागा झाल्याप्रमाणें उठून बसला. ॥ ७१ ॥

**हतशेषमुखात्सर्वं श्रुत्वा नत्वाऽस्तुवद्द्विजः ।**
**हरिं हरे कुतश्चोरगोचरोऽभूर्न मे कुतः ॥ ७२ ॥**

**अन्वयः**—हतशेषमुखात् सर्वं श्रुत्वा नत्वा द्विजः हरिं अवदत्; हरे ! कुतः चोरगोचरः अभूः मे कुतः न ॥

**अर्थः**—मारलेल्या चोरांत ज्याला जीवदान लाभलें होतें, त्याच्या तोंडून घडलेला सर्व वृत्तान्त ऐकल्यावर श्रीपादांना वंदन करून तो ब्राह्मण म्हणतो—देवा ! काय म्हणावें बरें तुला ? अरे, चोराला दर्शन देतोस नि मला मात्र जागा होतांच दर्शन न देतां अदृश्य होतोस ! ७२

**कस्तेऽर्हतीहितं वक्तुं ब्रह्माद्या अपि मोहिताः ।**
**कृतं मे सुहितं तात स्ववित्तस्य निमित्ततः ॥ ७३ ॥**

**अन्वयः**—ते ईहितं वक्तुं कः अर्हति, ब्रह्माद्याः अपि मोहिताः हे तात स्ववित्तस्य निमित्ततः मे सुहितं कृतम् ॥

**अर्थः**—हे प्रभो ! प्रत्यक्ष ब्रह्मादि देवहि जिथें आश्चर्यानें थक्क झाले तिथें तुझ्या चरित्राचें गुणवर्णन करण्यास कोण समर्थ आहे ? देवा ! माझ्या द्रव्यरक्षणाच्या निमित्तानें आपण माझ्यावर फार उपकार केले आहेत. ॥ ७३ ॥

त्वां विनेतरमदभ्रमुदारं
नेक्ष ईड्न सममभ्रमुदारम् ।
मन्य एष मितदो ह्यतिकामं
त्वं ददासि च करोष्यतिकामम् ॥ ७४ ॥

**अन्वयः**—हे ईट् त्वां विना अदभ्रं उदारं न ईक्षे, अभ्रमुदारं त्वया समं न मन्ये, एषः मितदः, त्वं अतिकामं ददासि, अतिकामं करोषि च॥

**अर्थः**—स्वामी महाराज! आपणांशिवाय अन्य दानशूर कोण आहे? दानाच्या बाबतींत तुमची मेघराजाशीं तुलना करावी तर तेंहि अनुचितच. कारण, मेघ हा ठराविक काळांत मर्यादितच वर्षाव करणारा; उलट आपण मात्र भक्ताला इच्छिल्यापेक्षां अधिक देताच, शिवाय त्याला निष्कामहि करता. ॥ ७४ ॥

शतमुखमुखाः स्तोतुं यं त्वां प्रवृत्तधियोऽपि ते
विमुखविमुखा ह्रीता जाता अपीदमवेक्ष्य ते ।
सुगुण गुणनां कर्तुं वर्ते सुमन्दमतिर्द्युम-
न्नहह कलये पाणिभ्यां किं कलानिधिमाधिहन् ॥ ७५ ॥

**अन्वयः**—हे सुगुण! शतमुखमुखाः यं त्वां स्तोतुं प्रवृत्तधियः अपि विमुखविमुखाः ह्रीताः जाताः इदं अवेक्ष्य अपि सुमन्दमतिः अहं ते गुणनां कर्तुं वर्ते; हे द्युमन्। अहह! हे आधिहन्! पाणिभ्यां कलानिधिं कलये किम्॥

**अर्थः**—हे गुणवान् दत्ता! तुझी सहस्रमुखांनीं स्तुति करण्यास निघालेले शेषादि देवहि थकून लज्जित झाले. हें काय मला ज्ञान नाहीं? पण, असें असूनहि मंदबुद्धीचा मी पुनः तुझें गुणवर्णन करण्यास प्रवृत्त झालों. काय म्हणावें माझ्या या वेडेपणाला? हे तेजस्वी, व्यथाहर प्रभो! आकाशांतील चन्द्र हातांनीं घेण्यासारखाच माझा हा गुणवर्णनाचा प्रयत्न हास्यास्पद नाहीं काय? ॥ ७५ ॥

द्विज इति नुतिमुक्त्वा तत्पुरं प्राप्य चक्रे
द्विजभुजिमथ निन्ये श्रीपदस्तं पदं स्वम् ।
अकलि कलिमलघ्नं येन चित्रं चरित्रं
सजलजलदनीलः श्रीपदः श्रीप्रदो नः ॥ ७६ ॥

**अन्वयः**—द्विजः इति नुतिं उक्त्वा तत्पुरं प्राप्य द्विजभुजिं चक्रे अथ श्रीपदः तं स्वपदं निन्ये; येन कलिमलघ्नं चित्रं चरित्रं अकलि सजलजलद-नीलः सः श्रीपदः नः श्रीप्रदः अस्तु ॥

**अर्थः**—याप्रमाणें स्तुति करून कुरुगड्डी क्षेत्रांत पोहोंचतांच त्या ब्राह्मणानें पूर्वीच्या संकल्पाप्रमाणें ब्राह्मणांना भोजन दिलें. नंतर श्रीपादयतींनींहि त्या द्विजास आत्मस्वरूपांत स्थान दिलें. ज्यानें कलियुगांतील पाप नष्ट करणारें विस्मयकारक चरित्र निर्माण केलें, असा तो सजल मेघाप्रमाणें नीलवर्णाचा श्रीपाद गुरु आपणां सर्वांस ऐश्वर्य देवो. ॥ ७६ ॥

या पूर्वोक्ता द्विजसुवनिता विप्रकन्याऽथ जाता
साऽम्बा साम्बार्चनसुनिरता माधवस्यास कान्ता ।
विप्रस्योभौ मतिगुणलसद्रूपलक्ष्मस्वभावौ
प्रेम्णा बद्धात्मनयनधियौ चक्रवत्सुस्वभावौ ॥ ७७ ॥

**अन्वयः**—या पूर्वोक्ता द्विजसुवनिता सा अथ विप्रकन्या जाता; सा अम्बा साम्बार्चनसुनिरता माधवस्य विप्रस्य कान्ता आस; उभौ चक्रवत् सुस्वभावौ मतिगुणलसद्रूपलक्ष्मस्वभावौ प्रेम्णा बद्धात्मनयनधियौ (अभूताम्) ॥

**अर्थः**—जी पूर्वीची जीव देण्यास निघालेली द्विजस्त्री होती, ती आतां एका विप्राची अम्बा नामक कन्या झाली होती. शिवपूजनांत तन्मयतेनें काल घालवीत असतांच ती माधव नांवाच्या एका द्विजाची धर्मपत्नी झाली. चक्रवाकांच्या जोडप्याप्रमाणें सुस्वभावी असे अंबा व माधव परस्परांशीं बुद्धि, गुण, रूप, स्वभाव इत्यादि सर्वच बाबतींत इतके एक-

रूप होते कीं, दृढ प्रेमामुळें त्या उभयतांचे आत्मा, नेत्र, बुद्धि हेहि सर्व जणूं एकत्र गुंफलेले होते. ॥ ७७ ॥

**तौ सुस्वरौ सुवसनौ सुमुखौ सुवृत्तौ**
**सव्रीडहावसुखवीक्षणहृष्टचित्तौ ।**
**तुच्छीकृतत्रिदशनर्मसुखौ सुगात्रौ**
**देवाविवासतुरुभावपि भद्रपात्रौ ॥ ७८ ॥**

**अन्वयः**—तौ सुस्वरौ सुवसनौ सुमुखौ सुवृत्तौ सव्रीडहावसुखवीक्षण-हृष्टचित्तौ तुच्छीकृतत्रिदशनर्मसुखौ सुगात्रौ उभौ अपि देवौ इव भद्रपात्रौ आसतुः॥

**अर्थः**—उभयतां अंबा व माधव मधुर स्वराचे, सुंदर वस्त्रधारी सुस्वरूपी, सदाचारी, आकर्षक शरीरसौष्ठव असलेले व विशेषतः सलज्ज हावभाव व प्रीतिमय कटाक्ष यांमुळें ते सदा इतके खुललेले असत कीं, देवांचें स्वर्गीय क्रीडासुखहि त्यांना तुच्छ वाटे. एकंदरींत अंबा-माधवाची जोडी देवांच्या मंगलमय जोडप्याप्रमाणें होती यांत संशय नाहीं. ॥७८॥

**अथ साऽमृतभागिनी परा परमानन्दभरादरा वरात् ।**
**निदधौ परतेज उत्तमं वरदानाच्छुशुभेऽपि सत्तमम् ॥ ७९ ॥**

**अन्वयः**—अथ परा परमानन्दभरादरा अमृतभागिनी सा वरात् वरदानात् उत्तमं परतेजः निदधौ; ततः सा अपि सत्तमं शुशुभे ॥

**अर्थः**—गुरुकृपेमुळें परमानंदमय ईश्वराविषयीं आदर बाळगणाऱ्या त्या सज्जन स्त्रीनें रतिसुख उपभोगीत असतां श्रीपादस्वामींच्या वरदाना-मुळें अलौकिक तेज धारण केलें. त्यामुळें ती अधिकच आकर्षक दिसूं लागली. ॥ ७९ ॥

**द्वैतवादे प्रवृत्ते तत्कुचयोरिव वादिनोः ।**
**कृष्णोऽधात्तन्मुखे नैल्यं माध्यमे चापि गौरवम् ॥ ८० ॥**

**अन्वयः**—वादिनोः इव तत्कुचयोः द्वैतवादे प्रवृत्ते भ्रूणः तन्मुखे नैल्यं माध्यमे अपि च गौरवं अधात् ॥

**अर्थः**—द्वैतवादी द्वैतवाद करण्यास उद्युक्त झाले असतां एखादा कुशल अद्वैतवादी ज्याप्रमाणें खंडनानें त्या द्वैतवाद्यांचीं मुखें काळीं करतो व माध्यमिकाच्या ( शून्यवादीच्या ) मतावर गौरव दोष देतो, त्याप्रमाणें या अंबेच्या गर्भानें द्वैतवाद्यांप्रमाणें असलेल्या तिच्या स्तनाग्रावर काळे-पणा व माध्यमांत ( उदरांत ) स्थूलता निर्माण केली—म्हणजेच अंबा गर्भवती झाली. ॥ ८० ॥

**सर्वगोऽपि खलु गर्भगोऽभव-**
**न्निष्कलोऽपि सकलोपमोऽभवः ।**
**मायिकोपमचरित्र ईश्वरे**
**नात्र चित्रमतिमायिके परे ॥ ८१ ॥**

**अन्वयः**—सर्वगः अपि गर्भगः अभवत्; अभवः निष्कलः अपि सकलोपमः अभवत्; अत्र परे मायिकोपमचरित्रे अतिमायिके ईश्वरे चित्रं न ॥

**अर्थः**—सर्वव्यापी असूनहि जो गर्भांत व्यक्त झाला, त्याचप्रमाणें संसारतारक व निष्कल ( अंशरहित ) असूनहि जो सकल ( षोडशकला-वान् ) जीव झाला अशा त्या ईश्वराविषयीं आश्चर्य मानण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण, असंगी व जादूगाराप्रमाणें चित्रविचित्र अशा त्या अतिमायावी ईश्वराला काय अशक्य आहे बरें ? ॥ ८१ ॥

**हृदयद्वययोगतः स्मृतं दयनीयं खलु दोहदं मतम् ।**
**अहहाऽत्र विचित्रमूह्यतेऽहृदयोऽजोऽप्ययथावदीक्ष्यते ॥ ८२ ॥**

**अन्वयः**—हृदयद्वययोगतः मतं दयनीयं दोहदं स्मृतं खलु; अहहा ! अत्र विचित्रं ऊह्यते; अहृदयः अजः अपि अयथावत् ईक्ष्यते ॥

**अर्थः**—मातृहृदय व गर्भस्थ जीवहृदय या दोघांचा योग आला कीं रूढीप्रमाणें डोहाळे पुरविले पाहिजेत असा सर्वसाधारण संकेत आहे. पण ज्याला हृदयादि अवयवच नाहींत, जो जन्मादिविकारशून्य आहे अशा त्या गर्भस्थ परमात्म्याविषयीं सर्वथा विपरीत म्हणजे अवयवादिकांची कल्पना करणें हें विचित्रच नव्हे काय ? ॥ ८२ ॥

**महाभूतं भूतं तदहमिह बाह्यान्तरगतं**
**मतं ब्रह्मादीनामनिशमसकृच्चेष्टयति यत्**
**यतो भीता जाताः पवनमुखदेवाः प्रचलिता**
**विरूपं सर्वादं यदिति वदति स्म द्विजसती ॥ ८३ ॥**

**अन्वयः**—भतं न, तत् महाभूतं अहं, यत् इह बाह्यान्तरगतं मतं ब्रह्मादीनां अपि अनिशं असकृत् चेष्टयति; यतः पवनमुखदेवाः भीताः जाताः प्रचलिताः; यत् विरूपं सर्वादं तत् अहं इति द्विजसती वदति स्म॥

**अर्थः**—[ दैवी गर्भ धारण केलेली अंबा कांहींशी बेहोष होऊन तात्त्विक बोल काढीत होती. तेव्हां, सामान्य लोकांनीं तिला भूतबाधा झाली आहे, या समजुतीनें विचारलेल्या—अंगांत भूत आलें काय ? असल्यास तें कुठलें ? हिच्याच अंगांत तें कां आलें ? तें कसें आहे ?—इत्यादि प्रश्नांना ती द्विजस्त्री अंबा उत्तर देते...]

...मी साधें सुधें भूत नाहीं. तर आंत बाहेर सर्वत्र व्यापून उरलेलें जें अविनाशी महाभूत तें मी आहें. या अंबलाच नव्हे तर ब्रह्मादि सर्व देवांनाहि जें हालचाल करावयास लावतें तें महाभूत मी आहें. ज्याला भिऊन वायु, इन्द्र, अग्नि वगैरे सर्व देवताहि आपापल्या कार्यांत मग्न असतात, जें सर्वभक्षक व भयानक स्वरूपाचें आहे असें तें महाभूत ब्राह्मणांच्या मंत्रतंत्रांना दाद देईल किंवा त्यांनीं दिलेल्या बळीवर खूष होऊन निघून जाईल, हें कसें शक्य आहे बरें ! ॥ ८३ ॥

क्षणलवचपलं किलायुरेषा
तनुरस्थ्यामिषमांसयुङ्मलाढ्या ।
चलदलजलबिन्दुवच्छ्रियस्ता
मृगसलिलैस्तुलितं त्विहार्थजातम् ॥ ८४ ॥

**अन्वयः**—आयुः क्षणलवचपलं किल, एषा तनुः अस्थ्यामिषमांसयुक् मलाढ्या, ताः श्रियः चलदलजलबिन्दुवत्; इह अर्थजातं मृगसलिलैः तुलितम् ॥

**अर्थः**—[ तर मग तुझी अपेक्षा तरी काय? ऐहिक सुखाची की विरक्तीची? या लोकांच्या प्रतिप्रश्नाला अंबा उत्तरते...]

...आयुष्य तर अत्यंत क्षणभंगुर आहे. हा देहहि बाहेरून हाडें, मांस व रक्त यांनीं नी आंतून मलमूत्रांनीं भरलेला आहे. संपत्तिसुद्धां कमलपत्रांवरील जलबिन्दूंप्रमाणें अस्थिर असून जगतांतील सर्वहि पदार्थ मृगजळाप्रमाणें सर्वथा मिथ्याच आहेत. ॥ ८४ ॥

योगामृतं क्व क्व गलल्लालस्त्रीमुखचुम्बनम् ।
क्व समाधिः क्व व्यवायो मोहो जडधियामयम् ॥ ८५ ॥

**अन्वयः**—योगामृतं क्व, गलल्लालस्त्रीमुखचुम्बनं क्व, समाधिः क्व, व्यवायः क्व, अयं जडधियां मोहः ॥

**अर्थः**—अष्टसिद्धींचें सामर्थ्य असलेलें योगामृत कुठें व लाळ गळत असलेल्या बीभत्स स्त्रीमुखाचें चुंबनसुख कुठें? अपूर्व स्वरूपानंद देणारें समाधि-सुख कुठें व क्षणांत विरस करणारें संभोग-सुख कुठें? असें असूनहि जडबुद्धींचा संभोग-सुखाकडेच जो ओढा आहे याला कारण मोह हेंच होय. ॥ ८५ ॥

शमदमसमबन्धुताऽत्युदारा
न न भुवने विरतीतरा हि दाराः ।

न्यसनसमसुधाशनं न चान्य-
न च सुवृषो ह्यभयार्पणात्तथाऽन्यः ॥ ८६ ॥

**अन्वयः**—अत्युदारा शमदमसमबन्धुता न, भुवने विरतीतराः दाराः न हि, व्यसनसमसुधाशनं अन्यत् न च, तथा अभयार्पणात् अन्यः सुवृषः न च ॥

**अर्थः**—[ तर मग, तुला प्रिय तरी काय आहे ? असें लोकांनीं पुनः विचारल्यावर अंबा म्हणते...]

शम, दमासारखे ( शांति व इंद्रियनिग्रह ) सर्व श्रेष्ठ बंधु, विरति-सारखी (वैराग्य) स्त्री व संन्यासासारखे अमृतपान या जगतांत कोठेंहि नाहीं. इतकेंच नव्हे तर, अभयदानासारखा अन्य धर्महि कोणता नाहीं ( अर्थात् हें सर्व मला अभीष्ट आहे. ). ॥ ८६ ॥

सुधापमानो विषमेव मानो
भिक्षासमानं न च सोमपानम् ।
तदेव मेऽभीष्टतरं परं नो
हृदाऽपि काङ्क्षे कुसुखं न वीक्षे॥ ८७ ॥

**अन्वयः**—अपमानः सुधा, मानः विषं एव, भिक्षासमानं सोमपानं न च, तत् एव मे अभीष्टतरं, परं हृदा अपि न काङ्क्षे कुसुखं न वीक्षे ॥

**अर्थः**—दुसऱ्यानें केलेला अपमान हा अमृताइतका प्रिय व मान हा विषासारखा त्याज्य आहे. तसेंच, माधुकरीसमान सोमपानहि मी अन्य मानीत नाहीं. अर्थात् हें सर्वच मला अत्यंत प्रिय असल्यानें इतर कशाचीहि तिळमात्र इच्छा नाहीं. विषयसुखाचें तर नांवच नको.॥८७॥

एवं ब्रुवन्ती सुदती सती सा
न साधु मन्येऽन्यदुदारहासा ।
वासालयं भासयती स्वभासा
न साध्वसं स्म क्व च वीक्षते सा ॥ ८८ ॥

**अन्वयः**—एवं ब्रुवन्ती सुदती उदारहासा सा सती अन्यत् साधु न मन्ये, सा स्वभासा वासालयं भासयती साध्वसं क्व च न वीक्षते स्म ॥

**अर्थः**—याप्रमाणें तात्त्विक भाषण करणाऱ्या त्या हंसऱ्या सुंदर अंबेला वैराग्यानुकूल पदार्थापेक्षां अन्य कांहींहि प्रिय वाटलें नाहीं. आपल्या अलौकिक गर्भाच्या तेजानें राहतें घर लखलखित करणाऱ्या त्या अंबेला स्त्रीसुलभ भीतीहि वाटेनाशी झाली. ॥ ८८ ॥

**विज्ञाय लोका इति दोहदेहां**
**तां वीक्ष्य विद्योतितचारुदेहाम् ।**
**विसस्मिरेऽथ व्यकरोध्दवश्च**
**क्रिया अभूत्तत्र वरोध्दवश्च ॥ ८९ ॥**

**अन्वयः**—लोकाः इति दोहदेहां विज्ञाय, विद्योतितचारुदेहां तां वीक्ष्य विसस्मिरे, अथ धवः क्रियाः च व्यकरोत्, तत्र च वरोद्भवः अभूत् ॥

**अर्थः**—याप्रमाणें तेजःपुंज अंबेचे ते असामान्य डोहाळे व हाल-चाल पाहून सर्व लोक चकित झाले, नंतर शास्त्रानुसार तिचा पति माधव यानें पुंसवनादि धार्मिक क्रियाहि मोठया समारंभपूर्वक पार पाडल्या ॥ ८९ ॥

**अब्रघ्नगेष्टखगसूचितसिद्धिपूर्व-**
**प्रव्रज्यके सुसमयेऽनपरोऽनपूर्वः ।**
**स व्याहरन्प्रणवमाविरभूदजातो**
**जातोऽविता य इह भक्तिमतामजातः॥ ९० ॥**

**अन्वयः**—अब्रघ्नगेष्टखगसूचितसिद्धिपूर्वप्रव्रज्यके सुसमये अनपरः अनपूर्वः अजातः प्रणवं व्याहरन् आविरभूत् यः इह भक्तिमतां अजातः अविता सः जातः ॥

**अर्थः**—दहा मास पूर्ण होतांच योग्य समयीं सिद्धिपूर्वक संन्यास द्योतित करणारे ते ते अनूकूल ग्रह विराजित असतांनाच अपूर्व व जन्मादि विकारशून्य असे भगवान् ॐकाराचा उच्चार करीतच व्यक्त झाले. प्रसूतिमार्गानें न येणारे तेच हे भगवान् दत्तात्रेय कीं जे भक्तांचें अज्ञानापासून रक्षण करितात. ॥ ९० ॥

**निरञ्जनेऽस्मिन्पूर्णेऽतिशयाधानमलक्षती ।**
**न स्तोऽथापि व्यधात्तातः संस्कारं बुद्धिमान्द्यतः ॥ ९१ ॥**

**अन्वयः**—निरंजने पूर्णे अस्मिन् अतिशयाधानमलक्षती न स्तः, अथ अपि तातः बुद्धिमान्द्यतः संस्कारं व्यधात् ॥

**अर्थः**—शुद्ध, बुद्ध व परिपूर्ण अशा परमात्म्याला वस्तुतः अतिशयाधान, मलप्रक्षालन करणाऱ्या संस्कारांची काय आवश्यकता होती? तरीहि माधवानें लोकाचारानुसार सामान्यबुद्धीनें जातकर्मादि संस्कार केलेच. अधिक तेज वाढविणें व असलेलें पाप नाहींसें करणें याकरितां शास्त्रांत सर्व संस्कार सांगितले आहेत. ॥ ९१ ॥

**स च सुतो नृहरीत्यभिधानतः**
**सुविधितो जनकेन च संस्कृतः**
**प्रववृधे क्रमतो जनरंजनः**
**स तु धिया स्म न वक्ति निरञ्जनः ॥ ९२ ॥**

**अन्वयः**—स च सुतः जनकेन सुविधितः अभिधानतः नृहरी इति संस्कृतः, स तु जनरंजनः क्रमतः प्रववृधे, निरंजनः धिया न वक्ति स्म ॥

**अर्थः**—माधवानें विधिपूर्वक यथास्थित नामकरण संस्कार करून त्या बाळाचें 'नरहरी' असें नांव ठेविलें. जनांना आल्हाद देणाऱ्या त्या नरहरींची सर्व प्रकारें क्रमाक्रमानें जरी वाढ होऊं लागली तरी वाणीच्या बाबतींत मात्र तो मायारहित परमात्मा जाणूनबुजून मुकाच राहिला॥९२॥

नानोपाया ये कृतास्ते वृथैव
जातास्तातौ दुःखितौ तौ मुधैव।
मूकं वाचालं करोतीह यत्तु
ज्ञं तन्मूकं मेनिरे ब्रह्मवस्तु ॥ ९३ ॥

**अन्वयः**—ये नानोपायाः कृताः ते वृथा एव जाताः तौ तातौ मुधा एव दुःखितौ, इह यत् तु मूकं वाचालं करोति तत् ज्ञं ब्रह्मवस्तु मूकं मेनिरे ॥

**अर्थः**—मुकेपणा जावा म्हणून जे कांहीं नाना तऱ्हेचे उपाय केले ते सर्व फुकट गेले. त्यामुळें उभयतां मातापित्यांना मात्र फार दुःख झालें, पण तें व्यर्थच म्हटलें पाहिजे. कारण, ज्या ब्रह्माचें मुक्यालाहि बोलका करण्याचें सामर्थ्य आहे त्या सर्वज्ञ ब्रह्मरूपी नरहरीला अज्ञानानें मुका जानतात व त्यावर व्यर्थ उपाय करतात, हें विचित्र नव्हे काय? ॥९३॥

खिन्नौ वीक्ष्य गुरू व्रतोत्तरमहं वक्ष्ये तदेत्यात्मजः
संज्ञाप्याथ स तन्मुदे च कनकं लोहस्य चक्रे द्विजः।
पारस्कारगिराऽकरोदुपनयं भिक्षां ययाचे तदा
वेदानप्यवदद्बटुः पटुगिराऽहं प्रव्रजिष्ये गुरू ॥ ९४ ॥

**अन्वयः**—तदा खिन्नौ गुरू वीक्ष्य आत्मजः व्रतोत्तरं अहं वक्ष्ये इति संज्ञाप्य तन्मुदे लोहस्य कनकं च चक्रे; तदा द्विजः पारस्कारगिरा उपनयं अकरोत्, बटुः भिक्षां ययाचे, पटुगिरा वेदान् अपि अवदत्, हे गुरू अहं प्रव्रजिष्ये ॥

**अर्थः**—मातापित्यांना कष्टी झालेले पाहून नरहरीनें त्यांना खुणेनें सुचविलें कीं, माझी मुंज करा, म्हणजे मी बोलेन. नंतर त्यांच्या संतोषासाठीं नरहरीनें लोखंडाचें सुवर्णांत रूपान्तर करून दाखविलें. त्यामुळें विश्वास वाटून माधवानें नरहरीचा व्रतबंध स्वशाखेच्या पारस्कर गृह्यसूत्रा-

नुसार पार पाडला. त्या वेळीं नरहरी बटूनें भिक्षा मागितली, सर्व वेद म्हणून दाखविले व शेवटीं मातापित्यांना तो म्हणाला : आई! बाबा! मला संन्यास घ्यावयाचा आहे, तेव्हां मी सर्वसंगपरित्याग करून पर्यटनास निघतों. ॥ ९४ ॥

**तदा माता वाताहतसुकदलीवाऽपतदमुं**
**समुत्थाप्य प्राहाहहह सुत नायं क्रम उत।**
**पतस्येतेनाऽतो वरय रमणीं भो भव गृही**
**न हीतः पातस्ते परमहितमेतच्छ्रुतिमतम् ॥ ९५ ॥**

**अन्वयः**—तदा माता वाताहतसुकदली इव अपतत् अमुं समुत्थाप्य प्राह, अहह भो सुत अयं क्रमः न, उत एतेन पतसि अतः रमणीं वरय, गृही भव, इतः ते पातः न हि, यतः एतत् श्रुतिमतं परमहितम् ॥

**अर्थः**—पुत्राची संन्यासाची भाषा ऐकल्याबरोबर वादळाच्या तडाख्यानें जशी केळ पडावी त्याप्रमाणें अंबा धाडकन् पडली. सावध झाल्यावर शोकानें ती म्हणते, "बाळा! अकालीं संन्यास घेण्याचा हा धर्म नव्हे. अशानें अधःपातच होईल. सुस्वरूपी व अनुकूल भार्या करून गृहस्थाश्रमी हो. असें करण्यांत तुझें अधःपतन मुळींच नाहीं. उलट, हा गृहस्थाश्रमाचा धर्म वेदमान्य व परमहितकारक असाच आहे. ॥ ९५ ॥

**संस्कारैः संस्कृतोऽन्तःशुचिरिह लभते साधनानीतरो नो**
**तस्मात्त्वं सद्वितीयो भव भवहतये देवपित्रर्चकः स्याः।**
**कालोप्तं बीजमुच्चैः फलति सुत तथोद्वाहनादि स्वकाले**
**कार्यं पूर्वेऽपि सर्वे पितर इदमहो तातं हीच्छन्ति नित्यम् ९६**

**अन्वयः**—संस्कारैः संस्कृतः अंतःशुचिः इह साधनानि लभते, इतरः नो, तस्मात् त्वं सद्वितीयः भव, भवहतये देवपित्रर्चकः स्याः भो

सुत कालोप्तं बीजं उच्चैः फलति, तथा उद्वहनादि स्वकाले कार्यं, पूर्वे सर्वे अपि पितरः अहो तात ! इदं नित्यं इच्छन्ति ॥

**अर्थः**—ज्याचे सर्व संस्कार झालेले आहेत, अशा पुरुषालाच अंतःशुद्धि झाल्यानें संन्यासयोग्य शमदमादि साधनांची प्राप्ति होते. इतराला नाहीं. म्हणून तूं विवाहित होऊन देवऋण व पितृऋण यांतूनहि मुक्त होण्यासाठीं त्यांचा पूजक हो. बाळा ! योग्य काळीं पेरलेलें बीजच उत्कृष्ट फलदायी होतें. तेव्हां विवाहादि संस्कारहि योग्य काळींच पार पडणें हितकर नाहीं का ? बा ! नरहरी ! आपल्या सर्व पूर्वजांचीहि हीच इच्छा होती बरें." ॥ ९६ ॥

**स प्राहाम्ब विवेकिनो न नियमोऽयं दुस्तरे नश्वरे**
**संसारे सति सारवर्जित इतो मातः पितः किं सुखम् ।**
**दुःखं दारपरिग्रहोऽप्यधनता चेत्क्लेशिताऽशान्तताऽऽ-**
**ढ्यस्याऽप्यन्वगकं स्वसंक्षयमुखं नाकोऽपि चैवंविधः ॥९७॥**

**अन्वयः**—सः प्राह, हे अम्ब ! अयं नियमः विवेकिनः न, भो मातः ! भो पितः ! सारवर्जिते असति दुस्तरे नश्वरे संसारे इतः अन्यत् किं सुखं, दारपरिग्रहः दुःखं,अपि अधनता चेत् क्लेशिता, आढ्यस्य अपि अन्वक् अशान्तता स्वसंक्षयमुखं अकं, नाकः अपि च एवंविधः ॥

**अर्थः**—यावर तो बाल बटु नरहरी मातेला म्हणतो— " आई ! तूं सांगितलेला हा गृहस्थाश्रमानंतर संन्यास घेण्याचा जो नियम आहे, त्याचा माझ्यासारख्या विवेकी विरक्ताला काय उपयोग ? आई ! बाबा ! हा जो असार, मिथ्या, नाशवंत व तरण्यास अशक्य असा संसार आहे, त्यांत संन्यासाशिवाय कोणतें सुख आहे बरें ? स्त्रीसहवासांत सुख मानावें तर वस्तुतः तोहि दुःखालाच कारण आहे. त्यांतहि आणखी दारिद्र्याची भर पडली तर मग संभवणारे क्लेश विचारूंच नका. बरें, श्रीमंत गृहस्थाला सुखी म्हणावें तर, तेथेंहि एकामागून एक याप्रमाणें

अशांतिदायक मोठाले खर्च इत्यादि दुःखें ठरलेलींच. स्वर्गांत तरी आनंदी-आनंद आहे म्हणाल तर तेंहि खरें नसून उलट तोहि अंतीं दुःखालाच कारण आहे. ॥ ९७ ॥

**यज्ञे सामग्र्यभावे तु कृषिवदफलं चेत्सुसिद्धोऽपि चान्ते**
**पातः स्वर्गात्तदाज्ञां वितर हि विरतः प्रव्रजाम्येकपुत्रे ।**
**मध्यानात्त्वं तरिष्यस्यपि झटिति सुतास्ते भविष्यन्त्यपीत्थं**
**प्रोक्त्वाऽस्यै दर्शयित्वा प्रथमतनुमदात्प्राक्स्मृतिं च त्र्यधीशः**

**अन्वयः**—यज्ञे सामग्र्यभावे तु कृषिवत् अफलं, अपि चेत् सुसिद्धः अन्ते स्वर्गात् पातः, तदा हे एकपुत्रे ! आज्ञां वितर प्रव्रजामि, मध्यानात् त्वं तरिष्यसि, झटिति ते सुताः अपि भविष्यन्ति इत्थं अस्यै प्रोक्त्वा त्र्यधीशः प्रथमतनुं दर्शयित्वा प्राक्स्मृतिं च अपि अदात् ॥

**अर्थः**—( समजा, स्वर्गसुखासाठीं यज्ञादि कर्मे करावयाचीं तीं तरी फलदायी होतील अशी खात्री आहे काय ? मुळींच नाहीं... )

......पावसापाण्याची कमतरता पडली कीं शेत जसें निष्फल होतें, त्याचप्रमाणें यज्ञांतहि जर देश, काल, मंत्र, ब्राह्मण इत्यादि सामग्री यथायोग्य नसेल तर तोहि सफल होणार नाहीं. समजा, मोठया कष्टानें योग्य सामग्रीनिशीं यज्ञ तडीस गेलाच तरीहि शेवटीं पुण्यक्षय झाल्यावर स्वर्गांतून पतन हें ठरलेलेंच आहे ना ! आणि म्हणून म्हणतों, आई ! मला आज्ञा दे. मी विरक्त असल्यानें मला संन्यास घेऊं दे. माझ्या संन्यासग्रहणानें तुला चिंता वाटण्याचें कारण नाहीं. माझ्या ध्यानानेंच तूं मुक्त होशील. तुला आणखी पुत्रहि होतील." या प्रमाणें त्रैमूर्ति दत्तात्रेयांनीं अंबेची समजूत घालून तिला विश्वास वाटण्यासाठीं म्हणून आपलें पूर्वीचे श्रीपादावतारांतील स्वरूप दाखवून तिला पूर्वजन्माचें स्मरणहि करून दिलें.

**जननी नवनीतकोमलं नवनीहारभमस्य सोज्ज्वलं ।**
**परिरभ्य वपुर्मुमोद सा यदु मातुर्हि सुचन्द्रशीतलम् ॥९९॥**

**अन्वयः**—जननी नवनीहारभं नवनीतकोमलं सोज्वलं अस्य वपुः परिरम्य मुमोद, यत् उ मातुः सुचन्द्रशीतलं अस्ति ॥

**अर्थः**—पहांटेच्या दवबिंदूप्रमाणें शुभ्र, लोण्याप्रमाणें मृदु व तेजस्वी अशा आपल्या पुत्राच्या देहाला आलिंगन दिल्यावर अंबेला आनंद झाला. कारण, तिला तें आलिंगन कापूर किंवा चंद्र या इतकेंच अत्यंत शीतल वाटलें. ॥ ९९ ॥

**सा प्राहैकसुतं विलोक्य खलु ते दास्याम्यनुज्ञां भवां-**
**श्छ्रीपात्सत्यवचा त्वया सुकृपया गोत्रद्वयं पावितम् ।**
**ओमित्युक्तवताऽवतारसुभृता तस्याः स्मृतिर्लोपिता**
**धृत्वा गर्भमसूत साऽपि च सुतौ नित्यं सुताल्हादिता १००**

**अन्वयः**—सा प्राह, एकसुतं विलोक्य ते अनुज्ञां दास्यामि, भवान् सत्यवचाः श्रीपात् खलु त्वया सुकृपया गोत्रद्वयं पावितं, ओम् इति उक्तवता अवतारसुभृता तस्याः स्मृतिः लोपिता, नित्यं सुताल्हादिता सा अपि च गर्भं धृत्वा सुतौ असूत ॥

**अर्थः**—अंबा म्हणते–" आणखीं एक पुत्र झाला कीं मग मी तुला खुशाल संन्यास घेण्यास परवानगी देईन. खरोखरच आपण सत्यवचनी श्रीपाद आहांत. तुम्हीच आपल्या कृपेनें मातृवंश व पितृवंश पुनीत केले आहेत."—यावर ' बरें तर, ठीक आहे. ' असें म्हणून अवतारी भगवंतांनीं तिची पूर्वजन्माची स्मृति नष्ट केली. नरहरीसारख्या पुत्रामुळें सदा आनंदी असलेल्या अंबेला योग्य काळीं गर्भधारणा होऊन दोन जुळे पुत्रहि झाले. ॥ १०० ॥

॥ प्रथम शतक समाप्त ॥

---

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः ॥

# श्रीगुरुचरित्रकाव्याचें मराठी भाषांतर
# मूळ श्लोक व अन्वयासहित

भाषांतरकार—वे. शा. सं. वामनशास्त्री गोविंदशास्त्री जेरे,
नरसोबावाडी.

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

# द्वितीयशतक

या दैन्यं पापतापौ शमयति नियतिध्वंसको हंसकोट्यै वैराग्यज्ञानभक्तीर्वितरति तरति ज्ञो यदर्थो यदर्थः । तारस्तं तारतारं हि भज भज भजद्वत्सलो वत्सलोभान्मातेवैति स्वकान्यश्चरणशरणसत्कामधुग्यो दयाब्धिः ॥ १ ॥

अथ श्रीगुरुचरित्रकाव्यांतर्गतद्वितीयशतकस्य प्रतिश्लोकं प्राकृते सान्वयाऽर्थो लिख्यते श्रीशकृपया—

**अन्वयः**—नियतिध्वंसकः यः पापतापौ शमयति, यः हंसकोटयै वैराग्यज्ञानभक्तीः वितरति, यदर्थः ज्ञो भवति तरति च, यदर्थः तारः तं तारतारं भो जन भज भज, भजद्वत्सलः यः स्वकान् माता इव एति, यः चरणशरणसत्कामधुक् दयाब्धिः अस्ति ॥

**अर्थः**—जो भगवान् दत्तात्रेय भजकांचें दुर्दैव नाहींसें करतो, त्रिविध पापताप नष्ट करतो, जो जिज्ञासू साधकांना व परिव्राजकांना वैराग्य, ज्ञान व भक्ति देतो, भगवान् दत्तदेव हेंच ज्यांचें अभीष्ट ध्येय आहे, असे लोक ज्ञानसंपन्न होतात, आणि तरतात. प्रणव त्याचें अभिधान आहे, म्हणून प्रणवाचें जपानुष्टान करणाऱ्यांना तो प्रभु अविद्या, काम कर्मांपासून संरक्षितो, म्हणून हे मानवा, तूं श्रीदत्तदेवाचें सतत भजन कर, तो दयाळू श्रीगुरु वत्साकडे धांवणाऱ्या प्रेमळ मातेप्रमाणें स्वचरणीं शरण आलेल्या संतांची इष्ट कामना पूर्ण करणारा दयासागर आहे. ॥ १ ॥

अथ सत्यगुरर्भकयोस्त्रैमासिकयोः सतोर्जगावम्बाम् ॥
अंचितसाम्बामम्बामिव हेरम्बाऽग्निजान्वितामम्बाम् ॥ २ ॥

**अन्वय**—अथ सत्यगुः त्रैमासिकयोः अर्भकयोः सतोः हेरंबाग्निजान्वितां अंबामिव अर्चितसांबां अंबां जगौ. ॥

**अर्थः**—नंतर सत्यवचन श्रीगुरु, गजाननकार्तिकेयसहित गिरिजेप्रमाणें शोभणाऱ्या अशा व शनिप्रदोषव्रत करून पार्वतीपरमेश्वराचे अर्चनानें कृतार्थ झालेल्या आपल्या मातेस म्हणाले. ॥ २ ॥

**जातौ द्वौ ते द्वौ भविष्यन्ति पुत्रौ कन्या धन्या चापि मान्याऽसि माता ॥ माऽतः पातः संसृतौ ते ह्युमातो मातश्चार्च्याऽऽज्ञापयाह्वाय माऽतः ॥ ३ ॥**

**अन्वयः**—भो मातः ते द्वौ पुत्रौ जातौ द्वौ पुत्रौ कन्या च भविष्यन्ति अतः त्वं मान्या च धन्या अपि असि, अतः ते पातः संसृतौ मा भवतु, हे मातः त्वं उमातः मातः अपि अर्च्या आसि, अतः मा ( मां ) काशीं गन्तुं अन्हाय आज्ञापय.

**अर्थः**—"अहो आईसाहेब, आपणांस दोन मुलगे झालेले आहेत. आणखी दोन मुलगे व एक कन्या होणार आहे. तेवढयानेंच आपण धन्य व मान्य झालेल्या आहांत. यापुढें संसारांत अधिक पडणें नको. कारण आपण पार्वती व लक्ष्मीपेक्षां अधिक पूजनीय आहांत. म्हणून हे आई, मला काशीस जाण्यास लवकर आज्ञा दे." ॥ ३ ॥

**इति वदति मतीश्वरेऽम्बिका प्राक्स्मरणत ईपदमाह तं चरित्रम्॥ अकलि कलिमलघ्नमत्र चित्रं किल भवता सुपवित्रमत्रिपुत्र॥४॥**

**अन्वयः**—इति मतीश्वरे वदति सति अंबिका ( श्रीगुरोर्माता ) प्राक् स्मरणतः तं ईपदं आह, भो अत्रिपुत्र, भवता अत्र कलिमलघ्नं चित्रं सुपवित्रं च चरित्रं अकलि किल ॥

**अर्थः**—याप्रमाणें बुद्धिप्रेरक अशा श्रीदत्तगुरूचें भाषण ऐकून अंबानामक माता, पूर्वजन्मस्मरणानुरोधानें श्रीपादनामक आपल्या पुत्रांस बोलली, 'हे अत्रिपुत्रा, तुम्ही कलिदोषांचें नाश करणारें विस्मयकारक व अतिशय पवित्र असें चरित्र खरोखर केलें आहे.' ॥ ४ ॥

**यं श्रीपदं वदन्ति त्वाऽखेदं हृतमदापदम् ॥**
**प्राप्तोऽसि मत्पुत्रपदं पदं वन्दे तवापदम् ॥ ५ ॥**

**अन्वयः**—अखेदं हृतमदापदं यं त्वा ( त्वां ) श्रीपदं वदन्ति सः त्वं मत्पुत्रपदं प्राप्तोऽसि तव अपदं पदं वन्दे ॥

**अर्थः**—"हे श्रीदत्तदेवा, माझ्या पूर्वजन्मांत सर्व संकटांचा परिहार करून श्रीपादरूपानें तुम्ही माझी इच्छित कामना पूर्ण केली आहे. तेच श्रीपाद तुम्ही आहांत असें लोक म्हणतात. तेच तुम्ही माझे पुत्र झाला आहांत, म्हणून अजाणत्यांना समजणार नाहीं अशा तुमच्या चरणांस वंदन करतें. ॥ ५ ॥

**ये ये कामा दुर्लभा मर्त्यलोके सर्वांस्तांस्तांश्छन्दतो रासि लोके॥ लोकेशस्त्वं श्रीश लोके वदान्यः कल्पद्रुः किं जंगमस्त्वं वदान्यः ॥ ६ ॥**

**अन्वयः**—मर्त्यलोके ये ये दुर्लभाः कामाः तान् तान् छंदतः लोके रासि, सः त्वं वदान्यः लोकेशः श्रीश जंगमः अन्यः कल्पद्रुः असि किं? एतद् वद ॥

**अर्थः**—"हे श्रीपाद देवा, त्रिभुवनांत जे जे दुर्लभ मनोरथ, ते ते तूं केवळ इच्छामात्रानेंच पूर्ण करतोस, तो तूं अमर्याद देणारा, त्रिलोक-स्वामी, लक्ष्मीनिवास चालताबोलता दुसरा कल्पवृक्षच आहेस काय हें सांग. ॥ ६ ॥

**कृतमन्तुरियं न जातु ते हितदा किं तु विधुंतुदार्तिदा ॥**
**यदरुंतुदवाक् परंतु तेऽपि तु मातुर्न तु जातु दुष्कृतम् ॥७॥**

**अन्वयः**—इयम् ते माता कृतमन्तुः अस्ति ! जातु अपि ते हितदा न, किं तु विधुन्तुदार्तिदा यत् अरुंतुदवाक् परंतु ते मातुः जातु अपि दुष्कृतं न तु ॥

**अर्थः**—"हे गुरुदेवा, ही तुमची आई अपराधी आहे. कारण हिनें (मी) तुमच्या कल्याणाविषयीं विचार करून प्रयत्न केलेला नाहीं. इतकेंच नव्हें तर पीडादायक राहूप्रमाणें मर्मभेद भाषणांनीं तुम्हांस दुःखःच दिलें आहे. असें जरी आहे तथापि मी तुमची माता असल्यानें माझ्यावर कोणताहि दोषारोप येणार नाहीं." ॥ ७ ॥

**सुत आह न दोष एष ते मम लीलेयमशेषहृत्स्थितेः ॥**
**अयि तारपुरीं प्रयामि मे स्मरणादस्तु समीपताऽम्ब ते ॥८॥**

**अन्वयः**—सुतः आह एषः ते दोषः न अशेषहृत्स्थितेः मम इयम् लीला (अस्ति) अयि अम्ब तारपुरीं प्रयामि स्मरणात् मे समीपता ते अस्तु ॥

**अर्थः**—श्रीपाद म्हणाले, "हे आई, हा तुझा दोष नाहीं, सर्वान्तर्यामीं अशा माझीच ही लीला आहे. हे माते, मी काशीस जातों. परंतु, तूं जेव्हां माझें स्मरण करशील तेव्हां निश्चतपणें माझें दर्शन तुला होईल. कारण मी भक्तांना स्मर्तृगामी आहें. ॥ ८ ॥

**तथेति मात्रापि तथैव पित्राऽनुमोदितो मोदितदेववर्गः ॥**
**भर्गप्रभोऽपीक्षितुमेति भर्गमित्यार्यवर्गस्तुत आप काशीम् ॥ ९ ॥**

**अन्वयः**—तथेति मात्रापि तथैव पित्रा च अनुमोदितः मोदित-देववर्गः भर्गप्रभः अपि भर्गं ईक्षितुं एति इति आर्यवर्गस्तुत काशीं आप ॥

**अर्थः**—ठीक आहे, असें म्हणून श्रीगुरूंना काशीस जाण्यास आई-वडिलांनीं आज्ञा दिली. सर्व देवांना ज्यांनीं संतुष्ट केलें आहे, असे श्रीगुरु शिवसम प्रभावी असूनसुद्धां शिवदर्शनास काशीस निघाले. याप्रमाणें अधिकारी पुरुषांकडून स्तविलेले श्रीगुरु काशीस पोंचले. ॥ ९ ॥

**सुरतं योगनिरतं यतयस्तमनारतम् ॥**
**अजं भजन्तं विरतं नत्वोचुः परधीरतम् ॥ १० ॥**

**अन्वयः**—अनारतं अजं भजन्तं विरतं परधीरतं सूरतं योगनिरतं नत्वा यतयः ऊचुः ॥

**अर्थः**—नेहमीं ईश्वरभजनमग्न, आत्मध्यानमग्न, आत्यंतिक वैराग्य-संपन्न, सत्त्वस्थ, दयाळू व लोकसंग्रहार्थ योगाभ्यासी, अशा श्रीपाद-गुरूंस नमस्कार करून काशीस्थ संन्यासी म्हणाले. ॥ १० ॥

**भृङ्गो याति रसाय किंशुकसुमभ्रान्त्या शुकास्ये स तं**
**यद्वज्जम्बुफलभ्रमाद्गिलति तौ पश्चादुभौ दुःखितौ ॥**
**एवं स्त्रीपुरुषौ परस्परमरं सौख्यभ्रमात्संगतौ**
**तौ स्यातामतिदुःखितौ विधुतसंन्यासायनौ व्यध्वगौ ११**

**अन्वयः**—यद्वत् भृंगः किंशुकसुमभ्रांत्या रसाय शुकास्ये याति यद्वत् शुकः तं जंबुफलभ्रमात् गिलति पश्चात् तौ उभौ दुःखितौ भवतः एवम् स्त्रीपुरुषौ परस्परं सौख्यभ्रमात् अरं संगतौ भवतः विधुतसंन्यासा-यनौ व्यध्वगौ तौ अतिदुःखितौ स्याताम् ।

**अर्थः**—ज्याप्रमाणें भ्रमर पलाशकुसुमाच्या भ्रमानें पोपटांच्या चोंचीच्या आकारामुळें रसपानार्थ शुकमुखाकडे जातो, तसेंच तो पोपटहि जांभळ समजून ( सदृश आकारामुळें ) त्यास गिळतो, नंतर ते दोघेहि दुःखी होतात. त्याप्रमाणेंच स्त्रीपुरुष सुखभ्रमानें अतिशयच परस्पर प्रेमबद्ध होतात. भगवत्पदप्राप्तीचा राजमार्ग जो संन्यासाश्रम तो सोडून दिल्यामुळें कुमार्गावर असलेले असे ते अतिशय दुःख पावतात. ॥ ११ ॥

**सुमखैः सततामृताप्तये द्विजमुख्यास्तु यजन्त्यहो भुवि ॥**
**दिविजा अमृताशिनोऽपि यत्स्मरणं नापि हि कुर्वते दिवि १२**

**अन्वयः**—सततं अमृताप्तये द्विजमुख्याः भुवि सुमखैः यजन्ति अहो, अमृताशिनः अपि दिविजाः दिवि यत्स्मरणं अपि न हि कुर्वते ॥

**अर्थः**—द्विजवर अमृत मिळविण्यासाठीं भूतलावर विधियुक्त अग्नि-ष्टोमादि यज्ञ करतात हें एक मोठें आश्चर्यच होय. कारण स्वर्गस्थ देव

सतत अमृतपानामुळें स्वर्गांत अमृताचें स्मरणसुद्धां करीत नाहींत. हा अतिपरिचयाचाच प्रभाव आहे व हें व्यवहारसिद्धच आहे. ॥ १२ ॥

**अप्रत्यक्षमशेषतोषकरणं पूर्णं जगत्कारणं यत्प्रत्यक्षविलक्षणं सुशरणं भूमाद्वयं तारणम् ॥ तद्ब्रह्म श्रवणादिनेक्ष्यत इति त्रय्याः श्रुतं भाषणं संन्यस्य श्रवणं त्विति श्रुतिगणख्यातिर्गुणव्यञ्जिका ॥ १३ ॥**

**अन्वयः**—यत् अप्रत्यक्षम् अशेषतोषकरणं पूर्णं जगत्कारणं प्रत्यक्षविलक्षणं सुशरणं भूमाद्वयम् तारणं तद् ब्रह्म श्रवणादिना ईक्ष्यते इति त्रय्या भाषणं श्रुतं तत् तु श्रवणं संन्यस्य इति गुणव्यंजिका श्रुतिः (प्रसिद्धा) अस्ति ॥

**अर्थः**—जें अतींद्रिय, सर्वानंदकारक, परिणामरहित, जगताचें मूळ कारण, व्यापक, अवयवरहित, मुमुक्षूंना तारणारें असें तें ब्रह्मस्वरूप सुखरूप व प्रत्यक्षादि अवस्थांमध्यें अखंड व पूर्णरूपानें आहे अशा त्या ब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार व अनुभव श्रुतिवचनांच्या विधानयुक्त श्रवणानेंच होतो. आणि तेंच श्रवण होय असें गुणरूपी श्रुति सांगतात. तेंच श्रवण संन्यस्त होऊनच करावें असें वेदवचन आहे. ॥ १३ ॥

**न्यासमार्गमपि भ्रष्टं शंकरः सर्वशंकरः ॥**
**स्थापयामास मूढैः स मतस्तिष्येऽपि धिक्कृतः ॥ १४ ॥**

**अन्वयः**—सर्वशंकरः शंकरः भ्रष्टं अपि न्यासमार्गं स्थापयामास सः तिष्ये मतः अपि मूढैः धिक्कृतः ।

**अर्थः**—सर्वांच्या कल्याणासाठीं श्रीशंकराचार्यांनीं बौद्ध व सौगतांच्या मताधिक्यानें बहुजनसमाजांतून भ्रष्ट झालेला असा संन्यासमार्ग स्थापन केला. तो मार्ग श्रुतिवचनांवरून कलियुगांत मान्यहि केला आहे. परंतु अपमतप्रचारक अशा कांहीं मूर्खांनीं त्या मार्गाचा धिक्कार केला आहे, हें योग्य नाहीं. ॥ १४ ॥

**भवेऽब्धाविव सद्वाक्यैर्दृषद्भिरिव रामवत् ॥**
**भगवान्कीशत इव सेतुं बध्नातु शिष्यतः ॥ १५ ॥**

**अन्वयः**—भगवान् रामवत् अब्धौ इव भवे दृषद्भिरिव सद्वाक्यैः कीशतः इव शिष्यतः सेतुं बध्नातु ।

**अर्थः**—कल्याणप्रद असा संन्यासाश्रम जगांत कोणासहि असंमत असणें योग्य नाहीं, म्हणून सर्वैश्वर्यसंपन्न अशा आपणांकडून, ज्याप्रमाणें भगवान् रामचंद्रांनीं वानरांकरवीं दक्षिण समुद्रावर सेतु बांधला त्याप्रमाणेंच शिष्यद्वारां सद्वाक्योपदेशानें संन्यासमार्ग दृढपणें स्थापण्यांत यावा, असें आम्हांस वाटतें. ॥ १५ ॥

**चञ्चत्पञ्चशराञ्चितं ह्यपचितं न्यञ्चं प्रपञ्चं श्रितं नीचं वञ्चकवञ्चितं कुचरितं मुञ्चन्तमश्रूच्चकैः ॥ काचप्रायसुखातिवञ्चितहितं तूच्चावचं वीक्ष्य च स्वाचार्योक्त्यनुसार्यहं त्विति वचः प्राचामुवाचाधिपः ॥ १६ ॥**

**अन्वयः**—एवमुक्तो भगवान् श्रीपाद आह चंचत्पंचशरांचितं हि न्यंचं अपचितं च प्रपंचं श्रितं नीचं वंचकवंचितं कुचरितं अतएव उच्चकैः अश्रु मुंचंतम् च काचप्रायसुखातिवंचितहितं उच्चावचं लोकं वीक्ष्य अहं तु स्वाचार्योक्त्यनुसारी इति वचः प्राचां अधिपः उवाच ॥

**अर्थः**—काशीनिवासी यतींचें हें भाषण ऐकून भगवान् श्रीगुरु श्रीपाददेव बोलले: "प्रपंच हा चंचल बाणयुक्त अशा कामाच्या वासनेनें भरलेला आहे. त्यापासून सुखैश्वर्यादि कोणांसहि मिळालें नाहीं. हें खरें असूनहि स्वतःस शहाणे समजणारेहि अवनतिप्रद अशा संसारास टांकीत नाहींत, सामान्य लोक तर भामट्यानें फसविलेल्या मंदधी मनुष्याप्रमाणें दुराचारी होतात. आणि मोठ्यानें दुःखत्रस्त होऊन अश्रू ढाळतात. कांचेप्रमाणें नयनमनोहर, क्षणिक व किंचित् भासमान अशा सुखामुळें फसलेले सुजाण व अजाण असे संसारी समस्त लोक पाहून मीहि भगव-

त्पूज्यपाद शंकराचार्यांप्रमाणें संन्यासमार्ग अवलंबून त्याची स्थापना लोकांत करणार आहें." ब्रह्मादिदेवांचे अधिपति जे श्रीपादगुरु त्यांनीं असें भाषण केलें. ॥ १६ ॥

**इति सारसरस्वतीं गृणन्वृतवान्कृष्णसरस्वतीगुरून् ॥**
**अवनीतसरस्वतीप्रभुः स नृसिंहाख्यसरस्वतीत्यभूत् ॥१७॥**

**अन्वयः**—इति सारसरस्वतीं गृणन् अवनीतसरस्वतीप्रभुः कृष्णसरस्वतीगुरून सः वृतवान् नाम्ना नृसिंहसरस्वती इति अभूत् ॥

**अर्थः**—याप्रमाणें मथितार्थ पूर्ण बोलून श्रीपाददेवांनीं वृद्ध व अधिकारी अशा श्रीकृष्णसरस्वती नामक यतीस गुरु केले, व त्यांचेकडून संन्यासदीक्षा घेतली. आणि स्वमाहात्म्यानें बृहस्पतीवरहि वरचढ करणाऱ्या श्रीदत्तगुरूंनीं नृसिंहसरस्वती असें अभिधान धारण केलें. ॥ १७ ॥

**आचार्यं चाप्यचकाङ्क्षेऽमृतार्थं प्राचामाचार्योऽपि सन् संग्रहार्थम् ॥ रेजे न्यासी न्यस्तचूडोपवितो भेजेऽभ्यासी भैक्ष्यमाज्ञोपवीतः ॥ १८ ॥**

**अन्वयः**—स्वयं प्राचां आचार्योऽपि सन् संग्रहार्थं आचार्यम् अमृतार्थं आचकांक्षे। न्यस्तचूडोपवीतः न्यासी रेजे। आज्ञोपवीतः अभ्यासी भैक्ष्यम् भेजे।

**अर्थः**—स्वतः श्रीपाद गुरु श्रीनरसिंहसरस्वती देवाधिदेव व देवगुरूचे आचार्य असूनसुद्धां लोकसंग्रहासाठीं केवळ त्यांनीं गुरु केला. शास्त्रतः शिखा यज्ञोपवीत विसर्जन करून संन्यासी असें ते शोभूं लागले. ज्ञानस्वरूप उपवीत ज्ञानमुद्रा धारण करून ज्ञानाभ्यासी नृसिंहगुरूंनीं यथाविधि भिक्षान्नाचा स्वीकार केला. ॥ १८ ॥

**कुण्डीमण्डितदोर्दण्डो दण्डी दण्डितधीजडः ॥**
**मुण्डी मुण्डितपाखण्डश्चण्डीडिव बभौ मृडः ॥ १९ ॥**

**अन्वयः**—कुंडीमंडितदोर्दंडः दंडितधीजडः दंडी मुण्डितपाखंडः मुंडी चंडीट् मृडः इव बभौ।

**अर्थः**—श्रीनृसिंहदत्तगुरूचें हातांस दण्डकमण्डलूनें अधिक शोभा आली, त्यांनीं नास्तिकवादाचें खंडन करून अपमतप्रसारक लोकांस शास्त्रोक्त दंड केला. ते नृसिंहगुरु कैलासनाथाप्रमाणें काशींत शोभले.

**नैजं तेजोऽस्य परमं भास्वरं भास्करोपमम् ॥**
**किं पुनस्तपसा ब्रह्मवर्चसाढ्येन भाष्यते ॥ २० ॥**

**अन्वयः**—भास्करोपमम् अस्य नैजं तेजः परमम् आसीत्। तपसा ब्रह्मवर्चसा च आढ्येन किं पुनः भाष्यते?

**अर्थः**—श्रीनृसिंह यति हे मूळचेच सूर्याप्रमाणें तेजस्वी होते, त्यांतून ते तपस्तेज व ब्रह्मतेज यांमुळें अधिक भासमान शोभूं लागले हें काय सांगावें? ॥ २० ॥

**मारो रूपेण वाचा च वाक्पतिः क्षमया क्षमा ॥**
**बुध्द्या बुधो भया भास्वानिति भाति यतिप्रभुः ॥ २१ ॥**

**अन्वयः**—भगवान् यतिप्रभुः रूपेण मारः वाचा वाक्पतिः क्षमया क्षमा बुद्ध्या बुधः भया भास्वान् इति भाति ॥

**अर्थः**—भगवान् यतिप्रभु नृसिंह हे रूपानें मदनाप्रमाणें, वक्त्यांना देवगुरूंसारखे, सहनशील लोकांना धरित्रीसम, पंडितांना बुधतुल्य व आदित्यासम दैदीप्य कांतिमान् असे दिसूं लागले. ॥ २१ ॥

**काश्यां प्रकाश्य विशदं श्रुत्याशयमसंशयम् ॥**
**प्रदक्षिणीकृत्य मेरुं बालादिच्छात्रयुग्गुरुः ॥ २२ ॥**

**अन्वयः**—बालादिछात्रयुग्गुरुः काश्यां श्रुत्याशयं असंशयम् विशदं च प्रकाश्य मेरुं प्रदक्षिणीकृत्य ( इति अग्रिमश्लोकेन अन्वयः )।

**अर्थः**—श्रीगुरु नृसिंहयतींनीं बालकृष्णसरस्वती आदिकरून छात्रगणांसमवेत त्रिकांड वेदांचा मथितार्थ, सर्व संशय दूर करून बाल-

बोधपद्धतीनें काशींत सांगितला. ( व्याख्यानरूपानें ) व मेरु प्रदक्षिणा शिष्यांसमवेत केली. ॥ २२ ॥

**दत्त्वा प्रयागमागत्य माधवाय विदं मुदं ॥**

**गत्त्वा करञ्जनगरं नत्वाऽभाणीत्स्वमातरम् ॥ २३ ॥**

**अन्वयः**—पुनः प्रयागं आगत्य माधवाय विदं च मुदं दत्त्वा करंजनगरं गत्वा स्वमातरं नत्वा अभाणीत्॥

**अर्थः**—नंतर श्रीगुरु नरसिंहयति प्रयागक्षेत्रीं येऊन माधवनामक विप्रांस ज्ञान देऊन स्वरूपानंदीं ( त्यास ) विलीन करून स्वजन्मभूकरंनगरास आले, तेथें स्वमातेस नमस्कार करून म्हणाले ॥ २३ ॥

**सोढ्वा गर्भभरं दरं च नितरां कृच्छ्रात्प्रसूयापि च त्यक्त्वा स्वापमपास्य भोगसुरुचिं या पाति माता सुतम् ॥ स्नेहाद्राति पयो न योग्यकरणं तस्या ऋणापाकृतेः स्नेहं दात्यपि काप्रसूतिरपि यः संन्यासिनां दुस्त्यजः ॥ २४ ॥**

**अन्वयः**—गर्भभरं दरं च नितरां सोढ्वा च कृच्छ्रात् प्रसूय अपि स्वापं च त्यक्त्वा भोगसुरुचिं अपास्य या माता सुतं पाति । स्नेहात् पयः राति तस्याः ऋणापाकृतेः योग्यकरणं न सा काप्रसूतिः अपि स्नेहं दात्यपि यः मातृस्नेहः संस्यासिनां अपि दुस्त्यजः ॥

**अर्थः**—श्रीनृसिंहयति म्हणाले, “ हे आई, ज्या मातेनें हें मोठें गर्भाचें ओझें धारण केलें, गर्भामुळें उत्पन्न झालेले मृत्युभयहि सहन केलें, मोठ्या कष्टानें प्रसूतिवेदनाहि सहन केल्या, संतानाच्या सुखाकरितां निद्रात्याग केला, तारुण्यसुखद भोगेच्छाहि सोडली, इतकें अनिवार्य असें दुःख केवळ संतत्यर्थ सोसून मोठ्या प्रेमानें आपलें स्तन्यपान देऊन मुलाचें संरक्षण केलें, आपल्या सुखदुःखाचे विचार मनांत आणले नाहींत, त्या मातेचे उपकार थोडेतरी फेडावे असें इच्छिणाऱ्यांना जगांत योग्य पदार्थ मिळणार नाहीं, कदाचित् मुलें वाईट व दुराचरणी जरी असलीं

तरीहि माता त्यांच्यावर प्रेम करीत नाहीं काय? तर करतेच, तसेंच मुलेंहि वाईट जरी असलीं तरीहि तींसुद्धां मातेसंबंधीं प्रेमादर बाळगतात म्हणून संन्याशांनासुद्धां मातृप्रेम सोडवत नाहीं." ॥ २४ ॥

**जहौ विरहजं तापं माताऽऽश्लिष्य सुतं तु तम् ॥**
**मातुः स तु सुताश्लेषः प्रायश्चन्दनशीतलः ॥ २५ ॥**

**अन्वयः**—माता तु तं सुतं आश्लिष्य विरहजं तापं जहौ सः तु सुताश्लेषः मातुः प्रायश्चंदनशीतलः अभूत् ॥

**अर्थः**—त्या आपल्या पुत्रास आलिंगन देऊन विरहामुळें झालेला ताप तिनें नाहींसा केला, ते पुत्रालिंगन मातेस बव्हंशीं चंदनासारखें शीतल वाटलें. ॥ २५ ॥

**प्राह स्नेहयुता माता क्वाहमङ्ग कुदेहभृत् ॥**
**चिन्मयस्त्वं क्व चाथाऽपि दयादृष्ट्याऽर्हताऽर्पिता ॥ २६ ॥**

**अन्वयः**—स्नेहयुता माता प्राह हे अंग कुदेहभृत् अहं क्व च चिन्मयः त्वं क्व अथापि दयादृष्ट्या अर्हता अर्पिता ॥

**अर्थः**—स्नेहपूर्वक माता म्हणाली, "हे पुत्रा, देहादिकांविषयीं ममता असलेली मी कोणीकडे व चिदानंदस्वरूप तूं कोणीकडे. तथापि दयादृष्टीनें मला तूं मोठेपणा दिला आहेस इतकेंच." ॥ २६ ॥

**अवदत्स च सद्गुरुस्तु तां भवभीतां विनतां मुहुः स्तुताम् ॥**
**मम संन्यसनात्तु तेऽमृतं स्वकुलैस्तारपुरेऽपि ते मृतम् ॥ २७ ॥**

**अन्वयः**—सः च सद्गुरुः भवभीतां विनतां स्वयं मुहुः स्तुतां तां मातरं अवदत् हे अम्ब मम संन्यसनात् स्वकुलैः सह ते अमृतं अस्तु ते मृतं अपि तारपुरे अस्तु ॥

**अर्थः**—नंतर भगवान् नृसिंह यति संसारास भ्यालेल्या, नम्र व वारंवार स्वतः प्रशंसिलेल्या अशा त्या आपल्या मातेस म्हणाले, " हे

माते, माझ्या संन्यासाश्रमामुळें कुलासह तुला मोक्ष मिळेल, आणि तुझें मरण काशींत होईल." ॥ २७ ॥

**गृहे गृहेऽथ जगृहे क्षणात्पूजां व्यदर्शयन् ॥**
**सत्यत्वमिंद्रो मायाभिः पुरुरूप इति श्रुतेः ॥ २८ ॥**

**अन्वयः**—अथ गृहे गृहे क्षणात् पूजां जगृहे इन्द्रः मायाभिः पुरुरूप इति श्रुतेः सत्यत्वं च व्यदर्शयत् ॥

**अर्थः**—नंतर श्रीगुरु नृसिंह यतींनीं एक क्षणामध्यें घरोघर पूजा घेतली, त्यामुळें परमेश्वर मायेनें पुष्कळ रूपें धारण करतो या श्रुतिवचनाचें सत्यत्वहि दाखविलें. ॥ २८ ॥

**स्वसाऽथ पप्रच्छ गुरुं स्वभव्यं स्वसाधनं चाह सतां सुभव्यम् ॥ सतीव्रतं तीव्रतरं यतित्वं पत्युस्तनौ कुष्ठमथाऽस्य शान्तिम् ॥ २९ ॥**

**अन्वयः**—अथ स्वसा स्वभव्यं स्वसाधनं च गुरुं पप्रच्छ, सः तां तीव्रतरं सतीव्रतं पत्युः यतित्वं च तनौ कुष्ठं अथ अस्य शान्तिं च आह ॥

**अर्थः**—नंतर नृसिंहगुरु यतींना पूर्वाश्रमांतील त्यांच्या बहिणीनें स्वतःचें भविष्य आणि आपणांस मोक्षाचें साधन कसें होईल, असें विचारलें. त्यावर यतिगुरूंनीं स्त्रियांना अखंड पातिव्रत्यानेंच मोक्ष मिळतो; अन्य कोणत्याहि साधनानें मिळत नाहीं, असें सांगून तूं पतीशीं वैर केल्यानें तुझा पति संन्यासी होईल, आणि गाईला लाथ मारल्यामुळें तुझें शरीर कुष्ठी होईल, असें भविष्यहि सांगितलें. तें ऐकून ती घाबरली. नंतर तिच्या प्रार्थनेवरून कुष्ठाचा परिहार कसा होईल हें सांगितलें. ॥ २९ ॥

**गोहत्याशान्तये शंभोर्गौतमेनाहृतां नदीम् ॥**
**सशिष्योऽथैत्य सोऽरक्षद्द्विजं शूलरुजार्दितम् ॥ ३० ॥**

**अन्वयः**—अथ सशिष्यः सः गोहत्याशांतये शंभोः गोतमेन आहृतां नदीं एत्य शूलरुजार्दितम् द्विजं अरक्षत् ॥

**अर्थः**—नंतर शिष्यांसमवेत गुरु नृसिंह यति, तपश्चर्येनें प्रसन्न करवून घेतलेल्या शंकरापासून गौतमऋषींनीं आणलेल्या गोदावरी नदीच्या तीरावर आले, आणि तेथें त्यांनीं पोटशूळानें पीडलेल्या ब्राह्मणाचे रोग-परिहार करून संरक्षण केलें. ॥ ३० ॥

**सायंदेवगृहेऽथ शिष्यसहितो गत्वाऽपि भुक्त्वाऽऽदराच्छूलार्तं प्रतिकूलशालियशसाऽरक्षत्क्षणाद्रुग्दरात् ॥ नाश्चर्यं त्विदमस्य पादकमलध्यानं करोत्यादराद्यः सोऽपीह हि तारयत्यपि कृपालेशान्महारुग्दरात् ॥ ३१ ॥**

**अन्वयः**—अथ शिष्यसहितः सायंदेवगृहे गत्वा आदरात् भुक्त्वाऽपि शूलार्तं प्रतिकूलशालियशसा रुग्दरात् क्षणात् अरक्षत् इदं तु न आश्चर्यं यः अस्य पादकमलध्यानं आदरात् करोति सः अपि कृपालेशात् महारुग्दरात् इह हि तारयति ॥

**अर्थः**—नंतर श्रीगुरु यति सायंदेवभक्ताच्या घरीं गेले. तेथें त्यांनीं आदरानें भोजनहि केलें. नंतर शूलरोगानें पीडिलेल्या एका ब्राह्मणास प्रतिकूल अशा साळीच्या भाताचें पोटभर जेवण करावयास सांगून एका क्षणांत रोगमुक्त केलें. अहो, त्यांत काय आश्चर्य ! या भगवान् श्रीगुरु यतींच्या पादकमलांचें जो आदरानें ध्यान करतो, तोसुद्धां आपल्या कृपा-लेशानें महासंसारभयापासून भजकांना तारतो. मग हें तर मुळींच आश्चर्यकारक नाहीं. ॥ ३१ ॥

**सायंदेवं यवनान्मृत्योर्भीतं ततार दरहर्ता ॥**
**धर्ता कारकशक्तेस्त्रासत्रासो न किं किमिह कर्ता ॥ ३२ ॥**

**अन्वयः**—दरहर्ता कारकशक्तेः धर्ता मृत्योः यवनात् भीतं सायंदेवं ततार, यतः अयं त्रासत्रासः इह किं किं न कर्ता, अपि तु अघटितं अपि करोति ॥

**अर्थः**—भयनिवारक व अन्तःकरणसहित अशा इंद्रियांचे प्रेरक अशा गुरुनरसिंहयतीनीं साक्षात् यमच अशा यवनापासून सायंदेवाचे रक्षण केलें, यांत काय आश्चर्य ? कारण भगवान् यतिदेव भयालासुद्धां भीतिजनक आहेत. म्हणून ते या जगांत काय काय करणार नाहींत. खरोखर जे करतां येणार नाहीं तेंहि तें सर्व कांहीं करतील. ॥ ३२ ॥

**पन्नगाशननन्दनं किमु पन्नगोऽत्त्यपि किं करी सिंहनन्दनमष्टसिद्धियुताब्धिपुत्र्यपि किंकरी॥ यस्य तस्य सुरार्चितस्य तु सेवकं यम ईक्षितुं नेश्वरः किमुतेतरः किल पामरः पुनरीक्षितुम्॥ ३३ ॥**

**अन्वयः**—पन्नगाशननंदनं पन्नगः किमु अत्ति अपि तु न सिंहनन्दनं करी अत्ति किं अपि तु न यस्य अष्टसिद्धियुता अब्धिपुत्री किंकरी सुरार्चितस्य तस्य सेवकं यमः ईक्षितुं न ईश्वरः पुनः च इतरः पामरः किल तं ईक्षितुं किमुत ॥

**अर्थः**—गरुडाच्या मुलांस सर्प खाऊं शकतो काय ? नाहीं. सिंहशिशूला हत्ती खातो काय ? नाहीं. अष्टासिद्धिसहित महालक्ष्मी ही ज्यांची दासी आहे, देवांना जे पूज्य आहेत त्यांच्या सेवकाला यमसुद्धां पाहण्यास समर्थ नाहीं. त्याला पुनः दुसरा कोणी नीच रागानें कसा पाहूं शकेल ? खरोखर त्यास कोणीहि कांहीं करूं शकणार नाहीं. ॥ ३३ ॥

**द्विजो यवनराजेन प्राप्तो भीतेन सत्कृतः॥**
**व्यष्टाब्दैर्दर्शनं दास्य इतीशेन निवारितः ॥ ३४॥**

**अन्वयः**—भीतेन यवनराजेन सत्कृतः द्विजः गुरुं प्राप्तः व्यष्टाब्दैः दर्शनं दास्य इति ईशेन निवारितः ॥

**अर्थः**—श्रीगुरु नरसिंहदेवयतींचा शिष्य सायंदेव यास ठार मारण्यासाठीं म्लेंछराजानें बोलाविलें होतें. परंतु गुरुमाहात्म्यामुळें भिऊन त्यानें त्या द्विजाचा सत्कार करून परत गुरूंकडे पाठविलें. गुरूबरोबर तीर्थाटनास जाणेसाठीं त्याची इच्छा होती. परंतु सोळा वर्षांनीं मी पुनः तुला दर्शन देईन असें सांगून त्यांस तेथेंच राहण्यास सांगितलें. ।। ३४ ।।

**बालः कृष्ण उपेन्द्रमाधवसदानन्दा अहं सप्तमो**
**ज्ञानज्योतिरितीतरेऽप्यज इमानूचे न चेहान्वहम् ।।**
**स्थेयं वर्णिवनिव्रतिभ्य उदिते धर्मेऽत्र तैश्चान्वहं**
**कर्तव्यं त्वितरैर्विनाऽजशयनं तीर्थाटनं चान्वहम् ।। ३५ ।।**

**अन्वयः**—बालः कृष्णः उपेन्द्रमाधवसदानन्दाः अहं च सप्तमः ज्ञानज्योतिः च इतरेऽपि शिष्याः इमान् अजः ऊचे इह अन्वहं न च स्थेयं वर्णिवनिव्रतिभ्यः उदिते धर्मे तैः अत्र स्थेयं इतरैः तु अजशयनं विना अन्वहं तीर्थाटनं कर्तव्यं ।।

**अर्थः**—बालसरस्वती, कृष्णसरस्वती, उपेन्द्र, माधव, सदानंद, सहावा मी सिद्ध, सातवा ज्ञानज्योति आणि इतरहि सर्व शिष्यांना श्रीगुरु यति म्हणाले, "ब्रह्मचारी गृहस्थ, वानप्रस्थांनीं नेहमीं एके ठिकाणीं शक्यतों वास्तव्य करावें, असें शास्त्रांत सांगितलें आहे. स्नातक विधुर संन्याश्यानीं मात्र चातुर्मासाशिवाय एका ठिकाणीं सहसा वास करूं नये. त्यांनीं तीर्थाटन करावें, मोक्षशास्त्र श्रवण करावें." ।। ३५ ।।

**पुरीः सप्त धाम्नां चतुष्कं विशोकं सरोरण्यतीर्थाश्रमादीन्नदीश्च ।। द्विषड्ज्योतिराख्यानि लिङ्गानि दृष्ट्वा गुरौ सिंहगे श्रीनगे मां मिलन्तु ।। ३६ ।।**

**अन्वयः**—सप्तपुरीः विशोकं धाम्नां चतुष्कं सरोरण्यतीर्थाश्रमादीन् नदीः द्विषट् ज्योतिराख्यानि लिंगानि च दृष्ट्वा सिंहगे गुरौ श्रीनगे मां मिलन्तु ।।

**अर्थ:**—अयोध्या, मथुरा, माया, वगैरे सात मोक्षनगरी, शोकनाशक अशीं चार धामें, जगन्नाथ, रामेश्वर, द्वारका, बदरिकाश्रम, वगैरे मानससरोवरादि उत्पलादि अरण्यें, पुष्करादितीर्थें पुलस्त्यादिकांचे आश्रम, कृष्णा, वेणी, नर्मदा, गोदा, गंगा आदि करून नद्या, बारा ज्योतिर्लिंगें इत्यादिकांचें स्नानदर्शनादि करून सिंहराशींत गुरु असतांना शैल्यपर्वतावर मला पुनः भेटा. तेथें पुनः परस्परांचा समागमदर्शनाचा योग येईल, असें श्रीनृसिंहयतींनीं आपल्या शिष्यांना सांगितलें. ॥३६॥

**गुरोरवज्ञा भवबन्धदैव गुरोरनुज्ञा भवबन्धदैव ॥**
**सदैव मूर्ध्ना सुमवद्धृतैवं मुदैव ते जग्मुरहं तु नैव ॥ ३७॥**

**अन्वय:**—गुरोः अवज्ञा भवबंधदा एव, गुरोः अनुज्ञा भवबंधदा एव, आज्ञा सदा सुमवत् मूर्ध्नि धृता, एवं ते शिष्याः मुदा एव जग्मुः अहं तु न एव।

**अर्थ:**—"हे गुरुवरा, शास्त्रकथित गुरूंचा कोणत्याहि कारणानें अवमान करणें संसारभयजनक असेंच आहे. आणि त्यांची आज्ञा पाळणें भवतापनाशक आहे. म्हणून आम्ही आपली आज्ञा मस्तकावरील फुलांप्रमाणें शिरसावंद्य मानून तीर्थयात्रेस जातो." असें बोलून ते यावेस गेले. सिद्धनामक मी मात्र गेलों नाहीं.

**अन्तेवासी दूरवासी यदि स्यादन्तेवासित्वं तदाऽस्तंगतं स्यात् ॥ युष्मत्पादाब्जालिरत्राऽस्त्वितीशो यस्माद्भक्त्या मेऽर्थितो मां जुगोप ॥ ३८ ॥**

**अन्वय:**—अन्तेवासी यदि दूरवासी स्यात् तदा तस्य अन्तेवासित्वं अस्तं स्यात् युष्मत्पादाब्जालिः अत्र अस्तु इति यस्मात् मे भक्त्या प्रार्थितः तस्मात् ईशः मां जुगोप ॥

**अर्थ:**—हे यतिमान्या, शिष्य जर गुरूपासून दूर झाला तर त्याचें शिष्यत्व नाहीसें होतें असें मला वाटतें. शिवाय मी तर आपल्या चरण-

कमलांतील भ्रमर आहे. म्हणून हा आपल्या समीपच असावा, अशी गुरुयतिवरांची भक्तीनें प्रार्थना केल्यामुळें माझें सिद्धयतीचें गुरूंनीं सान्निध्यांत रक्षण केलें. ॥ ३८ ॥

**स वैद्यनाथं त्वथ लोकनाथः प्राप्तस्तदाप्तो द्विज उज्झिताप्तः ॥**
**तमाह कस्माद्विधुतस्त्वयाप्तः स प्राह हा कष्टमसौ किमाप्तः॥३९॥**

**अन्वयः**—अथ सः लोकनाथः वैद्यनाथं प्राप्तः तदा उज्झिताप्तः कश्चन द्विजः आप्तः तं आह भगवान् रे विप्र त्वया आप्तः गुरुः कस्मात् विधुतः स आह हा कष्टं असौ आप्तः किं अपि तु न ॥

**अर्थः**—नंतर लोकस्वामी गुरु यतिदेव हे परळी वैजनाथ क्षेत्रीं आले तेव्हां तेथें स्वकीय गुरूस सोडलेला कोणी एक कुविचारी ब्राह्मण आला. त्यास गुरुयति म्हणाले, 'हे हीन विप्रा, तूं स्वगुरुत्याग कां केलास ?' त्यावर तो म्हणाला, "महाराज, तो गुरु काय चांगला आहे नाहीं ? तर तो भलते भलते सांगणारा आहे.॥ ३९ ॥

**विद्यार्थी तं चाश्रयेऽहं सदैव सेवार्थी सन्मां बबाधे मुधैव ॥**
**स त्यक्तो मे देशिकस्येदृशोऽपि त्यागो न्याय्यो गर्वितस्याऽविदोऽपि ॥ ४० ॥**

**अन्वयः**—विद्यार्थी अहं तं आश्रये सेवार्थी सन् सः सदैव मां मुधा बबाधे, अतः मे सः गुरुः त्यक्तः देशिकस्य ईदृशः त्यागः अपि न्याय्यः अविदः अत एव गर्वितस्यापि गुरोः त्यागः न्याय्य एव इति भावः ॥

**अर्थः**—"हे यतिवरा, मी विद्यार्थी होऊन त्या गुरूंकडे अध्ययनार्थ आलों, परंतु तो मात्र केवळ सेवेची अपेक्षा करणारा असल्यानें विनाकारण नेहमीं मला त्रास देऊं लागला. म्हणून मी त्या गुरूचा त्याग केला. कारण अशा गर्विष्ठ, अज्ञानी गुरूंचा त्याग करणें योग्य व नीतीस अनुसरूनच आहे. शिवाय अज्ञ व गर्विष्ठ गुरूला सोडणें योग्यच आहे."॥४०॥

**गुरुराह महान्निर्वहितस्त्वया कुबुध्याऽनयोऽयमविवादः ॥**
**सेवननमनप्रश्नैर्गुरुप्रसादो ह्यतोऽपि भवसादः ॥ ४१ ॥**

**अन्वयः**—गुरुः आह हे विप्र त्वया कुबुद्ध्या अविवादः अयं महान् अनयः विहितः हि यतः सेवननमनप्रश्नैः गुरुप्रसादो भवति, प्रसादात् भवसादः अपि भवति ॥

**अर्थः**—श्रीनृसिंहयति म्हणाले, "हे द्विजा, तूं क्रोधानें व दुर्बुद्धीनें स्वगुरुत्यागरूपी मोठाच अन्याय केलास हें निर्विवाद आहे. कारण, सेवानमन प्रश्न यांनींच गुरुकृपा होते आणि गुरुकृपा झाल्यावरच संसाराचा व तापाचा नाश होतो. ॥ ४१ ॥

**दुर्वृत्तस्यैव भृत्यादेः परित्यागोऽपिनाऽन्यथा ॥**
**पुत्रमांसाशनं मातृगमनं च विधिर्भवेत् ॥ ४२ ॥**

**अन्वयः**—अपि च दुर्वृत्तस्य भृत्यादेः एव परित्यागः न गुरोः अन्यथा पुत्रमांसाशनं मातृगमनं च विधिर्भवेत् ॥

**अर्थः**—'गुरोरप्यवलिप्तस्य' इत्यादि शास्त्रवचनांनीं गर्विष्ठ, कार्याकार्य बोध नसलेला, उत्पथगामी, अशा गुरूचा त्याग करावा असें सांगितलें आहे, असें कांहीं लोक म्हणतात. परंतु त्या वचनांत 'अपि' शब्दानें दुराचारी, कुमार्गी अशा भृत्यादिकांचाच त्याग करावा असा अभिप्राय सुचविला आहे. कारण, तसें न मानल्यास 'अपि वा मातरं गच्छेत् न तु गंगाप्रतिग्रहः' 'पुत्रमांस वरं भोक्तुं' इत्यादि शास्त्रवचनें निरर्थक होतील. म्हणून या वचनांतील 'अपि' शब्दानें गंगाप्रतिग्रह आणि राजप्रतिग्रह त्याज्य आहेत हेंच सिद्ध होतें. म्हणून तूं खरोखरच गुरुद्रोहरूपी मोठा अपराध केला आहेस हें जें सांगितलें तें योग्य आहे." असें श्रीनृसिंहयति त्या ब्राह्मणांस म्हणाले. ॥ ४२ ॥

**शिष्योऽरुणोऽम्बुहरणाद्गुरुदुःखभागी बैदोऽनआनयनतो गुरुभारभागी ॥ गोरक्षकोऽपि च तथा क्षुधितोपमन्युस्ते धौम्यदेशिकयशोऽनुदिशो विनिन्युः ॥ ४३ ॥**

**अन्वयः**—धौम्यगुरोः शिष्यः अरुणः अंबुहरणात् गुरुदुःखभागी तथा अपरः बैदो अनआनयतः गुरुभारभागी, तृतीयः क्षुधितः अपि गोरक्षकः उपमन्युः ते धौम्यदेशिकयशः अनुदिशः विनिन्युः ॥

**अर्थः**—यतिश्रेष्ठ नृसिंह गुरु म्हणाले, "हे मूर्ख ब्राह्मणा, धौम्य ऋषींच्या अरुणनामक एका शिष्यानें गुरूंच्या शेतांस पाणी घालून गुरुसेवाव्रत केलें व भयंकर कष्ट सोसले. त्यांचाच दुसरा बैदनामक शिष्य त्यानें शेतांतील तयार धान्याची गाडी आणून सेवेची पराकाष्ठा केली, आणि त्या कामीं तोहि फार कष्टी झाला. तिसरा उपमन्यु हा खादाड असूनहि त्यानें गुरुगृहीं गोरक्षकाचें काम केलें. त्या कामीं त्यासहि अतिशय मेहनत घेऊन हाल सोसावे लागले. तरीहि ह्या तिघांनीं गुर्वाज्ञा काटेकोरपणें पाळून गुरूंस प्रसन्न करून उभय लोकीचें कल्याण साधलें, आणि धौम्य गुरूंची कीर्ति त्रैलोक्यांत पसरवली." ॥ ४३ ॥

**अधुना मधुना तुल्यो भवतुल्यगुरोर्भव ॥**
**यतिसूक्तिमिति श्रुत्वा नत्वा प्राहेति दुर्मतिः ॥ ४४ ॥**

**अन्वयः**—भवतुल्यगुरोः अधुना मधुना तुल्यो भव इति यति सूक्तिं श्रुत्वा दुर्मतिः ब्राह्मणः नत्वा प्राह ।

**अर्थः**—श्री नृसिंह यति म्हणाले, "हे अविचारी ब्राह्मणा, तूं आतां शिवसमान अशा गुरूशीं मधाप्रमाणें गोड व प्रेमळ वागून राहा, म्हणजे तोच तुझें कल्याण करील." असें यतिवरांचें गोड भाषण ऐकून व नमन करून तो मूर्ख विप्र गुरूंना म्हणाला ॥ ४४ ॥

**युज्यते भिन्नधात्वैक्यं न मुक्तायास्तथा हृदः ॥**
**अतस्तद्दोषहतये मतान्प्राणान्समर्पये ॥ ४५ ॥**

**अन्वयः**—भिन्नधात्वैक्यं युज्यते न मुक्तायाः तथा हृदः न अतः तद्दोषहतये मतान् प्राणान् समर्पये ॥

**अर्थः**—"भिन्नधातुपात्राचें ऐक्य पुनः करतां येतें. परंतु फुटलेला मोती पुनः जोडतां येत नाहीं. तसेंच अन्तःकरण एकदां कलुषित होऊन भिन्न झाल्यास तेंहि जोडणें निष्कलंक करणें अशक्य आहे. म्हणून आतां मी गुरुद्रोहदोषनाशाकरितां सदैव प्रिय अशा प्राणांचा त्याग करतों." ॥ ४५ ॥

**इति तन्निश्चयं विद्वान् कृतार्थं तं व्यधाद् द्युमान् ॥**
**निसर्गोऽयं हि महतां यदार्तार्तिनिवर्तनम् ॥ ४६ ॥**

**अन्वयः**—इति तन्निश्चयं विद्वान् द्युमान् तं कृतार्थं व्यधात् हि यत् आर्तार्तिनिवर्तनं अयं महतां निसर्गः अस्ति ॥

**अर्थः**—याप्रमाणें त्या मूढ विप्राचा निश्चय जाणून स्वयंप्रकाश यति गुरूनीं त्यांस कृतार्थ केलें. कारण पीडितांची पीडा नाहींशीं करणें हा महात्म्यांचा स्वभावच आहे. ॥ ४६ ॥

**पुष्णाति याऽऽर्तान्विनिवृत्ततृष्णान् कृष्णाजमूर्तिः प्रथिताऽत्र कृष्णा ॥ प्रत्यक्तटेऽस्या निवसन्विजिह्वं प्रत्यग्व्यधाद्विप्रसुतं सुजिह्वम् ॥ ४७ ॥**

**अन्वयः**—या कृष्णा अजमूर्तिः इति प्रथिता अत्र या कृष्णा सा आर्तान् पुष्णाति, विनिवृत्ततृष्णान् अपि पुष्णाति अस्याः प्रत्यक्तटे निवसन् प्रत्यक् विजिव्हं विप्रसुतं सुजिव्हं व्यधात् ॥

**अर्थः**—जी कृष्णा नदी रंगानें काळीभोर असल्यामुळें साक्षात् मुकुंदमूर्तीच म्हणून लोकांत विख्यात आहे, आणि जी पातक्यांना व विरागी लोकांनादेखील पवित्र करून सर्वप्रकारें वैभवशाली करते, त्या कृष्णेच्या पश्चिम तीरीं ( औदुंबरक्षेत्रीं ) श्रीगुरु राहिले तेथेंच पूर्वतटाकीं असलेल्या भुवनेश्वरी नामक देवतेच्या चरणीं विद्या मिळविण्यासाठीं

स्वजिव्हा वाहून नंतर देवतेच्या आदेशानुसार गुरूंकडे आलेल्या करवीर-निवासी स्वर्गस्थपंडिताच्या मूर्ख सुताला श्रीगुरुयतींनीं जिव्हा देऊन सुविद्य केलें. ॥ ४७ ॥

**ततो दक्षिणकाशीति कृष्णापञ्चनदीयुतिः ॥**
**ख्याता या तामितो दत्तो यतोऽब्दान्द्वादशाऽवसत् ॥४८॥**

**अन्वयः**—ततः दक्षिणकाशी इति या पंचनदीयुतिः ख्याता तां दत्तो इतः प्राप्तः यतः द्वादशाब्दान् अवसत् ॥

**अर्थः**—यानंतर श्रीगुरु नृसिंहसरस्वती, दक्षिणकाशी म्हणून प्रसिद्ध असलेल्या कृष्णापंचगंगासंगमावर (सध्यांच्या नृसिंहवाडीक्षेत्रीं) आले व तेथेंच बारा वर्षें राहिले. ॥ ४८ ॥

**दरिद्रभूसुरागारं गत्वाऽमरपुरे हरिः ॥**
**शाकाहारं भजन्विप्रशोकागारं समुच्छिनत् ॥ ४९ ॥**

**अन्वयः**—हरिः अमरपुरे दरिद्रभूसुरागारं गत्वा, शाकाहारं भजन् विप्रशोकागारं समुच्छिनत् ॥

**अर्थः**—नंतर भगवान् यतिगुरु कृष्णापूर्वतटाकीं असलेल्या अमरापूरनामक ग्रामीं गेले, तेथील एका दरिद्री ब्राह्मणाच्या घरीं भिक्षेनिमित्त जाऊन त्यानीं आदरानें दिलेलीं घेवड्याच्या शेंगाची भाजी प्रेमानें खाल्ली. नंतर सुवर्णघट देऊन त्याचें दारिद्र्य दूर केलें, आणि त्याचे सूचक असलेला, त्याच्या अंगणांतील वेल तोडला. ॥ ४९ ॥

**स्थित्वाऽमरपुरे भक्तपुरभित्सुरवेष्टितः ॥**
**बभारामरसंयुक्तपुरंदररुचिं शुचिः ॥ ५० ॥**

**अन्वयः**—शुचिः भक्तपुरभित् सुरवेष्टितः अमरपुरे स्थित्वा अमर-संयुक्तपुरंदररुचिं बभार ॥

**अर्थः**—पवित्र, दोषरहित, योगशास्त्रोक्तनियमानें भक्तांच्या अष्ट-चक्रांचा भेद करणारे, अमरेश्वरादि देवांनीं सहित असे नृसिंहगुरु पवित्र,

दैत्यांच्या नगरीचा नाश करणारा देवेंद्र ज्याप्रमाणें देवगणांसह अमरावतींत शोभला, त्याप्रमाणेंच तेहि कृष्णापंचगंगासंगमीं शोभून राहिले. ॥ ५० ॥

**त्रिस्थलीं दर्शयामास योगिनीपूजितोऽजितः ॥**
**गङ्गानुजाय क्षणेनेक्षणेनेदं ततान यः ॥ ५१ ॥**

**अन्वयः**—यः ईक्षणेन इदं विश्वं ततान सः योगिनीपूजितः अजितः क्षणेन गंगानुजाय त्रिस्थलीं दर्शयामास ॥

**अर्थः**—ज्यांनीं केवळ ईक्षणमात्रानेंच अखिल ब्रह्मांड उत्पन्न केलें त्यांची अमरेश्वर संन्निध असलेल्या चौसष्ट योगिनींनीं पूजा केली. नंतर भगवान् श्रीगुरुदेवांनीं गंगानुजाला एका क्षणांत प्रयाग, गया, काशी अशी त्रिस्थलीं दाखविली. ॥ ५१ ॥

**ततो गन्तुकामो विलोक्याप्तकामो भृशं दुःखिता योगिनीस्ता अकामः ॥ समागादिदं पादुके स्थापयित्वा समाश्वास्य ताः सद्वरांश्च प्रदत्वा ॥ ५२ ॥**

**अन्वयः**—ततः क्षेत्रात् गन्तुकामः स्वयं आप्तकामः अतएव अकामः भृशं दुखिताः ताः योगिनीः विलोक्य तत्र पादुके स्थापयित्वा ताः समाश्वास्य च सद्वरान् प्रदत्त्वा इदं समागात् (इति तत्र स्थितस्य सिद्धस्योक्तिः)॥

**अर्थः**—नंतर श्रीगुरुयतिवर नृसिंहवाडी क्षेत्रांतून गाणगापुरीं जाण्यास निघाले, परंतु त्यामुळें अमरापुरक्षेत्रीं राहणाऱ्या चौसष्ट योगिनींस अतिशयच विरहदुःख झालें, तें पाहून श्रीगुरूंनीं त्यांचेकरितां कृष्णापंचगंगासंगमीं आपल्या पादुका स्थापन करून त्यांचें समाधान करून व त्यांना अक्षय्यसुखप्रद असे वर दिले. नंतर वासनाविरहित असें ते भीमामरजासंगमाकडे गेले. ॥ ५२ ॥

**ततः प्रभृति तत्पुरं प्रवरमावभौ सुंदरं दरं हरति यत्सदा निवसतां सतां सादरम् ॥ वरं च वितरत्परं गदहरं सुचारं नरं न रञ्जयति किं न किं दुरितहारि पृथ्वीवरम् ॥ ५३ ॥**

**अन्वयः**—ततः प्रभृति तत्पुरं, प्रवरं च सुंदरं आवभौ, यत् सदा सादरं निवसतां सतां दरं हरति च भक्तेभ्यः अरं वरं वितरति, यत् गदहरं पुरं सुचारं नरं न रंजयति किं अपि तु रंजयति एव ईदृशं नगरं पापहारि न किं अपि तु दुरितनाशकं एव, पुनः च यत् पुरं पृथ्वीवरं. ॥

**अर्थः**—तेव्हांपासून ते नृसिंहवाडी क्षेत्र श्रेष्ठ आणि सुंदर असें झालें. कारण तें क्षेत्र तेथें वास करणाऱ्या व आदरयुक्त सेवावृत्ति करणाऱ्या अशा सदाचारसंपन्न अशा लोकांचें भय नाहींसें करणारें झालें. तें क्षेत्र भक्तांना शीघ्र व इच्छित वर देणारें झालें, अशा प्रकारचें तें क्षेत्र सन्मार्गवर्ति जनांना मनोरंजक व दुरितहारक वाटणार नाहीं काय? अर्थात् वाटेलच. शिवाय तें क्षेत्र श्रेष्ठ होऊन पृथ्वीच्या कुंकुमतिलकाप्रमाणें शोभलें. ॥ ५३ ॥

**सुप्तिस्थितीत्यासनहीन एष कृष्णातटेऽभीष्टकरो विशेषः ॥ गतोऽपि गन्धर्वपुरं दरारिर्यो निर्जिताशेषपुरंदरारिः ॥ ५४ ॥**

**अन्वयः**—सुतिस्थितीत्यासनहीनः एषः गन्धर्वपुरं गतः अपि अभीष्टकरः सः कृष्णातटे आस्ते अयं विशेषः यः निर्जिताशेषपुरंदरारिः दरारिः (अस्ति इति भावः ॥ )

**अर्थः**—जागृतिस्वप्नसुषुप्ति या अवस्थात्रयरहित असे भगवान् यतिमान्य नृसिंहगुरु जरी गाणगापुरीं गेले, तरी भक्तकामना पूर्ण करणारे ते कृष्णातटींच राहत असत हें विशेष होय. कारण त्यांना, सकल देवशत्रूंचा नाश करून ज्यांचें संरक्षण केलें त्या स्वभक्तांचेंहि भय निवारण करून संरक्षण करावयाचें होतें. म्हणून तें लौकिकदृष्ट्या

गाणगापुरीं होतें, आणि अलौकिकदृष्ट्या भक्तजनहितार्थ नृसिंहवाडी क्षेत्रांतच होते, ही महत्त्वाची गोष्ट होय. ॥ ५४ ॥

**तत्रत्यविप्रवनिता मृतापत्यत्वदुःखिता ॥**
**विप्रवाक्याद्गुरुपदं क्षिप्रदं भेज आर्तिदम् ॥ ५५ ॥**

**अन्वयः**—मृतापत्यत्वदुःखिता तत्रत्यविप्रवनिता विप्रवाक्यात् क्षिप्रदं आर्तिदं च गुरुपदं भेजे ॥

**अर्थः**—मृतपुत्राच्या दुःखानें आर्त झालेली, नृसिंहवाडीनजीक असलेल्या शिरोळ ग्रामांतील एक द्विजसती विद्वान् व गणक ब्राह्मणाच्या सांगण्यावरून गुरुपादुकांसमीप आली, आणि तिनें कृष्णप्रवाहांत शुक्ल-तीर्थापासून संगमापर्यंत असलेल्या अष्टतीर्थांत स्नान करून तत्काळ इच्छित कामना पूर्ण करणाऱ्या व भयहारक अशा श्रीगुरुपादुकांची सेवा केली. ॥ ५५ ॥

**तया पुरा विप्रधनं हृतं मृतो दयाविहीनः स पिशाचतां गतः॥ स भीषयामास सतीमतीव तां सुभीषणः स्वप्न उपस्थ आनताम् ॥ ५६ ॥**

**अन्वयः**—तया पुरा विप्रधनं हृतं मृतः सः दयाविहीनः पिशाचतां गतः सुभीषणः सः उपस्थे स्वप्ने आनतां तां सतीं भीषयामास ॥

**अर्थः**—त्या विप्रसतीनें पूर्वजन्मांत एका वसतीस आलेल्या ब्राह्मणाचे शंभर रुपये काढून घेतले होते. त्यामुळें तो लोभी ब्राह्मण मेला. त्याचा अंत्यविधि न झाल्यानें तो पिशाच झाला, आणि निर्दय बनला. नंतर अतिशय भयंकर असा तो त्या सतीच्या स्वप्नांत येऊन आपलें धन मागूं लागला, परंतु निर्धनतेमुळें तिला धन देतां आलें नाहीं. म्हणून तो पिशाच वारंवार स्वप्नांत येऊन तिला भीति दाखवूं लागला, व सतीच्या संततीचा नाश करून पीडा करूं लागला. ॥ ५६ ॥

**सहसा गुरुराप तां नतां तरसा तं विनिवार्य दुःखिताम् ॥ स विधाय च पृष्ठतोऽवदत्सविधे मेप्यनयोऽसि को वद ॥ ५७ ॥**

**अन्वयः**—सहसा तरसा गुरुः दुःखितां नतां तां प्राप च तं विनिवार्य सः च तां पृष्ठतः विधाय मे सविधे अपि अनयः त्वं कोऽसि वद इति अवदत् ॥

**अर्थः**—मृतपुत्र सतीच्या स्वप्नांत श्रीगुरु यतिवर अकस्मात् व मोठ्या वेगानें गेले, आणि त्या पिशाचरूप ब्राह्मणांस दूर करून त्यांनीं तिला आपल्या पाठीशीं घेतलें. दुःखी असलेल्या सतीस अभय देऊन गुरु म्हणाले, 'ही सती माझ्या सेवेंत व सान्निध्यांत आहे, असें असूनहि हिच्यावर अन्याय व अपराध करणारा तूं कोण आहेस तें सांग.'॥५७॥

**एवं वदन्तमवलोक्य स नारसिंहं सिंहोन्नताक्षमपि धूतविपक्ष-पक्षम् ॥ त्यक्त्वा वसन्ततिलकामिव कान्तवक्त्रां वक्त्रागता-मिव सुधांशुतनुं तनूनः ॥ ५८ ॥**

**अन्वयः**—सः अपि पिशाच एवं वदन्तं धूतविधूतपक्षम् सिंहोन्नताक्षं नारसिंहं अवलोक्य कांतवक्त्रां अत एव वसंततिलकां इव तां तनूनः वक्त्रागतां सुधांशुतनुं त्यक्त्वा एवं उवाच (इति अग्रिमण श्लोकेन अन्वयः) ॥

**अर्थः**—त्या पिशाच्यानेंसुद्धां अशा प्रकारें भाषण करणाऱ्या, शत्रुपक्ष व अभक्तांचें निर्दलन करणाऱ्या, सिंहाप्रमाणें टपोरे व पाणीदार डोळे असलेल्या अशा नृसिंहगुरूंस पाहून सुंदरमुखी व वसंतऋतूंचा शोभा-रूपी सौभाग्यकुंकुमतिलकच जणूं असलेल्या अशा त्या विप्रसतीस, राहू ज्याप्रमाणें ग्रासलेल्या चंद्रास सोडतो, पीडा करीत नाहीं, त्याप्रमाणेंच सोडले, येथून पुढें सतीस मी पीडा करणार नाहीं, असें बोलून त्यानें नृसिंहगुरुचरणीं पुढीलप्रमाणें विनंती केली. ॥ ५८ ॥

**उवाच नीचः सततं पिशाचः शृणुष्व वाचं त्वमिहाऽप्रपञ्चः ॥ विपक्षभूतस्तु स पक्षपातो यते विघातश्च न ते प्रशस्तः ॥५९॥**

**अन्वयः**—नीचः सः पिशाचः भगवन्तं उवाच–हे भगवन् मे वाचं श्रुणुष्व इह त्वं सततं अप्रपंचः असि, तस्मात् भो यतिवर विपक्षभूतः स पक्षपातः तु ते न प्रशस्तः तथा च अस्मदादीनां विघातश्च अपि ते न प्रशस्तः ॥

**अर्थः**—नंतर तो नीच पिशाच श्रीगुरूंस म्हणालाः महाराज, गुरुदेवा, माझें म्हणणें ऐका. या जगांत आपण निःपक्षपाती व सर्वत्र समदर्शी असें आहांत म्हणून मी आपल्या चरणीं विनंती करतों कीं, माझ्या विरुद्ध पक्षांस आपण भीति निवारण करून व अभयदान देऊन संरक्षण करीत आहांत तरी तसें करूं नका. कारण त्यायोगें आपण उघड उघड पक्षपात करीत आहांत असें सर्वत्र विश्रुत होईल. म्हणून तें आपणांस योग्य नाहीं. तसेंच पक्षपाती धोरणानें आमच्यासारख्यांचा समूळ नाश करणेंहि उचित होणार नाहीं. कारण, तेंहि आपल्यासारख्या थोर आणि महान् विभूतींस स्तुत्य होणार नाहीं. कारण, साधु असाधु आम्ही सारखेच आहोंत. ॥ ५९ ॥

**अनयाऽपहृतो ममैव रा अनया वासनयाऽस्य मेवरा ॥**
**सम योनिरुपागताथिता मम को वारयिता चिरागताम् ॥ ६० ॥**

**अन्वयः**—अनया ब्राह्मणभार्यया ममैव राः अपहृतः हे सम अनया वासनया मे अवरा योनिः प्रार्थिता सती उपागता मम चिरागतां तां योनिं को वारयिता ( इति श्रीगुरुं प्रति पिशाचप्रश्नः ) ॥

**अर्थः**—श्रीनृसिंहगुरु यतींना तो पिशाच पुनः म्हणालाः महाराज, आपण सर्वांवर समदृष्टि ठेवणारे आहांतच. ह्या द्विजसतीनें पूर्वजन्मांत मला ठार करून माझें सर्व द्रव्य हिरावून घेतलें. त्यामुळें संतापानें मी पिशाच होऊन तुझा घात करीन असें अभिनिवेशानें म्हटलें. त्यायोगें मला ही नीच अशी पिशाचयोनि मिळाली आहे. पुष्कळ दिवसांपासून भोगीत असलेल्या ह्या पिशाचयोनींतून मला आतां कोण सोडवणार

आहे ? अर्थात् कोणीहि नाहीं. मग आपण कां बरें मला शासन करून भयभीत करीत आहांत ? ॥ ६० ॥

**गुरुः प्राह ते सद्गतिं कारयिष्ये सुदीनां तथैनां पिशाचोद्धरिष्ये ॥ इमां भीषयस्यङ्ग चेत्ताडयिष्ये पिशाचोऽपि चोचे तथाऽतस्तरिष्ये ॥ ६१ ॥**

**अन्वयः**—गुरुः भगवान् तं प्राह, हे पिशाच, ते सद्गतिं कारयिष्ये तथा च सुदीनां एनां उद्धरिष्ये हे अंग, हे पिशाच, अतःपरं इमां ब्राह्मणीं भीषयसि चेत् तर्हि त्वां ताडयिष्ये तत् श्रुत्वा पिशाचः ऊचे हे भगवन् यथा त्वं वदसि तथा अस्तु अतः भवदुक्तोपायात् अहं तरिष्ये निश्चयेन इति तात्पर्य ॥

**अर्थः**—भगवान् श्रीगुरु नृसिंह यति त्या पिशाचास म्हणाले: 'हे पिशाचा, मी तुला सद्गति मिळवून देतों व त्याचप्रमाणें तुझ्या पीडेनें गांजलेल्या माझी सेवा करणाऱ्या, ह्या दीन द्विजसतीचाहि उद्धार करणार आहें. हे पिशाचरूपी ब्राह्मणा, येथून पुढें या द्विजपत्नीस जर भीति दाखवून पीडा करशील तर मी तुला ताडन करीन.' हें ऐकून तो पिशाच म्हणाला: 'भगवन् गुरुदेवा, आपण जसें सांगाल तसें ऐकण्यास मी तयार आहें. कारण गुरुदेवांनीं सांगितलेल्याच उपायांनीं मी भवपार होऊन तरणार आहें. तेव्हां गुरुवचनांप्रमाणेंच मी वागलें पाहिजे.' ॥६१॥

**सतीमतीव नीतिमानिमां जगौ त्वया क्रिया विधीयतां सतां मता धिया तयाऽप्यमायया ॥गतिं समाप्नुयादयं लयं च तेऽपि दुष्कृतं मतं सुतं सुतन्तुवर्धकं द्रुतं लभस्व तम् ॥ ६२ ॥**

**अन्वयः**—अतीव नीतिमान् भगवान् इमां सतीं जगौ धिया सतां मता क्रिया विधीयतां अमायया तया अपि पिशाचः गतिं च तेऽपि दुष्कृतं लयं समाप्नुयात् मतं सुतन्तुवर्धकं सुतं द्रुतं लभस्व ॥

**अर्थः**—अतिशय काटेकोरपणें नीतिमार्गाचा अवलंब करणारे श्रीगुरु नृसिंह देव त्या विप्रसतीस म्हणाले: 'हे भूदेवसती, मी जरी सकलसामर्थ्यसंपन्न असलों, तरी देखील अन्यायानें कोणांस शिक्षा करणार नाहीं, करतां तूं त्या पिशाचाचें, शांतपणें व सहानुभूतीनें, सदाचारी धार्मिकांना मान्य होईल असें और्ध्वदेहिक कृत्य कर. त्यायोगें हा पिशाच सद्गतीस जाईल आणि धर्मांप्रमाणें केलेल्या व कपटरहित अशा त्या कर्मानेंच तुझेंहि दुष्ट कर्म नाश पावेल. नंतर लवकरच सर्व लोकांत मान्यतेस पोंचणारा उत्तम संतति वाढवणारा असा, सुपुत्र तुला होईल व तुझी कीर्ति या जगांत सर्वत्र पसरेल.' ॥ ६२ ॥

**ततो बुध्द्वा तथा कृत्वा तस्मै दत्वा गतिं सती ॥**
**लेभे फले गुरोः काले ततो जातौ मतौ सुतौ ॥ ६३ ॥**

**अन्वयः**—ततः सती बुद्ध्वा तथा कृत्वा तस्मै गतिं दत्वा गुरोः सकाशात् फले लेभे ततः काले मतौ सुतौ जातौ ॥

**अर्थः**—यानंतर ती विप्रस्त्री जागी होऊन अंथरुणावरून उठली. श्रीगुरुमहाराजांनीं सांगितल्याप्रमाणें तिनें त्या पिशाचाच्या मुक्त्यर्थ शास्त्रोक्त रीतीनें अंत्यविधि करून त्यास सद्गतीस पोहोंचविलें. नंतर श्रीगुरुसंन्निध ती आली, श्रीगुरुमहाराजांनीं दोन नारळ प्रसादरूपानें दिले. नंतर योग्य कालीं तिला सर्वमान्य असे दोन मुलगे झाले. ॥६३॥

**अष्टमेऽनिष्टदे वर्षे संनिपात उपागतः ॥**
**ततो मृतोऽग्रतो जातः पितृतः सः मतः सुतः ॥ ६४ ॥**

**अन्वयः**—अनिष्टदे पुत्रस्य अष्टमे वर्षे संनिपातः उपागतः ततः सान्निपातात् पितृतः अग्रतो जातः यः सुतः सः मृतः ॥

**अर्थः**—यानंतर अनिष्टकारक अशा आठव्या वर्षीं विप्रसतीच्या थोरल्या मुलास त्रिदोषजन्य असा संन्निपात ज्वर झाला आणि त्यामुळें पितृसान्निध्यांत तो मुलगा मरण पावला. ॥ ६४ ॥

**सतीं सुनीतिं रुदतीमतीव दयालुरेत्याऽखिलदृग्व्रतीव ॥ भूत्वाऽवदन्नैति मृतः कुतस्त्वं मुधोच्चकै रोदिषि मैह्यविच्त्वम् ॥ ६५ ॥**

**अन्वयः**—अखिलदृक् दयालुः भगवान् व्रती इव भूत्वा अतीव रुदतीं सुनीतिं सतीं एत्य अवदत् मृतः न एति त्वं कुतः मुधा उच्चकैः रोदिषि तस्मात् हे ब्राह्मणि अविच्त्वं मा एहि ॥

**अर्थः**—नंतर सर्वसाक्षी दयाळू भगवान् नृसिंह गुरुराज ब्रह्मचाऱ्याचें रूप घेऊन पुत्रशोकानें विव्हल होऊन अतिशय आक्रोश करणाऱ्या नीतिधर्मयुक्त अशा त्या द्विजभार्येकडे आले आणि म्हणाले, 'हे स्त्रिये, मेलेले पुत्रादि पुनः या जगांत मिळत नाहींत; असें सर्वश्रुत असूनहि तूं विनाकारण कां बरें मोठ्यानें रडत आहेस? तुझा आक्रोश व्यर्थ आहे. म्हणून हे अंगने, तूं अज्ञानी व अविचारी होऊं नकोस. कारण मेलेला प्राणी खूप आक्रोश करूनहि पुनः मिळत नाहीं.' ॥ ६५ ॥

**निःसारोयं संसारो यं यान्त्याश्रित्य भ्रान्त्याऽपायम् ॥**
**विद्युन्मालालीलालम्बी तं बीभत्सं जह्याघातम् ॥ ६६ ॥**

**अन्वयः**—हे ब्राह्मणि, अयं संसारः निःसारः अस्ति भ्रांत्या यं आश्रित्य अपायं यान्ति (लोका इति शेषः) यः विद्युन्मालालीलालम्बी तं आघातं अत एव बीभत्सं जहि ॥

**अर्थः**—श्रीगुरु नृसिंह यतिराज म्हणाले, 'हे अग्रजसती, हा संसार स्नेहशून्य, सुखविरहित म्हणूनच निःसार असाच आहे. भ्रममूलक सुखकल्पनेनें लोक संसाराचा आश्रय करतात आणि परिणामीं अधिकच दुःखांत पडतात, व नंतर शोकमग्न होतात. संसार विजेच्या माळेप्रमाणें अतिशय चंचल, दिसल्याबरोबर त्याच क्षणीं नाश पावणारा असा स्वाभाविकच आहे. शिवाय संसारांत सर्व बाजूंनीं मनुष्यावर अनिष्ट असें आघातच होतात. इतकेंच नाहींतर संसार सर्व तऱ्हेनें घाणीनें

भरलेला असून किळसवाण्या गोष्टीचें तो एक माहेरघरच आहे असें समज. ॥ ६६ ॥

**भुजगशिशुभृता यद्वत्स्वपिति न भववान्तद्वत् ॥**
**तनुतनुजमुखं नित्यं भृशसुविपदहो सत्यम् ॥ ६७ ॥**

**अन्वयः**—भुजगशिशुभृता यद्वत् न स्वपिति तद्वत् भववान् अपि न स्वपिति, अहो तनुतनुजमुखं नित्यं भृशं दुःखं एतत् सत्यम् ॥

**अर्थः**—पुनः श्रीगुरु यतिश्रेष्ट म्हणालेः हे सदाचारसंपन्न स्त्रिये, मंत्रौषधिसामर्थ्यानें नागपुत्रांना आपल्या मांडीवर धारण करणारी एखादी चेटकीण जशी सुखानें झोपत नाहीं, त्याचप्रमाणें संसारी मनुष्य अनेक प्रकारच्या सांसारिक चिंतेनें व्याकुळ झाल्यामुळें त्याला क्षणभर सुखानें झोंपहि मिळत नाहीं. यापेक्षां अधिक काय सांगावें ? अहो ! देहादि अहंकारबुद्धीनें स्वदेहपुत्रादींचें निदर्शनादि कार्यमग्न असणें ही एक खरोखरच फार मोठी आपत्तीच आहे, ही गोष्ट निःसंशय सत्य आहे. ॥ ६७ ॥

**न विमतो हि सुतो यदि ते मतः स्मरसि किं गतजन्मकथां वृथा ॥ सुमति मा कुरु शोकमकास्पदं विपदधारि हरेः स्मर रे पदम् ॥ ६८ ॥**

**अन्वयः**—विमतः सुतः न यदि ते सुतः मतः तर्हि गतजन्मकथां-स्मरसि किं अपि तु न हि यस्मात् एवं तस्मात् हे सुमति अकास्पदं शोकं वृथा मा कुरु रे सुमति विपदधारि हरेः पदं स्मर ततो मुक्तिरिति भावः॥

**अर्थ**—श्रीगुरुदत्तमहाराज म्हणाले, " हे सुबुद्ध व विचारी स्त्रिये, हा मृतपुत्र तुझाच आहे किंवा नाहीं अशी संशयजनक-बुद्धि तुझी नाहीं. तर हा माझाच मुलगा आहे हें जर तुला मान्य असेल तर तुला पूर्वजन्म-कथा आठवतें काय ? कारण सध्यांच्या तुझा म्हणून मानलेल्या ह्या पुत्राविषयीं जर तूं शोक करीत आहेस, तर पूर्वजन्मांतील तुझ्या पुत्रा-

विषयीं तूं आतां कां शोक करीत नाहींस? त्यावरून तुला पूर्वजन्मकथा स्मरत नाहीं हें निश्चित. असें जर आहे तर हे सुबुद्ध चतुर स्त्रिये, व्यर्थ दुःखाचें मूळ कारण असलेला हा पुत्रशोक करूं नको. त्याचा कांहीं उपयोग नाहीं. हे चाणाक्ष अंगने, सर्व संकटें आणि पातकें, महापातकें यांचा समूळ नाश करणाऱ्या हरिचरणकमलांचेंच आतां स्मरण कर. कारण, त्यायोगेंच तूं भयंकर अशा या संसारांतून तरून मुक्त होशील." ॥ ६८ ॥

**एवं सा बोधिता माता मृतस्यातीव दुःखिता ॥**
**गुरुं प्राह न वेदान्तोऽदान्ताया रोचते मम ॥ ६९ ॥**

**अन्वयः**—एवं गुरुणा बोधिता अतीव दुःखिता सा मृतस्य माता गुरुं प्राह अदान्तायाः मम वेदान्तः न रोचते ॥

**अर्थः**—याप्रमाणें श्रीगुरु यतिवरांनीं वारंवार आश्वासन देऊन त्या द्विजपत्नीस बोध केला तरी देखील अतिशय दुःखार्त झालेली मृतपुत्राची माता म्हणाली, "महाराज, मी इंद्रियनिग्रही नाहीं. त्यामुळें अनधिकारी अशा मला आपला वेदान्तोपदेश रुचत नाहीं." ॥ ६९ ॥

**कुमारललितां मां व्यधात्पुनरपीमाम् ॥**
**स मज्जयति शोके कुतो वद नृलोके ॥ ७० ॥**

**अन्वयः**—यः मृतवंध्या मां कुमारललितां व्यधात् सः भगवान् मां नृलोके शोके कुतो मज्जयति इदं वद ॥

**अर्थः**—ती विप्रसती श्रीगुरुमहाराजांना म्हणाली, "हे यतिवरा, ज्यानें मृतवंध्या अशा मला दोन सुपुत्र दिले तोच भगवान् या जगांत मला शोकसागरांत कां बरें टांकीत आहे, हे सांग. हे यतिश्रेष्ठा, तो जर मला शोकसमुद्रांत लोटेल तर तो भगवान् मला परलोक कसा देऊं शकेल?" असें ती थोडी वक्रोक्तीनें म्हणाली. ॥ ७० ॥

**सोऽवददीशः स्ववरं सोऽपि हि वेदापि परम्॥**
**माणवकाक्रीडितकं तं परिपृच्छेदमकम्॥ ७१ ॥**

**अन्वयः**—सः अवदत् ईशः स्ववरं वेद सोऽपि हि परमपि माणवकाक्रीडितकं वेद यत्र वरो लब्धः तत्र गत्वा इदम् अकं तं वरदातारं परिपृच्छ॥

**अर्थः**—ब्रह्मचारी वेषधारी भगवान् म्हणाले, " हे द्विजकुटुंबिनी, तूं ज्याची आराधना केलीस त्यांचा वर ते जाणीत आहेत. त्यांनाहि ह्या मृतमुलांचे व्यापार आणि त्रिविध कर्म माहीत आहेच. करितां तुला जेथें वर मिळाले तेथें जा आणि हें पुत्रशोकाचें दुःख वर देणाऱ्यांनाच सांग व विचार म्हणजे झालें. " ॥ ७१ ॥

**श्रुत्वेत्यथ संध्याऽभ्राक्षी तनुमध्या॥**
**मध्याह्न उपात्ता सात्ताश्रममार्ता॥ ७२ ॥**

**अन्वयः**—इतीत्थं श्रुत्वा अथ तनुमध्या संध्याभ्राक्षी सा मध्यान्हे शोकार्ता सती आत्तस्य गुरोः आश्रमं कृष्णातटं उपात्ता॥

**अर्थः**—याप्रमाणें ब्रह्मचारी वेषधारी गुरुवरांचें भाषण ऐकून सिंहकटी व आरक्तनेत्रा अशी ती विप्रसती शोकानें व्याकुळ होऊन मध्यान्हकाळीं वर देणाऱ्या नृसिंह गुरूंच्या आश्रमीं म्हणजे कृष्णातटाकीं पादुकांसंनिध आली. ॥ ७२ ॥

**सशवा सजवाऽगत्य पदोः साताडयच्छिरः॥**
**नाऽऽदाद्दग्धुं शवं जग्मुः सर्वे तत्र तु जंपती॥ ७३ ॥**

**अन्वयः**—सजवा सशवा सा आगत्य पदोः शिरः अताडयत् शवं दग्धुं न अदात् सर्वे ग्रामं जग्मुः तत्र तु जंपती तस्थतुः इति॥

**अर्थः**—मोठया वेगानें प्रेत घेऊन ती साध्वी गुरुपादुकांसंनिध आली आणि पादुकांवर आपलें डोकें बडवून घेऊन त्या रक्तानें भिजवून टांकल्या. प्रेत दहन करण्याकरितां लोक मागूं लागले तरीहि तिनें तें प्रेत

दहन करण्यास दिलें नाहीं. लोक कंटाळून परत गांवीं निघून गेले. परंतु फक्त पतिपत्नी मात्र तेथेंच प्रेत घेऊन राहिलीं. ॥ ७३ ॥

**चण्डी सोच्चण्डवाक् चक्रे चक्राङ्के गुरुपादुके ।।**
**रक्तोक्षिते निजशिरस्ताडनेन पुनः पुनः ॥ ७४ ॥**

**अन्वयः**—चंडी उच्चंडवाक् सा ब्राह्मणी चक्राङ्के गुरुपादुके पुनःपुनः निजशिरस्ताडनेन रक्तोक्षिते चक्रे ॥

**अर्थः**—भयंकर रागीट, कठोर व कर्कश वाणी असलेली ती ब्राह्मणी, तिनें चक्रादि चिन्हांनी युक्त अशा श्रीगुरुपादुकांवर पुनः पुनः आपलें डोकें बडवून घेऊन त्या रक्तानें भिजवून टाकल्या व तेथेंच रात्रभर राहिली. ॥ ७४ ॥

**गुरुः स्वप्नेऽथ तां प्राह मा रोदीर्जीवितः सुतः ॥**
**प्राणो नामैष वायुः स यातोऽपि पुनराहृतः ॥ ७५ ॥**

**अन्वयः**—अथ भगवान् गुरुः स्वप्ने तां प्राह हे ब्राह्मणि मा रोदीः तव सुतः जीवितः प्राणो नाम एषः वायुः बहिः यातः अपि मया पुनः आहृतः ॥

**अर्थः**—नंतर भगवान् श्रीनृसिंह गुरु त्या ब्राह्मणीस स्वप्नांत म्हणाले, " हे स्त्रिये, रडूं नको, आक्रोश करूं नको. हा तुझा मुलगा जिवंत झाला आहे. प्राण हा एक वायूच आहे. तो शरीरांतून बाहेर निघून गेला होता. तो मी पुनः परत आणून घातला आहें. म्हणून आतां आक्रोश नको. " ॥ ७५ ॥

**मृतमुत्थितमुत्थितौ तु तौ मुदितं तं मुदितावपश्यताम् ॥**
**अपि कल्य उपागता द्विजा अजमापूज्य सुपूज्यमस्तुवन् ॥ ७६ ॥**

**अन्वयः**—मृतं उत्थितं मुदितं तं सुतं उत्थितौ मुदितौ तौ तु अपश्यतां तथा कल्ये उपागताः द्विजा अपि तथाभूतं अपश्यन् ते सर्वे भगवंतं सुपूज्यं आपूज्य अस्तुवन् ॥

**अर्थः**—प्रथम मेलेला व नंतर जिवंत झालेला व आनंदित असलेल्या अशा त्या पुत्रास झोपून उठलेल्या व अपेक्षित साध्य झालेल्यानें हर्षपूर्ण झालेल्या अशा दम्पतींनीं डोळे भरून पाहिलें. इतक्यांत सकाळीं प्रेतसंस्कारार्थ आलेल्या ब्राह्मणानीहि मृतपुत्र जिवंत झालेला पाहिला. नंतर त्या सर्वांनीं सकलजनवंदनीय अशा गुरुपादुकांची पूजा केली आणि आनंदित मनानें महाराजांची स्तुति केली. ॥ ७६ ॥

**यातेऽपि भगवत्यत्र फलसिद्धिरलं नृणाम् ॥**
**एवमग्रेऽपि जागर्ति न निद्राति सतां पतिः ॥ ७७ ॥**

**अन्वयः**—यातेऽपि भगवति अत्र नृणां फलसिद्धिः अलं एवं अग्रेऽपि जागर्ति सतां पतिः न निद्राति ॥

**अर्थः**—भगवान् श्रीगुरु नृसिंहदेव जरी नृसिंहवाडीक्षेत्रांतून गाणगापुरी गेले, तरीहि वाटिकाक्षेत्रीं भक्तजनांच्या अभीष्ट कामना निश्चित पूर्ण होतातच असें पुढेंहि उत्तरोत्तर कालींहि होणारच. कारण, भक्तकामकल्पद्रुम असा तो भगवान् झोपलेला नाहीं. भक्तजनोद्धारार्थ भगवान् नेहमी जागृतच आहे. ॥ ७७ ॥

**भीमामरजासंगममागत्य श्रीगुरुः स्थितः परदः ॥**
**भिक्षार्थं ग्रामगतो वन्ध्यामहिषीमदोहयद्वरदः ॥ ७८ ॥**

**अन्वयः**—परदः श्रीगुरुः भीमामरजासंगमं आगत्य स्थितः भिक्षार्थं ग्रामगतः वरदः वंध्यामहिषीं अदोहयत् ॥

**अर्थः**—भक्तांना मोक्ष देणारे भगवान् श्रीगुरु नृसिंह यति भीमा व अमराजा यांच्या संगमावर येऊन राहिले. भिक्षेकरितां गाणगापुरीं गेले असतांना एका सात्त्विकवृत्ति ब्राह्मणाच्या घरीं गेले. द्विजसतीनें आपले पति कोरान्नाकरितां बाहेर गेले असून ते परत आल्यानंतर भिक्षा मिळेल असें सांगितलें. हें सतीवचन ऐकून श्रीगुरूंनीं वंध्यामहिषीची धार काढण्यास सांगितली. गुरूंच्या आज्ञेनुसार दूध काढलें.

तें गुरूंनीं प्राशन केलें. सर्वांना हा चमत्कार वाटला. परंतु श्रीगुरु वर देऊन मनोरथ पूर्ण करणारे असेच आहेत. ॥ ७८ ॥

**भक्तिप्रियोऽपि स्वाधीनो राजाधीनोऽभवद्यतिः ॥**
**स्वयं निरुपचारोऽपि जातो राजोपचारभाक् ॥ ७९ ॥**

**अन्वयः**—स्वाधीनोऽपि भक्तिप्रियः यतिः राजाधीनः अभवत्, स्वयं निरुपचारोऽपि राजोपचारभाक् जातः ॥

**अर्थः**—श्रीगुरुनृसिंह यतिमहाराज स्वतः स्वयंपूर्ण व स्वतंत्र असूनहि भक्तजनप्रिय असल्यानें गाणगानगरांतील राजाच्या आग्रह-पूर्वक विनंतीवरून पालखी, छत्र, चामर, चौरी इत्यादि राजैश्वर्याचा भोग घेऊन राजगुरु झाले. ॥ ७९ ॥

**पुरमेत्य समुद्धृत्य ब्रह्मराक्षसमीक्षणात् ॥**
**सलीलोत्पादितजगज्जगद्वासो मठेऽवसत् ॥ ८० ॥**

**अन्वयः**—सः भगवान् पुरं एत्य ईक्षणात् ब्रह्मराक्षसं समुध्दृत्य सलीलोत्पादितजगज्जगद्वासः मठे अवसत् ॥

**अर्थः**—गंधर्वपुरांत आल्यानंतर श्रीगुरुदेवांनीं केवळ नुसत्या अव-लोकनमात्रानेंच एका ब्रह्मराक्षसाचा उद्धार केला. ज्यांनीं केवळ लीले-नेंच हा अखिल ब्रह्मांडाचा पसारा निर्माण केला आणि अखिल जगतांचा समावेश ज्याच्या स्वरूपांत विलीन आहे असे जगन्निवास श्रीगुरु यति-राज राजानें बांधून दिलेल्या मठांत स्वभक्तसंरक्षणार्थ सुखानें राहिले.

**योऽभिधानत उत त्रिविक्रमः सार्थकं परमकं त्रिविक्रमम् ॥**
**सद्गतिं यतिपतिं स्म निन्दति यं हृदाऽपि हि मुनिर्न विन्दति ८१**

**अन्वयः**—यः उत अभिधानतः त्रिविक्रमः सः सद्गतिं परमकं सार्थकं त्रिविक्रमं तं यतिपतिं निंदति स्म हि यं हृदापि मुनिः न विंदति ॥

**अर्थः**—जो केवळ नाममात्र त्रिविक्रममुनि होता, कुमशी गांवांतील त्या मुनीनें, जो खरोखरच तीन पावलानें त्रिलोक व्यापणारा असा आहे,

आणि जो अत्यंत श्रेष्ठ कल्याणस्वरूप व परमानंदरूप आहे, जो सद्भक्तांना परमगति देतो, अशा त्या श्रीनृसिंहदेवाची हा दांभिक संन्यासी आहे म्हणून निंदा केली. छत्रचामरादि राजचिन्हें धारण करणारे हे संन्यासी कसले अशी निंदा केली. ध्यानधारणा करून मननशील झालेले मुनि मनानेंसुद्धां ज्या प्रभूला जाणूं शकत नाहींत. ॥ ८१ ॥

**तं विद्वान्प्रययौ शास्ता राजलक्ष्मपरिष्कृतः**
**राजराजश्रियं भेजे नृधर्मा नरवाहनः ॥ ८२ ॥**

**अन्वयः**—शास्ता ( भगवान् ) विद्वान् तं निन्दकं ( कुमशीग्रामं ) प्रययौ। राजलक्ष्मपरिष्कृतः नृधर्मा नरवाहनः(भगवान्) राजराजश्रियं भेजे ॥

**अर्थः**—सर्व लोकांचे शासनकर्ते भगवान् श्रीगुरु नृसिंह यति (सर्व विद्यापारंगत ) निन्दा करणाऱ्या त्या त्रिविक्रम यतीकडे कुमशीग्रामीं गेले. नृसिंहदेव त्या वेळीं सामान्य मनुष्यधर्माप्रमाणें वागत असून पालखींत बसून संपत्तिमान् कुबेराप्रमाणें शोभायमान होऊन त्रिविक्रमयतींस भेट देण्याकरितां आले. ॥८२॥

**मुदा नृसिंहं हृदि चिन्तयानस्तदा ददर्शाऽपि च मर्त्ययानम् ॥**
**नदीतटस्थं यतिभिः परीतं स दीनदीनः प्रययौ विनीतः॥ ८३ ॥**

**अन्वयः**—तदा मुदा हृदि ( नृसिंहं ) चिन्तयानः अपि नदीतटस्थं मर्त्ययानम् यतिभिः परीतम् च दीनदीनः विनीतः सः प्रययौ ( ध्यानं विसृज्य नदीतीरं जगाम ) ॥

**अर्थः**—तेव्हां आनंदानें हृदयांत नृसिंहाचें नेहमीं ध्यान करणारा असा तो त्रिविक्रमयति नदीतीरावर पालखींतून व पुष्कळ संन्याशांनीं युक्त अशा श्रीगुरुयतींना मानसिक स्वरूपानें पाहून आपल्यावर भगवान् गुरुदेवाची अवकृपा होऊं नये म्हणून तो अत्यंत नम्र झाला, व दीनापेक्षांहि दीन होऊन आपले नेहमींचें नृसिंहध्यान सोडून नदीतीरावर आला. ॥ ८३ ॥

**त्रिविक्रमोऽपश्यदशेषसैन्यं संन्यासिरूपं न च कंचनान्यम् ॥ तं विस्मितं यानग आह देवस्त्वं यं यते निन्दसि सोऽयमेत्र ॥ ८४ ॥**

**अन्वयः**—त्रिविक्रमः अशेषसैन्यं संन्यासिरूपं अपश्यत् । (संन्यासात्) अन्यं कं पुरुषं न च अपश्यत् तदा (कुतोऽमी संन्यासिनः) इति विस्मितं तं त्रिविक्रमं यानगः देवः भगवान् आह हे त्रिविक्रम यते त्वं यं निन्दसि सः अयमेत्र संन्सासी अस्ति ॥

**अर्थः**—नदीतीरावर त्रिविक्रम भारतीनें श्रीगुरुनृसिंह देव व त्यांच्याबरोबर असलेलें सर्व सैन्य आणि इतर परिवार संन्यासी स्वरूपांत पाहिलें. संन्याशाव्यतिरिक्त त्या जमातींत त्याला दुसरें कोणीहि दिसलें नाहीं. तेव्हां इतके हे संन्यासी एकदम येथें कोठून आले, म्हणून आश्चर्यचकित झालेल्या त्रिविक्रमभारतीस पालखींत बसलेले यतिश्रेष्ठ नृसिंहगुरु म्हणाले, " हे त्रिविक्रमा, तूं ज्याची निन्दा करतोस, तोच मी गाणगापुरांतील संन्यासी आहें." ॥ ८४ ॥

**अखर्वगर्वोऽप्यभवद्विगर्वः सर्वात्मकोऽसाविति शान्तिपर्व ॥ अपूर्वमाप्त्वा विनयेन नत्वा मत्वा नृसिंहं समदृक् च भूत्वा ८५**

**अन्वयः**—अखर्वगर्वः अपि त्रिविक्रमः विगर्वः भूत्वा असौ यतिः सर्वात्मक इति अपूर्वं शान्तिपर्व आप्त्वा तं नृसिंहं मत्वा विनयेन नत्वा समदृक् अभवत् ॥

**अर्थः**—त्रिविक्रम भारती हा जरी पुष्कळ गर्विष्ठ होता, तथापि हा पालखींत बसून आलेला संन्यासी केवळ सामान्य मनुष्य नसून साक्षात् सर्वांतर्यामीं अपूर्व पुरुष आहे, असें समजून गर्वरहित झाला, आणि नंतर शांतिस्वरूपाला मिळवून हा माझ्या मानसपूजेंतील नेहमींचाच नृसिंहदेव आहे असें समजून त्यानें श्रीगुरूस विनयानें नमस्कार केला,

व आत्मविलक्षण देहादिकाचा अभिमान सोडून देऊन तो सात्त्विक, समदर्शी, शांत असा झाला ।। ८५ ।।

**ततः स्वरूपमादर्श्य तत्त्वमादिश्य पश्यतः ।।**
**तस्य सोऽन्तरधादद्धा कृतार्थोऽभूत् त्रिविक्रमः ।। ८६ ।।**

**अन्वयः**—ततः ( गर्वापनयान्तरं ) प्रथमतः सः भगवान् स्वरूपं विराट्रूपम् ) पश्चात् यतिरूपं प्रदर्श्य तत्त्वं ( तत्त्वमस्यादि ) वाक्योत्थं तत्त्वज्ञानं आदिश्य पश्यतः त्रिविक्रमस्य तस्य सः अंतरधात् ततः त्रिविक्रमः अद्धा कृतार्थः अभूत् ।।

**अर्थः**—त्रिविक्रम यतीचा गर्वपरिहार झाल्यानंतर भगवान् श्रीगुरुदेवांनीं त्रिविक्रमास प्रथम विश्वरूप दाखवून नंतर लौकिक यतिरूप दाखविलें. त्यानंतर महावाक्योत्थ तत्त्वज्ञानाचा त्यांस उपदेश केला. नंतर तो त्रिविक्रम यति गुरुदेवांस आपल्या समोर पाहत असतांना तात्काल श्रीगुरुदेव गुप्त झाले. नंतर तेव्हांपासून तो त्रिविक्रम भारती खरोखर कृतार्थ व धन्य झाला. तसाच अपरोक्ष ज्ञानीहि झाला. ।। ८६ ।।

**श्रावयन्तौ श्रुतीर्म्लेंच्छे तर्जयन्तौ द्विजौ द्विजान् ।।**
**जयार्थमागतौ निन्ये श्रीगुरुं तौ त्रिविक्रमः ।। ८७ ।।**

**अन्वयः**—म्लेंच्छे श्रुतीः श्रावयन्तौ द्विजान् तर्जयन्तौ जयार्थं आगतौ तौ द्विजौ त्रिविक्रमः श्रीगुरुं निन्ये ।।

**अर्थः**—त्रिविक्रम भारतीची भेट घेऊन श्रीगुरुयति गाणगापुरीं आले. नंतर कांहीं काळानें सर्वत्र जयपत्र मिळवीत मिळवीत म्लेंच्छांना श्रुति व यज्ञकांडांचा अर्थ ऐकविणारे, अभिमानानें इतर सर्व द्विजांचा तिरस्कार करणारे, व सर्वत्र जय मिळविण्याचा हेतु धारण करणारे मदोन्मत्त दोन ब्राह्मण पंडित कुमशी ग्रामीं त्रिविक्रम भारतीकडे वाद करून जय मिळविण्याकरितां अले. त्रिविक्रम भारतीनें त्यांना शिक्षा करण्यांकरितां गाणगापुरीं श्रीगुरूंकडे नेलें. ।। ८७ ।।

**द्वन्द्वदावदव देव वेदविद्देवदेव वद वेदवाददौ ॥**
**वाददावदव वेदवादवि द्वन्द्वदोऽवददिदं वदोवदः ॥ ८८ ॥**

**अन्वयः**—हे देव, हे द्वन्द्वदावदव, हे वेदवित्, हे देवदेव, हे वाददावदव, हे वेदवादवित्, वेदवाददौ वद एवं वदोवदः (वक्ता) द्वन्द्वदः (द्वैतनिवारकः) अवदत् प्रार्थयामास इति भावः ॥

**अर्थः**—वादाकरितां आलेल्या मदोन्मत्त ब्राह्मणांस श्रीगुरु नृसिंह देवाजवळ नेऊन त्रिविक्रम यतीनें गुरूंची प्रार्थना केली: "हे गुरुदेवा, तुम्ही मला साक्षात् भगवान् परमेश्वराप्रमाणें आहांत. तसेंच हे गुरुदेवा, तुम्ही इतरांस अभेद्य असणाऱ्या द्वैतरूपी अरण्याचें दावाग्निरूप (नाश करणारें) आहांत. हे गुरुदेवा, तुम्ही कांडत्रयात्मक वेद यथार्थ जाणणारे आहांत. म्हणून हे गुरुदेवा, तुम्ही अन्वर्थक वेदवेत्ते आहांत. वेदवेत्त्या ब्राह्मणांना दररोज नमस्कार करावा असें श्रुतिवचन आहे. म्हणून मी आपणांस नमस्कार करीत आहें. आपल्या ठिकाणीं व्यर्थ वादविवाद करणाऱ्या वावदूकांना (वाचकांना) जिंकण्याचें पूर्ण सामर्थ्य आहे. हे गुरुदेवा, तुम्ही प्रकाशमान इन्द्रियांनाहि प्रकाश देणारे आहांत. म्हणून वादरूपी अरण्याचे आपण दावानल आहांत. (प्रतिपक्षाचे सर्व वाद एका क्षणांत नाहींसे करणारे) हे गुरुदेवा, तुम्ही वेदवादवेत्ते आहांत. म्हणून मी हे दोन उन्मत्त ब्राह्मण आपणांकडे वादविवादाकरितां घेऊन आलों आहें. आपल्यासारखे वादविवादनिष्णात गुरुजी असतांना आमच्या-सारख्यांची वादविवाद करण्याची शक्ति कशी असणार? अशा रीतीनें मोठा वक्ता असलेल्या व स्वतः गुरुजींच्या अनुग्रहानें प्रपंचाचा निरास केलेल्या त्रिविक्रम भारतीनें सर्व लोकांवर परोपकार करण्यासाठीं श्रीगुरूंस विनंती केली. ब्रह्मद्रोही ब्राह्मणांचेहि कल्याणाकरितांच वरील प्रार्थना त्रिविक्रमानें श्रीगुरूंस केली. त्यायोगें आत्मघाती ब्राह्मणांचा अपराध निरास होऊन गुरुकृपा होऊन उद्धार होईल. ॥ ८८ ॥

**बोधितावपि तौ नैव हितं स्वीचक्रतुर्मतम् ॥**
**पतितं तत आनीय तद्गर्वं सर्वं आहरत् ॥ ८९ ॥**

**अन्वयः**—श्रीगुरुणा बोधितौ तौ विप्रौ मतं हितं वचः नैव स्वीचक्रतुः । ततः सर्वः भगवान् पतितं (बुरुडं) आनीय तयोः गर्वं अहरत् ॥

**अर्थः**—त्रिविक्रम भारतीनें वादविवादाकरितां आणलेल्या उन्मत्त ब्राह्मणांना भगवान् श्रीगुरुदेवांनीं पुष्कळ उपदेश केला व म्हणाले, "मोठमोठया ऋषींना युगेंच्या युगें खर्ची घालून वेदाचें संपूर्ण स्वरूप समजलें नाहीं. अशा वेदांसंबंधीं तुमच्यासारख्या मूर्ख पंडितांनीं आमच्या सारख्या संन्याशाबरोबर वाद काय करावा? वेदवाद करणें ही गोष्ट कठीण आहे. गर्विष्ट होऊं नका व ही वादबुद्धि सोडून द्या. अशा प्रकारचें श्रीगुरुवचन बोधप्रद व कल्याणप्रद असूनहि व सर्वसंमत असें असूनहि त्या मदोन्मत्त ब्राह्मणांनी ऐकलें नाहीं. आम्ही वाद करणार, वादावांचून आम्हांला राजदरबारीं मान मिळणार नाहीं असें ते म्हणूं लागले. तेव्हां श्रीगुरूंनीं त्रिविक्रमाच्या विनंतीवरून रस्त्यानें जाणाऱ्या एका पतितास (बुरुडास) बोलावून आणलें, व त्याच्या करवीं पंडितांचा संपूर्ण गर्वपरिहार केला. ॥ ८९ ॥

**ततो नरौ पलाहारौ भूत्वा शान्तिपरौ वरात् ॥**
**उषित्वा द्वादश समाः समाप्तौ सद्गतिं तु तौ ॥ ९० ॥**

**अन्वयः**—ततः नरौ तौ विप्रौ पलाहारौ भूत्वा अपि भगवद्वरात् शान्तिपरौ भूत्वा द्वादशसमाः उषित्वा तु सद्गतिं समाप्तौ ॥

**अर्थः**—त्यानंतर ते दोन मत्त पंडित स्वकर्मानेंच ब्रह्मराक्षस झाले. परंतु भगवान् श्रीगुरु नृसिंह यतिमहाराजांच्या कृपेनें ते शांत होऊन बारा वर्षें ब्रह्मराक्षसाचा जन्म भोगून नंतर श्रीगुरुकृपेनेंच शेवटीं सद्गतीस पोंचले. हा अद्भुत प्रकार पाहून त्रिविक्रम भारतीस फार आनंद झाला, व तो श्रीगुरूंना अनन्यभावानें शरण गेला. ॥ ९० ॥

**पतितः पण्डितो भूत्वा ज्ञात्वा सप्त गतोद्भवान् ॥**
**प्राह मे दुर्गतेर्हेतुं ब्रवीतु ब्रह्मणो भवान् ॥ ९१ ॥**

**अन्वयः**—पतितः भस्मप्रभावात् पण्डितो भूत्वा सप्त गतोद्भवान् ज्ञात्वा भगवंतं प्राह भवान् पूर्वं सप्तमे जन्मनि ब्रह्मणः मे दुर्गतेः हेतुं ब्रवीतु ॥

**अर्थः**—भगवान् श्रीगुरुयतींनीं उन्मत्त पंडितांचा गर्वपरिहार करण्याकरितां जो एक पतित बोलविला होता, त्याचेकडून सात रेवा उल्लंघन करविल्यानंतर त्यांस मागील सात जन्मांचें स्मरण झालें, आणि आपल्या मागील सातव्या जन्मांत तो ब्राह्मण असून महापंडित होता, असें त्यास गुरुमहाराजांच्या कृपेनें कळलें. नंतर तो वाद करण्यास तयार झाला. त्यामुळें त्रिविक्रम यतीबरोबर वादार्थ आलेल्या मदान्ध पंडितांचा गर्वपरिहार झाला. नंतर श्रीगुरूंना सप्त जन्मांतील ज्ञान झालेल्या व सध्यां बुरुड जन्मांत असलेल्या त्या पतितानें मोठ्या नम्रतेनें नमस्कार करून प्रश्न केला, " महाराज, मी सातव्या जन्मांत ब्राह्मण असतांना क्रमाक्रमानें भ्रष्ट होऊन पतित कां झालों ? याचें कारण, कृपा करून सांगावें अशी विनंती आहे. कारण सध्यां भस्मप्रभावानें मी पंडित व ब्राह्मण बनलों आहे. " ॥ ९१ ॥

**मातापित्राप्तदारात्मजनिजसुवृषत्याजको निन्दकोऽर्च्य-**
**ब्रम्हश्रेयःसतां यः श्रुतिरसतनुजागोक्रयी क्रूरयायी ॥**
**इत्याद्याः प्रेत्य घोरं निरयमरमथो यान्ति चण्डालयोनिं ।**
**योनीरन्याश्च पापो ह्यनुभवतितरां तारतम्यादघस्य ॥ ९२ ॥**

**अन्वयः**—तद्दुर्गतिहेतुं वदन् भगवान् तावत् कर्मविपाकं आह-यः मातापितरौ आप्ताः गुर्वादयः हितशंसिनः दाराः आत्मजः निजसुवृष-त्याजकः अर्च्यः ब्रह्मश्रेयःसतां यः निन्दकः च यः श्रुतिरसतनुजा-

गोत्रयी, क्रूरयायी इत्याद्याः प्रेत्य अरम् निरयम् यान्ति, अथ चण्डालयोनिं यान्ति, अघस्य तारतम्यात् अन्याः स्थावरतिर्यगाद्याः योनीः असौ पापः अनुभवतितरां हि इति प्रसिद्धं ॥

**अर्थः**—भगवान् यतिश्रेष्ठ नृसिंहगुरूंनीं पतिताचा प्रश्न ऐकून त्याच्या अधोगतीचें कारण सांगितलें, व त्या निमित्तानें थोडक्यांत कर्मविपाका-चेंहि स्पष्टीकरण केलें. तें असें जो आईबापांचा, आप्तेष्टांचा, हितोपदेश करणाऱ्या गुरुजनांचा, विनाकारण स्त्रियांचा, अपत्यांचा, आश्रम व वर्ण-धर्माचा त्याग करितो, तसेंच पूजनीय देवतेचा, स्ववेदशाखेचा, सत्कर्माचा जो निन्दक असतो, त्याचप्रमाणें जो वेद, दूध, गुळ, तेल, मीठ वगैरेंची विक्री करणारा, मुलगी, गाय यांची विक्री करणारा, दुष्टाची संगति करणारा इत्यादि असतील ते पातकी मेल्यानंतर घोर अशा नरकाला जातात, व तेथें त्यांना मोठ्या जलदीनें नेऊन यम-किंकरांकडून पापाचें फल दिलें जातें, असें गरुडपुराणांत म्हटलें आहे. नंतर ते पातकी चांडालयोनींत जन्मतात. पूर्वक्त पातकाचें प्रायश्चित्त संपूर्णपणें भोगून झाल्यानंतर शास्त्रोक्त प्रायश्चित्ताच्या अनुरोधानें अन्य स्थावर वृक्ष, पशु, कीटक इत्यादि क्षुद्र योनींचा निश्चितपणें ते अनुभव घेतात. पापाचें प्रायश्चित्त न घेतां व पश्चात्ताप न पावतां पुनः पुनः जे पातकें करतात, तेच निरंतर भयंकर अशा नरकांत राहतात, असें गरुड-पुराणांत म्हटलें आहे. प्रायश्चित्तानें व पश्चात्तापानें जे शुद्ध होतात, ते स्वकर्माचें बरें वाईट फल भोगून पुनः पूर्वस्वरूपाला पोहोंचतात. ॥९२॥

**भूतप्रेतपिशाचकाः स्युरितरे दुर्वासनावासिता**
**मत्ता विप्रगुरुद्विषोऽपि कुधियो रक्षस्त्वमायान्ति च ॥**
**उष्ट्रो द्रव्यहरोऽप्यलिर्विषहरः पत्रादिहृद्वानरो**
**गृध्रो मांसहरो नरो मधुकरो मध्वाहरोऽपीतरः ॥ ९३ ॥**

**अन्वयः**—दुर्वासनावासिताः इतरे नीचाः भूतप्रेतपिशाचाः स्युः कुधियो दुर्बुध्दयः मत्ताः विप्रगुरुद्विषश्च रक्षस्त्वं आयान्ति, द्रव्यहरः उष्ट्रो भवति विषहरः अलिः फलपत्रादिहृत् वानरो भवति, मांसहरो गृध्रो भवति, मध्वाहरो अपि इतरः नरः मधुकृत् मक्षिका भवति ॥

**अर्थः**—भगवान् श्रीगुरु नृसिंह देवांनीं त्रिविक्रमादि आपल्या सच्छिष्यांपुढें क्रमप्राप्त सुबोध रीतीनें कर्मविपाकाचें पुढीलप्रमाणें विवेचन केलें. ते म्हणाले: मरणकाळीं दुर्वासनाप्रेरित होऊन जे नीच लोक अन्त पावतात, ते भूतप्रेत पिशाच होतात. दुर्बुद्धि धारण करणारे मत्त असे जे गुरूंचा द्वेष करितात, ते मृत्यूनंतर ब्रम्हराक्षस होतात. तसेंच जे द्रव्य चोरतात, ते उंट होतात. विष देणारे व घात करणारे विंचू होतात. पानें फुलें व फळें चोरणारे लोक वानर होतात. मांस चोरणारे गिधाड होतात. मध, दहीं, दूध रस पदार्थ चोरणारे मक्षिका होतात. इतरहि लोक स्वकर्मा-प्रमाणें कर्मविपाकोक्त हीन योनींत जन्म घेतात. ॥ ९३ ॥

**भोगी न योऽर्थस्य च किंपचोऽत्र भोगी स भूत्वापि भवे परत्र । न भोगभोगी भवितास्य किंतु नभोगभोगी शयिता ततस्तु ॥ ९४ ॥**

**अन्वयः**—किंपचः यः अत्र अर्जितस्य अर्थस्य भोगी न भवेत् सः परत्र भवे जन्मनि भोगी सर्पः भूत्वापि अस्य स्वकीयार्थस्य भोगभोगी न भविता किं तु नभोगभोगी भूत्वा ततः तु तस्मिन्नर्थे भूम्यादौ निहिते शयिता भवेत् इति ॥

**अर्थः**—जो चिक्कु मनुष्य कवडी कवडी पैसा मिळवून मिळ-विलेल्या पैशाचा स्वभोगार्थ वा दानादिकांकरितां अथवा स्वकीयांकरितां उपयोग करीत नाहीं, केवळ संग्रहच करतो, तो पुढील जन्मामध्यें साप होऊन स्वतःचा पैसा केवळ रक्षण करतो, नंतर वायु भक्षण करून

राहतो, आणि जेथें तें द्रव्य असेल तेथें सर्परूपानें कायम राहतो, म्हणजे कदर्य हा केवळ उभय जन्मांत धनरक्षकच असतो. ॥ ९४ ॥

**अधस्तान्नृजातेः स्मृता यातनास्ताः**
**गवाद्यास्तृणान्ता अघान्ताय तास्ताः ।**
**स्वपापानुसारी कुचारी परीत्य**
**क्रमाद्याति भूयो नृयोनिं सचिन्हः ॥ ९५ ॥**

**अन्वयः**—नृजातेः अधस्तात् गवाद्याः तृणान्ताः योनयः अघान्ताय पापनाशाय स्मृताः स्वपापानुसारी कुचारी पापी तास्ताः परीत्य क्रमात् भूयः सचिह्नः पुरुषः नृयोनिं मनुष्यजन्म याति ॥

**अर्थः**—श्रीगुरु नृसिंहदेव त्रिविक्रम मुनींस म्हणाले: "नरजातीपेक्षां हलक्या दर्जाच्या पशुपक्ष्यादि तृणकाष्ठपाषाणपर्यंत निरनिराळ्या योनि शास्त्रांत सांगितलेल्या आहेत. पापानुचारी मानव स्वपातकांप्रमाणें त्या सर्व योनींमध्यें क्रमाक्रमानें फिरून नंतर तो पुनः क्रमप्राप्त मनुष्यजन्मांस येतो, परंतु त्यावेळीं मात्र पूर्वकृत पापांचीं लक्षणें ( शास्त्रानें सांगितलेलीं) त्याच्या अंगावर असतात. जलचर नऊ लक्ष दहा लक्ष मानव असें योनिसंख्येचें वर्णन गरुड पुराणांत आहे. नरजन्माव्यतिरिक्त जेवढ्या यातना आहेत, त्या सर्व यातना भोगून पुनः नरतनु मिळतें असें स्मृतींत म्हटलें आहे. ॥ ९५ ॥

**श्वा शुनी च नरो नारी पारदार्यात्खरः खरी ।**
**औपपत्यान्नृनारीणां कृमियोनिः पुनः पुनः ॥ ९६ ॥**

**अन्वयः**—पारदार्यात् नरः श्वा खरः च भवति, अत्यभ्यासे तु नृनारीणां पारदार्यात् औपपत्याच्च पुनः पुनः कृमियोनिः यावत्पापक्षयं भविष्यति ॥

**अर्थः**—परदारासंगतीनें मनुष्य कुत्रा व गर्दभ जन्म पावतो. तसेंच परपुरुषसंगमानें स्त्री कुत्री व गर्दभस्त्री जन्मास जाते. परस्त्री व परपुरुष

संगम वारंवार केल्यानें स्त्रीपुरुषांना स्वपातकक्षय होईपर्यंत कृमिकीटक योनींत जन्मावें लागतें, म्हणून परस्त्रीपुरुषसंगमापासून दूर राहावें असें श्रीगुरुमहाराजांनीं त्रिविक्रमांस सांगितलें. ॥ ९६ ॥

**भारत्याऽथ कथं त्वघान्त इति संपृष्टोऽब्रवीच्छ्रीगुरुः**
**पश्चात्तापमघान्तकं स्वबलतः कृच्छ्रादिकं शोधकम् ॥**
**उक्त्वाऽघं च सदस्यृतं तदुदितं क्षौरादियुक्तं चरेत्**
**प्रायश्चित्तमदाम्भिकः शुचिरघाद्वा मंत्रतीर्थव्रतैः ॥ ९७ ॥**

**अन्वयः**—अथ त्रिविक्रमभारत्या कथं अघान्तः इति पृष्टः श्रीगुरुः पश्चात्तापं अघान्तकं अब्रवीत् ( इदं साधारणपापे, विशेषपापे तु शुद्धिं आह ) स्वबलतः स्वशक्तितारतम्यात् कृच्छ्रादिकं पापस्य शोधकं भवति । ( तस्य इतिकर्तव्यतां आह ) अदांभिकः निष्कपटः सदसि धार्मिकविद्वत्सभायां ऋतं सत्यं यथा विहितं अघं पापं उक्त्वा तदुदितं ( तया परिषदा अनुवादकद्वारा उदितं ) क्षौरस्नानादियुक्तं प्रायश्चित्तं चरेत् इति भावः ॥

**अर्थः**—नंतर श्रीत्रिविक्रम भारतींनीं श्रीगुरु नृसिंह यतींना विचारलें: महाराज, चुकून एखादे वेळीं मनुष्याकडून जर पातक घडलें तर त्या पातकांचा नाश कसा होईल ? भारतीचा प्रश्न ऐकून श्रीगुरु म्हणाले, पश्चात्ताप हाच पापाचा नाश करणारा मुख्य उपाय आहे. पश्चात्तापानें पातकी मनुष्य शुद्ध होतो असें स्मृतिवचन आहे, ही गोष्ट साधारण पातकांची आहे, विशेष जबरदस्त जर पातक असेल तर धर्मशास्त्रकारांनीं पातकशुद्धीचा मार्ग सांगितला आहे तो असा: प्रथमतः पश्चात्ताप झाला पाहिजे, नंतर निष्कपटपणानें, धार्मिक विद्वानांच्या सभेंत, खरेंपणानें आपल्या हातून पातक जसें घडलें असेल, तशा प्रकारें पातक्यानें स्वपातकांचा उच्चार करावा. नंतर सभेंतील धार्मिक सदस्यांच्या अनुज्ञेनें अनुवादकद्वारां ते जें प्रायश्चित्त सांगतील तें स्नानक्षौरपूर्वक प्रायश्चित्त

करावें, अशा प्रकारें पातकशुद्धीचें विशेष मार्गदर्शन आहे असें श्री गुरूंनीं सांगितलें. ॥ ९७ ॥

**नीचं तूच्च उवाच पित्रपकृतेस्त्वं चावचोऽभूरतो**
**मासं संगमसेवनाद्द्विजनितागाम्युद्भवे सोऽवदत् ।**
**विप्रं योजय मां द्विजेषु करटो हंसोऽपि सन्मानसे**
**भूयः किं करटोऽप्ययोऽपि कनकं भूत्वा पुनः किं त्वयः९८**

**अन्वयः**—एवं त्रिविक्रमं आभाष्य उच्चः ( भगवान् ) नीचं तं (पतितं) तु उवाच । हे पतित त्वं पितपकृतेः मातापितृतिरस्कारात् अवचः (पतितः) अभूः । अतः मासं स्नानादिना संगमसेवनात् आगाम्युद्भवे द्विजनिता (द्विजत्वं तव भविष्यति ) इति । तच्छ्रुत्वा सः पतितः अवदत् । विप्रं वेदाध्यायिनं ब्राम्हणं मां द्विजेषु योजय । करटः काकः सरसि हंसः सन् करटः काकः भविष्यति किं । तथा पूर्वं अयो ( लोहमपि ) स्पर्शयोगात् कनकं भूत्वाऽपि पुनः तु अयो भवति किं अपि तु न इति भावः ॥

**अर्थः**—भगवान् श्रीगुरुनृसिंह देव याप्रमाणें त्रिविक्रम भारतीस बोलून त्या पतितांस म्हणाले: हे पतिता, तूं मागील जन्मांत आईवडिलांचा तिरस्कार केला आहेस, त्यामुळें तूं हीन जातींत जन्म पावला आहेस, आतां यानंतर तूं एक महिनाभर भीमामरजासंगमांत स्नान कर, म्हणजे त्या स्नानपुण्यानें तूं पुढील जन्मीं ब्राह्मण होशील. हें गुरुवचन ऐकून तो पतित म्हणाला, महाराज मला आतां आपण विप्रसमाजांत समाविष्ट करा. कारण कावळा मानस सरोवरांवर जाऊन हंस झाल्यावर तो पुनः कावळा होतो काय ? त्याचप्रमाणें स्पर्शमण्याचा लोखंडास स्पर्श होऊन लोखंडाचें सुवर्णरूप झाल्यावर पुनः त्या सुवर्णाचें लोखंड होईल काय ? महाराज, तसें कदापि होणार नाहीं. त्याचप्रमाणें तुमच्या कृपावलोकनानें मी

एकदां ब्राह्मण झाल्यावर पुनः बुरुड होईन कसा ? श्रीगुरुकृपा झाल्यानंतर तो पतित ( नीच ) कसा राहणार ? ॥ ९८ ॥

**इत्थं तस्मिन्वदति युवतिस्तस्य चाप्ताऽथ तां स**
**त्यक्तुं हैच्छत् गुरुरथ जगौ स्त्रीर्न पूर्वं विवाह्या ॥**
**पश्चात्त्यागे पतसि सदिति प्रोह्य तं स्नापयित्वा**
**गेहायाऽऽज्ञापयति स यतिः सोप्यगाज्ज्ञानहीनः ॥ ९९ ॥**

**अन्वयः**—इत्थं तस्मिन् वदति सति तस्य युवतिः च पुत्रादयः प्राप्ताः सः तां त्यक्तुं ऐच्छत् अथ गुरुः तं जगौ, स्त्रीः पूर्वं न विवाह्या, पश्चात् त्यागे पतसि एतद् सत् प्रोह्य सः यतिः तं स्नापयित्वा गेहाय आज्ञापयत् सः अपि ज्ञानहीनः गृहं अगात् ॥

**अर्थः**—अशा प्रकारें तो पतित श्रीगुरु नृसिंह महाराजांना म्हणूं लागला कीं महाराज, आतां मी पुनः पतित व संस्कारहीन कसा होणार? असें बोलत आहे, तोच त्याचें स्त्रीपुत्रादिक तेथें आले व त्या पतिताला घरांकडे बोलवूं लागले. तेव्हां तो त्यांना म्हणाला, मी आतां ज्ञानी व पंडित झालों आहें. मी घरीं येणार नाहीं. तुमचा व माझा आतां कोणत्यांहि प्रकारें नात्याचा अगर जातीचा संबंध राहिला नाहीं. तुम्ही परत जा. मी तुम्हांस आतां यापुढें स्वीकारणार नसून सोडणार आहें. हें त्याचें म्हणणें ऐकून नंतर श्रीगुरु यतिमहाराज पतितांस म्हणाले, हे पतिता अगोदर विवाह करूं नये, करण्यापूर्वींच विचार करावा. एकदां विवाहबद्ध झाल्यानंतर विधिपरिणीत वधूचा त्याग करणें योग्य नाही, आणि तें शास्त्रसंमतहि नाहीं, तसें करण्यानें मनुष्य पतित होऊन नरकगतीस जातो. ही गोष्ट सत्य व शास्त्रवचनांस धरून आहे. असें सांगून पूर्वजन्माचें ज्ञान देणारें त्याच्या अंगास लागलेलें भस्म धुण्याकरतां त्यांस स्नान घालविलें, त्यामुळें त्याचें ज्ञान लुप्त झालें. नंतर त्यांस महाराजांनीं घरीं जाण्याची आज्ञा केली. तदनुसार तोहि पण ज्ञानविरहित झाला

आणि स्त्रीपुत्रादिकांना आलिंगन देऊन कांहीं न बोलतां परिवारसमवेत घरीं निघून गेला. ॥ ९९ ॥

**पावितोऽपि पतितः कुतो गतो हीनतामिति यतीरितो यतिः। प्राह भस्मवशतो मयार्पिता वेत्तृताऽऽप्लुवत उद्गता ततः**

**अन्वयः**—पावितः अपि पतितः कुतो हीनतां गतः इति त्रिविक्रम-यतिना यतिः प्रेरितः पश्चात् भगवान् प्राह भस्मवशतः मया वेत्तृता अर्पिता सा आप्लवतः ततः उद्गता नष्टा इत्यर्थः ॥

**अर्थः**—श्रीत्रिविक्रम भारतीमुनींनें श्रीयतिवर गुरुमहाराजांना प्रश्न केला कीं, महाराज, तो पतित आपण एकदां पवित्र करून विद्वान् केलात, नंतर पुनः तो पतित ज्ञानहीन कसा झाला ? यावर श्रीगुरु भगवान् म्हणाले, मी त्याच्या अंगास विभूति लावण्यास सांगितली. नंतर त्यामुळें त्यांस विद्वत्ता दिली, म्हणून तो ज्ञानी झाला व स्वस्त्री-पुत्रादिकांचा त्याग करण्यास तयार झाला. या सर्व गोष्टीचें मूळ कारण अंगीं असलेली विभूति आहे हें लक्षांत घेऊन त्यांस स्नान घालविलें. त्यामुळें त्याच्या अंगास लागलेली विभूति धुऊन गेली. त्या कारणानें तो पतित पुनः ज्ञानहीन झाला, आणि स्त्रीपुत्रांवर पूर्वीप्रमाणें आसक्त झाला, हें विभूतीचें माहात्म्य आहे. ॥ १०० ॥

**दुराचारो जारो यतिवर पुरा कश्चन धरा-**
**पती रक्षो भूत्वा क्षुधित उपगं क्रौंचवनगः।**
**मुनिं प्रापात्तुं तद्धृतभसितसंस्पर्शवशतः**
**स्मृतप्राक्पंचाक्षिप्रमितगतजातोऽस्तकुकृतः ॥१०१॥**

**अन्वयः**—पुरा दुराचारः जारः कश्चन धरापतिः दुर्जयाख्यः क्रौंच-वनगः रक्षः भूत्वा क्षुधितः सन् उपगं मुनिं वामदेवं अत्तुं प्राप, तदा तद्धृत-भसितसंस्पर्शवशातः अस्तकुकृतः सः स्मृतप्राक्पंचाक्षिप्रमितगतजातः (अभूदिति तात्पर्यम्)

**अर्थः**—श्री त्रिविक्रम भारतीनें केलेल्या प्रश्नांचा आशय ध्यानीं घेऊन भगवान् श्रीगुरुनृसिंह यति म्हणाले, हे त्रिविक्रमा, पूर्वी कोणीएक अत्यंत दुराचारी व जारकर्मरत असा एक दुर्जय नामक राजा होता. तो आपल्या स्वतःच्या कर्मानुरोधानें क्रौंच वनांत ब्रम्हराक्षस झाला. पुढें तो अत्यंत भुकेलेला असाच नेहमीं असे. एकदां त्या वनांत यदृच्छेनें फिरत फिरत जवळ आलेल्या वामदेवनामक महामुनींस त्यानें पाहिलें. नंतर त्यानें मुनींस भक्षण करावें म्हणून त्यांच्या अंगास वट्ट मिठी मारिली. मुनींचें सर्व शरिर भस्मचार्चित असल्याकारणानें राक्षसांच्या अंगास तें भस्म लागलें, त्यामुळें राक्षसांला मागील पंचवीस जन्मांचें पूर्ण ज्ञान झालें, त्यामुळें आपण राक्षस कसें बनलों, त्यांस मूळ कारणें कोणतीं घडलीं, हें राक्षसांस चांगलेंच समजून आलें, व तो राक्षस मुनींस खाण्याचा विचार सोडून देऊन त्यांचे चरणीं लीन झाला व आपला उद्धार करावा अशी त्यानें विनंती केली. ॥ १०१ ॥

**तस्मै द्राविडविप्रमुक्तिमवदच्छ्वांगस्थभस्माहितां**
**संवादं गतिदं कुमारहरयोर्भस्मार्पणं चोद्गतिम् ॥**
**एवं कर्मविपाकमाकलयतोऽप्याराध्य चाध्याधिहे**
**तत्पादांबुरुहे ययौ यतिरिति ख्याता विभूतेः कथा १०२**

**अन्वयः**—तस्मै श्वांगस्थभस्माहितां द्राविडविप्रमुक्तिं अवदत् ( वामदेवः इति शेषः ) च गतिदं कुमारहरयोः संवादं आह, तस्मै वामदेवेन भस्मार्पणं कृतं तच्च आह तस्य उद्गमनं च आह. एवं कर्मविपाकं आकलयतः आध्याधिहे तत्पादांबुरुहे आराध्य असौ त्रिविक्रमः ययौ इति विभूतेः कथा ख्याता जाता ॥

**अर्थः**—भगवान् श्रीगुरु यति म्हणाले, श्रीवामदेव महामुनींनीं त्या राक्षासांला भस्माची कथा सांगितली. एक कुत्रें स्मशानांत भस्मावर बसलें. त्याच्या पोटास साहजिकच भस्म लागलें. नंतर तें एका द्रविड-

देशांतील ब्राह्मणाच्या शवावर मांस भक्षणासाठीं बसलें. कुत्र्याच्या पोटाचें भस्म विप्राच्या कपाळीं लागलें, त्यामुळें तो विप्र मुक्त झाला. नंतर पुनः त्यांनीं भस्म कसें असावें, तें कोणकोणच्या स्थळीं मिळतें, स्वतंत्र भस्म कसें तयार करावें, तें लावण्याचा विधि कसा आहे, शरीरावर कोणत्या स्थलीं लावावें, यासंबंधीं सनत्कुमार आणि शंकर यांचा झालेला पुरातन संवाद वर्णन केला. त्यानंतर श्रीवामदेवांनीं आपल्या अंगचें भस्म तुझ्या अंगास लागलें, त्यामुळें खाण्याची बुद्धि नाहींशीं होऊन तुला मागील जन्मांतरांचें ज्ञान झालें, असें सांगून त्यांस भस्म दिलें. त्यामुळें राक्षसाचा उद्धार होऊन तो स्वर्गास गेला. हें श्रीगुरुयतींनीं त्रिविक्रमा-पुढें वर्णन केलें. अशा प्रकारें कर्मविपाक खंडाचें वर्णन करणाऱ्या भगवान् श्रीगुरु नृसिंह यतींदेवांच्या चरणकमलांस नमस्कार करून व मनांत पुनः पुनः ध्यान करून तो त्रिविक्रम महामुनि आनंदानें स्वग्रामीं परत गेला. नंतर अशा रीतीनें भस्ममाहात्म्य कथा प्रसिद्धीस पावली. याप्रमाणें श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमद्वासुदेवानंद सरस्वतींनीं रचलेलें श्रीगुरु चरित्र काव्याचें द्वितीय शतक संपूर्ण झालें. भक्तकामकल्पद्रुम अत्रि-सुतांस नमस्कार असो. ॥ १०२ ॥

॥ द्वितीय शतक समाप्त ॥

---

॥श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः॥

# श्रीगुरुचरित्रकाव्य मराठीभाषांतर तृतीयशतक अन्वयार्थसहित

---

भाषांतरकार—वे. शा. सं. ईश्वरशास्त्री दीक्षित.

प्राध्यापक—व्याकरणशाला, सांगली.

## ॥ अथ गुरुचरित्रकाव्यतृतीयशतकप्रारंभः ॥

**अथ कोऽपि मृतार्भको वरे द्विज आस द्विज माहुरे पुरे॥**
**स गुरोः कृपयाऽऽप सत्सुतं स च दत्तं वदति स्म तं मतम् ॥ १ ॥**

**अन्वयः**—अथ सिद्धः उवाच हे द्विज वरे माहुरे पुरे मृतार्भकः कः अपि द्विजः आस सः गुरोः कृपया सत्सुतं आप सः च तं मतं दत्तं वदति स्म ॥

**अर्थः**—सिद्ध बोलले–हे नामधारका ब्राह्मणा, श्रेष्ठ अशा माहुरपुरांत मृतवत्स असा कोणीएक गोपीनाथ नांवाचा ब्राह्मण असे. तो सेवावगैरेनीं श्रीगुरु दत्तात्रेयांचे कृपेनें एक सत्पुत्र मिळविता झाला. तो गोपीनाथ ब्राह्मण त्या मुलाला 'दत्त दत्त' म्हणत असे. म्हणजे 'दत्त' नांवानें हांक मारीत असे. ॥ १ ॥

**स तु धीगुणशीलशालिनीं स्वसमानां स्त्रियमेव लब्धवान् ॥**
**सुमती भुवि दंपती तथा शुशुभाते रतितत्पती यथा ॥ २ ॥**

**अन्वयः**—सः तु धीगुणशीलशालिनीं स्वसमानां एव स्त्रियं लब्धवान् यथा रतितत्पती शुशुभाते तथा सुमती दंपती शुशुभाते ॥

**अर्थः**—तो मुलगा दत्त बुद्धि, गुण व शील यानें शोभणाऱ्या व आपल्यासारखीच असलेल्या स्त्रीला मिळविता झाला, आणि रतिकामाप्रमाणें सद्बुद्धीचे ते दोघे दंपती शोभते झाले. ॥ २ ॥

**अथ दैववशात्क्षयार्दितः समभूत्कान्तिविवर्जितः सुतः ॥**
**शयनाशनवर्जितः कृशो ललना चाप्यभवत्तथा कृशा ॥३॥**

**अन्वयः**—अथ दैववशात् क्षयार्दितः कांतिविवर्जितः सुतः समभूत् ततः शयनाशनवर्जितः कृशः अभूत् तथा ललना च अपि कृशा अभूत्॥

**अर्थः**—विवाह झालेनंतर प्रारब्धानें मुलगा दत्त क्षयरोगानें पीडित होऊन निस्तेजस्क झाला. त्यानंतर क्रमाक्रमानें आहार निद्रा वगैरे टाकलेला अतएव अतिशय कृश झाला. त्याची पत्नीहि अतिशय कृश झाली ॥ ३ ॥

**हवनार्चनशान्तिभेषजैर्जपनाद्यैर्न शशाम स द्विजैः ॥**
**उदितोऽयमसाध्य इत्यहो स रहोऽम्बामवदच्छृणु ह्यहो ॥ ४ ॥**

**अन्वयः**—सः जपनाद्यैः हवनार्चनशान्तिभेषजैः न शशाम द्विजैः अयं असाध्यः उदितः सः रहः अम्बां अवदत् अहो हि शृणु ॥

**अर्थः**—तो रोग जप, होम, पूजा, शांति, औषध इत्यादिकानें शांत झाला नाहीं. वैद्य, ज्योतिषी वगैरे ब्राह्मणांच्याकडून हा रोग असाध्य आहे असे जेव्हां सांगितलें गेलें तेव्हां तो ब्राह्मण एकान्तांत आपल्या आईला म्हणाला- आई, निश्चित ऐक. ॥ ४ ॥

**अयि मातरतः परं तु ते मयि माऽऽशाऽस्तु रुजार्दिते सुते ॥**
**दयिते मयि तेऽस्तु मा रतिर्दयिते श्रीदयितेऽस्तु ते रतिः ॥५॥**

**अन्वयः**—अयि मातः अतः परं तु रुजार्दिते ते सुते मयि आशा मा अस्तु । हे दयिते ते दयिते मयि अतः परं रतिः मा अस्तु श्रीदयिते ते रतिः अस्तु ॥

**अर्थः**—अग आई, यानंतर रोगानें पीडित अशा तुझ्या या मुलाविषयीं अर्थात् मजविषयीं तुझी आशा फुकट आहे. आसन्नमरण असल्यामुळें आशा करूं नकोस. हे प्रिये भार्ये, तुझ्या प्रिय वल्लभाविषयीं अर्थात् मजविषयीं यापुढें प्रीति करूं नकोस. मग माझ्याकडून प्रेम कुठें केलें जावें असें म्हणशील तर, श्रीलक्ष्मीवल्लभ भवतारक श्रीमहाविष्णूवर तुझी प्रीति होवो. ॥ ५ ॥

**धृतभीतिरुवाच तं सती गतिरन्या भवतो न मे सती ॥**
**कति वच्म्यतिसूक्तिभिस्त्वलं मतिमान्मेऽस्ति भवान्सुमङ्गलम् ।६।**

**अन्वयः**—धृतभीतिः सती तं उवाच। भवतः अन्या मे सती गतिः न एतत् अतिसूक्तिभिः कति वच्मि अलं मतिमान् भवान् मे सुमंगलं अस्ति ॥

**अर्थः**—घाबरलेली अशी ती भार्या त्याला म्हणाली:—"आपल्याशिवाय मला दुसरी चांगली गति नाहीं हें मी किती चांगल्या शब्दानें सांगूं? असो—बुद्धिमान् असे आपण मला कल्याणकारक आहां. माझें सौभाग्य आहां." ॥ ६ ॥

**इति सा समुदीर्य निर्ययौ पतियुक्ता श्वशुरानुमोदिता ॥**
**गुरुदर्शनकाङ्क्षया नता वरगन्धर्वपुरं ह्युपागता ॥ ७ ॥**

**अन्वयः**—इति सा समुदीर्य पतियुक्ता श्वशुरानुमोदिता गुरुदर्शनकांक्षया निर्ययौ शनैः वरं गन्धर्वपुरं हि उपागता ॥

**अर्थः**—याप्रमाणें ती बोलून पतीच्या आरोग्यार्थ पतीसह पतीला पाळण्यांत घालून "तूं जा." याप्रमाणें सासू सासऱ्यांची आज्ञा घेऊन गुरुदर्शनाकांक्षेनें निघाली. हळूहळू मुक्काम करीत कांहीं दिवसांनीं श्रेष्ठ अशा (गाणगापुराच्या) गंधर्वपुराच्या जवळ प्राप्त झाली. ॥ ७ ॥

**सहसा मृतिमाप तत्पतिर्युवतिस्तं च शुशोच साऽधृतिः ॥**
**अतिदीनमतिं तु तां सतीं गुरुमूर्तिर्यतिराप सद्गतिः ॥ ८ ॥**

**अन्वयः**—तदा तत्पतिः सहसा मृतिं आप अधृतिः सा तं शुशोच तु तदा अतिदीनमतिं तां सतीं सद्गतिः यतिः गुरुमूर्तिः आप ॥

**अर्थः**—तेव्हां तिचा पति एकाएकी मरण पावला. धैर्यशून्य झालेली ती युवती—अर्थात् त्याची पत्नी—मृतपतीला उद्देशून शोक करती झाली. तेव्हां अत्यंत दीनबुद्धीच्या त्या सतीला चांगला मार्ग दाखविणारा यतिवर भगवान् गुरुमूर्ति अवधूत वेषानें तिच्याजवळ प्राप्त झाला. ॥ ८ ॥

**धृतभूतिरुवाच मा शुचः सति कस्ते पतिरन्ति मे वचः ॥**
**वद चित्प्रतिबिम्बितोऽथवा सदचिद्वर्ष्म समीपवर्ति वा ॥९॥**

**अन्वयः**—धृतभूतिः (तां) उवाच (हे) सति मा शुचः चित्प्रतिबिंबितः ते पतिः अथवा अचित् समीपवर्ति वर्ष्म (ते पतिः,) कस्ते (पतिः) (इति) ते अन्ति वचः वद ॥

**अर्थः**—भस्म धारण केलेला असा तो भगवान् तिला म्हणालाः– "हे सती, शोक करूं नकोस. चित्प्रतिबिंबित जीव तुझा पति आहे अथवा जडदेह समीप असलेला हा तुझा पति आहे ?" या माझ्या प्रश्नाचें उत्तर मजला दे. ॥ ९ ॥

**उभयं न वयं यशस्विनि प्रवदामः परमं मनस्विनि ।**
**न गमागमनेऽस्य सोऽजरो निगमाद्योप्यवरोऽपरोऽमरः ॥१०॥**

**अन्वयः**—(हे) यशस्विनि मनस्विनि वयं उभयं न प्रवदामः अस्य गमागमने न स्तः सः अजरः निगमाद्यः अवरः अपरः अमरः अस्ति ॥

**अर्थः**—या दोन्हींतील सिद्धान्त मला समजत नाहीं. हे गुरो, तुलाच मी शरण आहें, असें जर म्हणशील तर हे स्त्रिये ऐक. हे यशस्विनी, आणि प्रशस्त मन असलेल्या स्त्रिये, आम्ही या दोघांनाहि म्हणजे देह आणि जीव यांना परम सत्य तात्त्विक पदार्थ म्हणून सांगत नाहीं तर देह जो आहे तो जड, विकारी, अदृष्ट, नष्टस्वभावाचा असल्यानें सत्य न होवो. परंतु जीव हा परमार्थ तात्त्विक पदार्थ कसा नाहीं ? तर ऐक. या स्वयंप्रकाशमान अपरोक्ष अशा आत्म्याला येणें जाणें, दुसऱ्या देहांत जाणें, मरणें, गर्भांत येणें, उत्पन्न होणें, इत्यादि नाहींत. तो आत्मा अजर अर्थात् जन्मादिविकारशून्य, वेदकर्ता, अत्यंत श्रेष्ठ आणि सगळ्या निषेधांचा अवधि असलेला व अमर असा आहे. ॥ १० ॥

**यदनीदृगतादृगीक्षकं पुरुषाख्यं परमं ह्यमायिकं ।**
**निरुपाधिकमाद्यमेककं तदु शोकं कथमर्हति व्यकम् ॥ ११ ॥**

**अन्वयः**—यत् अमायिकं ईक्षकं परमं पुरुषाख्यं तत् ईदृक् तादृक् च न भवति कुतः निरुपाधिकं आद्यं एककं व्यकं तत् उ शोकं कथं अर्हति ॥

**अर्थः**—कारण, ज्या अर्थी आवरणादिरहित साक्षीभूत, परमपुरुष-नामक ब्रम्हरूप तो परमात्मा असा तसा होत नाहीं. कारण तो अविद्या माया उपाधिरहित, आद्य, सर्वकारण, अद्वितीय, सृष्टिकाळांतहि एकटाच असा असणारा तो आत्मा ब्रह्मरूप असलेला शोक करण्यास योग्य कसा होईल ? सांग. कांहीं असलें तरी शोकास पात्र नाहीं. ॥ ११ ॥

**यदु भाति जगत्यनेकवत्तदु मायामयमेणनीरवत् ॥**
**गुरुदर्शिततत्त्वदीपतः पुरुदृङ् मुक्तिमियाद्भ्रमादतः ॥ १२ ॥**

**अन्वयः**—यत् उ जगति अनेकवत् भाति तत् एणनीरवत् मायामयं गुरुदर्शिततत्त्वदीपतः पुरुदृक् अतः भ्रमात् मुक्तिं इयात् ॥

**अर्थः**—तर प्रत्यक्ष वस्तूचा अपलाप कसा केला जातों तें सांगतों. जें या लोकांमध्यें सुर नर, पशुपक्ष्यादि रूपानें अनेक स्वरूपानें भासतें तें मायामय मृगजळाप्रमाणें मिथ्या असें असून तें खरें नव्हे. तर मग हा भ्रम कसा निवृत्त होईल ? याचें उत्तर असें कीं, शाब्द व परब्रह्मनिष्णात अशा सद्गुरूच्या द्वारां प्रकाशित जो तत्त्वज्ञानरूप दिवा, जीवब्रह्मैक्य-लक्षण असलेला त्यामुळें सर्वव्यापक आत्मदृष्टीच्या लाभानें विवेकी पुरुष मिथ्याभूत जगद्भ्रमांतून मुक्त होण्यास शक्य होतो. न होऊन या बाब-तींत अन्य उपाय नाहीं. ॥ १२ ॥

**नरजन्मनि चेन्न रे मृतं परजन्मन्यत आसुरे मृतम् ॥**
**सति मुञ्च शुचं न चंक्रमं प्रति गच्छाश्रय मोक्षसत्क्रमम् ॥ १३ ॥**

**अन्वयः**—रे नरजन्मनि अमृतं न चेत् तर्हि तेषां आसुरे मृतं अन्यत् परं न तस्मात् हे सति ! शुचं मुंच न चंक्रमं प्रति गच्छ मोक्षसत्क्रमं आश्रय ॥

**अर्थः**—हे साध्वी, या मनुष्य जन्मामध्यें जर मोक्ष प्राप्त करून घेतला नाहीं, तर प्राणपोषणतत्पर असे असुरांचा स्वभाव असलेले मानव परजन्मामध्यें मरणच प्राप्त करून घेतात. अमरपणाची वार्ताहि त्यांना नको आहे. ज्या अर्थी असें आहे त्या अर्थी तूं, हे सती, शोक टांकून दे. वारंवार या जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडूं नकोस. याच जन्मांत ईश्वर-भजन, स्वधर्माचरणादिकांच्या योगानें मोक्षाच्या सन्मार्गाचा आश्रय कर. ॥ १३ ॥

**स्वातंत्र्यं न हि योषितां सति पतिः स्त्रीणां सुरो नेतरो**
**हित्वा शाठ्यमतः पतिं भज ततः श्रेयो गुरोरुक्तितः ।**
**सेवा तस्य सुरार्चनं पदुदकं तीर्थं प्रसादस्तदु-**
**च्छिष्टं धर्म उतास्य वाक्यकरणं संतोषणं भूषणम् ॥ १४ ॥**

**अन्वयः**—हि योषितां स्वातंत्र्यं न तस्मात् हे सति ! स्त्रीणां पतिः एव सुरः इतरः न अतः शाठ्यं हित्वा पतिं भज । गुरोः उक्तितः ततः श्रेयः तस्य सेवा सुरार्चनं पदुदकं तीर्थं तदुच्छिष्टं प्रसादः उत अस्य वाक्यकरणं धर्मः संतोषणं भूषणम् ॥

**अर्थः**—कारण, हे स्त्रिये, स्त्रियांना केव्हांहि स्वातंत्र्य नाहीं. म्हणून हे सती, स्त्रियांना पति हाच देव, दुसरा शिव-विष्णु इत्यादिरूप कोणीहि देव नाहीं. ज्या कारणानें स्त्रियांचा पति हाच देव आहे, त्याकारणानें कापट्य टांकून पतीची सेवा कर. त्या पतिभजनानें श्रेय होईल. लोपा-मुद्रेच्या स्तुतिप्रसंगानें सांगितलेल्या बृहस्पतीच्या उक्तींवरून पतिभजन करण्यानें श्रेय प्राप्त होईल. त्या भर्त्याची सेवा हीच तिची देवाची पूजा. दुसरी देवपूजा नाहीं. त्या पतीचें पादोदक हेंच तीर्थ. पतीचें उच्छिष्ट हाच देवाचा प्रसाद होय. पतीच्या वाक्याप्रमाणें वागणें हाच तिचा धर्म होय. पतीचा संतोष भूषण होय. बाकी सुवर्णादिक हे भूषण नव्हे. ॥ १४ ॥

**नित्यं तज्जनगौरवं च सुहितं मर्यादयाऽदो व्रतं**
**धार्यं स्वापभुजीतयस्तमनु च प्राक् स्नानबोधोत्थितिः ॥**
**सर्वैनःशमनं धवानुगमनं गोत्रत्रयोत्धारणम् ॥**
**भूशय्यावपनार्चनव्रतवृषैर्वैधव्यसेवाऽथवा ॥ १५ ॥**

**अन्वयः**—च परं नित्यं तज्जनगौरवं कार्यं सुहितं कार्यं अदः व्रतं मर्यादया धार्यं तथा तं अनु स्वापभुजीतयः स्नानबोधोत्थितिः प्राक् सर्वैनः-शमनं गोत्रत्रयोद्धारणं धवानुगमनं अथवा भूशय्यावपनार्चनव्रतवृषैः वैध-व्यसेवा ॥

**अर्थः**—आणि नित्य पतीच्या संबंधीं अशा असलेल्या सासू, सासरा, दीर इत्यादिकांचे गौरव करणें हें अतिशय हिताचें आहे. म्हणून हें सर्व व्रत मर्यादेनें धारण करावें. आणि पतीच्या खाणें, पिणें, झोपणें इत्यादि-कांनंतर आपण खाणें, पिणें, झोपणें इत्यादि कार्यें करणारी आणि पतीच्या अगोदर उठणें, स्नान इत्यादि कार्यें करणारी अशी राहून दैव-वशात् पती मृत झाला असतां त्या स्त्रीनें प्रामुख्यानें सहगमन करावें अथवा भूशय्यादि वैधव्यव्रत पत्करून खाटेवर न झोपणें, केशवपन करणें, देवांची पूजा करून एकादशी जयंती इत्यादि उपवास करणें, कार्तिक, माघ, वैशाख, श्रावण मासादिकांमध्यें स्नान उपोषण, दीपा-राधना, दान इत्यादिकांच्या योगानें विधवाधर्मपालन करून सतीनें राहावें ॥ १५ ॥

**सा प्राह वैधव्यसुपालनं हा कष्टं युवत्या अपि धर्मवत्याः ॥**
**अतोऽनुयानं मतमित्यथाऽक्षान्दत्वा विभूतिं च तथेत्य-गात्सन् ॥ १६ ॥**

**अन्वयः**—धर्मवत्याः अपि युवत्याः वैधव्यसुपालनं हा कष्टं अतः अनुयानं मतम् । अथ सन् अक्षान् दत्वा विभूतिं दत्त्वा तथेति अगात् ॥

**अर्थः**—सती म्हणाली: तरुण स्त्रियांना वैधव्यधर्म पालन करून आयुष्य घालविणें हें अत्यंत कष्टाचें आहे. तरी मला सहगमन करण्याला परवानगी द्यावी. त्यावर तें ऐकून श्रीगुरूंनीं तिला पतीच्या कंठांत व कानांत धारण करण्याकरितां रुद्राक्ष तसेंच अंगाला लावण्याकरितां विभूति हीं देऊन तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच कर असें सांगितलें. ॥ १६ ॥

**सापि श्मशानेऽनुपदं हयेष्टिप्रदं मुदा भर्तृशवाग्रयानम् ॥**
**कृत्वाखिलानन्दपदं पदं च गुरोर्दिदृक्षुर्लघु संगमेऽगात् ॥१७॥**

**अन्वयः**—सा अपि मुदा अनुपदं हयेष्टिप्रदं स्मशाने भर्तृशवाग्रयानं कृत्वा अखिलानंदपदं गुरोः पदं दिदृक्षुः लघु संगमे अगात् ॥

**अर्थः**—ती पतीव्रता स्त्री आनंदानें पावलोपावलीं अश्वमेधपुण्य प्राप्त करून देणारें, स्मशानांतील भर्त्याच्या शवापुढें गमन करून सर्वानंदस्थान असलेल्या गुरुचरणांना पाहणेची इच्छा असलेली शीघ्र भीमा-अमरजा संगमावर गेली. ॥ १७ ॥

**सौभाग्यसंततिदया स दयासमुद्रस्तामाशिषालमभिनन्द्य शवं वितन्द्रः ॥ आनाय्य चाथ जलसिक्तमजीवयत्तं ताभ्यां स्तुतोऽवददजो निजदैवमुक्तम् ॥ १८ ॥**

**अन्वयः**—सौभाग्यसंततिदया आशिषा तां अलं अभिनन्द्य दयासमुद्रः सः शवं आनाय्य अथ च जलसिक्तं तं अजीवयत् ताभ्यां स्तुतः अजः निजदैवमुक्तं अवदत् ॥

**अर्थः**—श्रीगुरु म्हणाले:हे सती, तूं अष्टपुत्रा सौभाग्यवती भव याप्रमाणें सौभाग्यसंततिदायक आशीर्वादानें त्या सतीचें अभिनंदन करून भक्त-कार्यार्थि सदा उद्युक्त, दयासागर तो भगवान् त्या प्रेताला आणून व नंतर कमंडलुजलानें प्रोक्षण करून त्या मृतपतीला जिवंत करतां झाला. आणि मृतसंजीवित ब्राह्मण व त्याची पत्नी यांच्याकडून स्तुति करून घेतां झाला सर्व लोक मेलेला हा मनुष्य जिवंत कसा झाला या रीतीनें आश्चर्य-

चकित झाले असतां भगवंतांनीं सांगितलें कीं–निजभक्तांचें दैवरूप असलेलें या जन्मांत तीस वर्षांचें आयुष्य पुढच्या जन्मीच्या शंभर वर्षांच्या आयुष्यांतून काढून घेऊन या जन्मांत यास दिलें आहे. ॥१८॥

**ततः परेद्युः प्रतिचोदितोऽवदत् वदद्वरेण्योऽक्षविभूतिसंभवे ॥**
**वाराङ्गनामर्कटकुक्कुटोद्भवक्षमेशभद्रात्मजरुद्रसत्कथे ॥१९॥**

**अन्वयः**—ततः परेद्युः प्रतिचोदितः वदद्वरेण्यः अक्षविभूतिसंभवे वारांगनामर्कटकुक्कुटोद्भवक्षमेशभद्रात्मजरुद्रसत्कथे अवदत् ॥

**अर्थः**—त्यानंतर दुसऱ्या दिवशीं साध्वीकडून पूर्ववृत्त जाणण्याकरितां म्हणून विचारलेला भगवान् श्रेष्ठ वक्ता असा रुद्राक्ष, विभूति, यांच्यापासून निर्माण झालेल्या सतीवेश्या व तिनें बाळगलेला माकड व कोंबडा यांच्या क्षमेश भद्रात्मज यांच्या रुद्राच्या कथा साध्वीला सांगता झाला. त्यांत क्षमेश काश्मीरदेशाचा राजा, भद्रसेन नांवाचा त्याचा मुलगा यांच्या कथा सांगितल्या. ॥ १९ ॥

**स्त्रियो न देयो मनुरेतदर्थं तद्देवयान्या विकचं चरित्रम् ॥**
**सतीं स ऊचे सकचं कचेन काव्यं वराङ्गं विकचं कृतं च ॥२०॥**

**अन्वयः**—स्त्रियः मनुः न देयः एतदर्थं तत् देवयान्याः विकचं चरित्रं ऊचे सकचं काव्यं विकचं कृतं कचेन वरांगं विकचं कृतं च ऊचे ॥

**अर्थः**—स्त्रीला मंत्र देऊं नये या अर्थीं त्या प्रसिद्ध देवयानीचें स्पष्ट चरित्र भगवंतांनीं सतीला सांगितलें. ॥ २० ॥

**सोमवारव्रतं साध्व्यै सोमप्रियमुवाच सः ॥**
**सीमन्तिन्याप्यैन्द्रसेनिसीमन्तिन्या कृतं व्यकम् ॥ २१ ॥**

**अन्वयः**—सः व्यकं ऐन्द्रसेनिसीमन्तिन्या सीमन्तिन्या कृतं सोमप्रियं सोमवारव्रतं साध्व्यै उवाच.

**अर्थः**—तो भगवान् दुःख हरण करणारें इंद्रसेनाच्या मुलाची पत्नी सीमंतिनीकडून मैत्रेयीवचनामुळें केलेले शंकर प्रिय सोमवारव्रत साध्वीला सांगता झाला ॥ २१ ॥

**एवं विनाथौ शरणागतौ नतौ कृत्वा सनाथौ यशसाप्यलंकृतौ प्रस्थापयामास गृहाय दंपती तौ हर्षितौ यत्यपकारदंपती २२**

**अन्वयः**—एवं विनाथौ शरणागतौ नतौ सनाथौ यशसा अपि अलंकृतौ कृत्वा यत्यपकारदंपती हर्षितौ तौ दंपती गृहाय प्रस्थापयामास ॥

**अर्थः**—पूर्वी नाथरहित असलेल्या मागाहून शरणागत झालेल्या त्या दंपतींना सनाथ व यशानें अलंकृत करून त्या यतिश्रेष्ठ भगवानानें आनंदित अशा त्या दंपतींना घराकडे जाण्यास अनुज्ञा देऊन पाठविलें. ॥ २२ ॥

**परान्नाभिलाषिण्यथ ब्रह्मयोषित्परान्नारुचिं स्वं पतिं प्रार्थ्य चेशम् ॥ परान्नाय निन्ये भुजौ वीक्ष्य दंष्ट्रिश्वकोच्छिष्टमन्नं विहायेशमाप्तौ ॥ २३ ॥**

**अन्वयः**—अथ परान्नाभिलाषिणी ब्रह्मयोषित् परान्नारुचिं स्वपतिं, ईशं प्रार्थ्य परान्नाय निन्ये भुजौ दंष्ट्रिश्वकोच्छिष्टं अन्नं वीक्ष्य विहाय ईशं आप्तौ॥

**अर्थः**—त्यानंतर परान्नाची अभिलाषा करणाऱ्या ब्राह्मणस्त्रीनें परान्नाची इच्छा न करणाऱ्या आपल्या पतीला परान्नभोजनाकरितां पाठवा. याप्रमाणें भगवंताला प्रार्थना करून त्यांच्याकडून आज्ञा झालेल्या आपल्या पतीला परान्न घेण्यास नेलें. त्यानंतर ते दोघे दंपती जेवण्याच्या समयीं दात्यांकडून दिल्या जाणाऱ्या श्वानसूकरांचें उच्छिष्ट असलेल्या अन्नाला पाहून तें अन्न टांकून भगवंताजवळ आलें. ॥ २३ ॥

**तां बोधयित्वा द्विजमाह खिन्नं स्वेष्टासयज्वद्विजसज्जनान्नम्॥ ग्राह्यं तथा दानमसद्ग्रहादौ तीर्थे नृपाच्चापि न चापदादौ२४**

**अन्वयः**—तां बोधयित्वा खिन्नं द्विजं आह। त्वया स्वेष्टात्तयज्ञद्विजसज्जनान्नं ग्राह्यं। तथा असद्ग्रहादौ आपदादौ च नृपात् अपि दानं न ग्राह्यम् ॥

**अर्थः**—भगवान् म्हणाले: हे ब्राह्मणस्त्रिये, याप्रमाणें दुराग्रह करूं नकोस असा तिला बोध करून आपल्या व्रतनियमाच्या भंगानें खिन्न झालेल्या ब्राह्मणाला भगवान् म्हणाले: हे ब्राह्मणा, सगोत्रज व मित्र, गुरु, संबंधी, उपकार केलेले, विधीनें याग करणारे द्विज, साधु, यांचें अन्न घेत जा व यांच्यापासून दानहि घे. आपत्तींच्या वेळेलाहि वाईट दान असलेले, ग्रहणादिकांच्या ठिकाणीं तीर्थामध्यें दुष्ट राजांच्यापासून दान घेऊं नकोस. ॥ २४ ॥

**स्वाचारवान्न दुष्येत गृण्हन्नपि कुटुंबवान् ॥**
**स्वाचारं कथयेत्युक्तो ब्रह्मण्यो ब्रह्मणाऽवदत् ॥ २५ ॥**

**अन्वयः**—कुटुंबवान् स्वाचारवान् गृण्हन् अपि न दुष्येत स्वाचारं कथय इति ब्रह्मणा उक्तो ब्रह्मण्यः अवदत् ॥

**अर्थः**—कुटुंबवान् आणि सदाचारवान् ब्राह्मण यानें दान घेतलें असतांहि तो दोषी होत नाहीं असें भगवंताचें म्हणणें ऐकून ब्राह्मणांकडून हे भगवन्–सदाचार मला सांगा. याप्रमाणें विचारलेले ब्राह्मणप्रिय भगवान् सदाचार बोलले. ॥ २५ ॥

**बुद्ध्वा ब्राह्ममुहूर्ते ईशगुरुगा नत्वा दिवोदङ्मुखो भूत्वा मूत्रविशौ तृणेऽस्रपदिशि त्यक्त्वाम्मृदाऽधोबिले ॥ प्रक्षाल्यांघ्रिकरान्स्वबर्णवृषविद्वक्त्रं च गण्डूषतः क्षीरीध्मेन रदा न निन्द्यदिवसे स्नायात्पुराऽब्गोमयैः ॥ २६ ॥**

**अन्वयः**—ब्राह्मे मुहूर्ते बुद्ध्वा ईशगुरुगाः नत्वा दिवा उदङ्मुखो भूत्वा अस्रपदिशि मूत्रविशौ त्यक्त्वा अम्मृदा अधोबिले प्रक्षाल्य अंघ्रि-

करान् प्रक्षाल्य स्ववर्णवृपवित् वक्त्रं गंडूषतः प्रक्षाल्य अनिंद्यदिवसे क्षीरीध्मेन रदा पुरा प्रक्षाल्य अब्गोमयैः स्नायात् ॥

**अर्थः**—ब्राह्म मुहूर्तांत जागा होऊन अंथरुणावरून उठून परमेश्वर, गुरु, गाई, पृथ्वी यांना नमस्कार करून दिवसा उत्तरेकडे तोंड करून, रात्रीं दक्षिणाभिमुख होऊन आपले घराच्या नैर्ऋत्य दिशेकडे यज्ञीय-भूमि नसलेल्या जागीं वाळलेलें गवत ठेवून त्यावर मलमूत्रविसर्जन करून पाणी व माती यानें लिंग, गुद, यांचें प्रक्षालन करून जलाशयांत येऊन पाणी व मातीनें हातपाय धुऊन आपल्या स्ववर्णधर्माचें ज्ञान मिळवून—त्याप्रमाणें तोंड धुऊन चुळा भरून, रविवार, षष्ठी, अष्टमी, चतुर्दशी, दर्श इत्यादि निषिद्ध दिवस सोडून, प्लक्षादि, क्षीर वृक्षाच्या काष्टानें दंतधावन करून निंद्य दिवशीं अगर काष्ठ न मिळाल्यास आम्रादि पर्णांच्या योगानें दांत स्वच्छ करून बारा वेळां चुळा भरून अगोदर प्रातःकालीं पाणी व गोमयस्नान करावें. ॥ २६ ॥

**मध्याह्नेऽप्सु मृदा व्रतीं त्रिषवणं भिक्षुः प्रवाहाभिदृक्**
**गेहे प्राङ्मुख आचमावहतितृप्त्युन्मार्ष्टिसंकल्पनम्॥**
**वर्ज्यं मन्त्रितशीतलोष्णसलिलैः स्नायाच्चिरण्टी सदा**
**नो शीर्ष्णा विधिवत्कृताचमनकः संध्यामुपासीत वित् ॥२७॥**

**अन्वयः**— मध्यान्हे गृहस्थः मृदा अप्सु स्नायात् व्रती भिक्षुः त्रिषवणं स्नायात् प्रवाहाभिदृक् स्नायात्, गेहे प्राङ्मुखः स्नायात् आचमावहतितृप्त्युन्मार्ष्टिसकल्पनं वर्ज्यं। मंत्रितशीतोष्णसलिलैः स्नायात् चिरण्टी सदा शीर्ष्णा नो स्नायात्। वित् विधिवत् कृताचमनकः संध्यां उपासीत ॥

**अर्थः**—गृहस्थांनीं मृत्तिकास्नान करून पाण्यानें स्नान करावें. वनस्थ अगर कुटीचक, बहूदक संन्यासी यांनीं त्रिकाळ स्नान करावें. हंसयतीनें एकवेळ स्नान करावें. परमहंसांनीं नाहीं केलें

तरी चालेल, स्नानकालीं सर्वांनीं प्रवाहाभिमुख होऊन स्नान करावें. घरामध्यें स्नान करीत असतांना आचमन, अघमर्षण, देवपितृ-तर्पण, मार्जन, संकल्प हें सर्व वर्ज करावें. अर्थात् बाहेरच्या जलाशयांत अवश्य करावें. घरामध्यें अभिमंत्रित शीतोष्णपाण्यानें स्नान करावें. सुवासिनीनें सदा नित्य डोक्यावरून स्नान करूं नये. बुधवार व शनिवार या दोन दिवशीं सुवासिनींना मांगलिक शिरस्नान विहित आहे. विधिवत् आचमन करून संध्यावंदन करावें. या संध्येचा काल जाणून त्या योग्य वेळींच संध्या करावी. नक्षत्रें असतांना प्रातःसंध्येचा काळ उत्तम होय. नक्षत्रें लुप्त झालीं असतां मध्यम होय. ॥ २७ ॥

**मृद्भस्मागुरुचित्र आप्लवसवाचौर्ध्वं पवित्रोत्तरी-**
**याढ्योऽसूंश्च नियम्य मार्जनमुखं कृत्वोपवीती स्वकम् ॥**
**दत्त्वार्घ्याणि परीत्य चासनगतः कृत्वा जपोपस्थिती**
**तां संध्यां विसृजेद्धुनेन्निशि दिवा संध्यावदर्चेत्सुरान् ॥२८॥**

**अन्वयः**—आप्लवसवाचौर्ध्वं मृद्भस्मागुरुचित्रः पवित्रोत्तरीयाढ्यः असून् च नियम्य उपवीती सन् स्वकं मार्जनमुखं कृत्वा अर्घ्याणि दत्वा परीत्य आसनगतः जपोपस्थितीं कृत्वा तां संध्यां विसृजेत् निशि दिवा हुनेत् संध्यावत् सुरानर्चेत्. ॥

**अर्थः**—स्नान झाल्यानंतर गोपीचंदनानें ऊर्ध्व पुंड्र धारण करावें अथवा भस्मानें त्रिपुंड धारण करावें. होम झाल्यानंतर भस्म लावावें. देवपूजेनंतर चंदनाचा तिलक लावावा. दोन्ही हातांत दर्भपवित्र, व अंगावर उत्तरीय धारण करावें. प्राणायाम करून यज्ञोपविती होऊन बद्ध शिख होऊन स्वतःच्या गृह्यसूत्राप्रमाणें मार्जन, मंत्राचमन, पुनर्मार्जन, अघमर्षण आदि करून अर्घ्य द्यावेत.असावादित्यो ब्रह्मा याप्रमाणें आपल्या भोंवती पाणी फिरवून आचमन करून पृथ्वीत्यादि मंत्रानें आसनावर बसून जप उपस्थान करून दिग्गत देवता, गुरु, विप्र यांना वंदन करून

उत्तमे शिखरे इति या मंत्रानें संध्यादेवीचें विसर्जन करावें. सायंप्रातर्होम करावे. संध्येप्रमाणें त्रिकाल पंचायतन देवतांची पूजा करावी. ॥ २८ ॥

**यज्ञान्मासिकवार्षिकान्स्वसुगृहे नित्यांश्च पाठं सकृत्**
**श्राद्धं पोष्यभरोऽमृतं हितमितं सास्वग्निहोत्रं चरेत् ॥**
**निःशेषं लवणाज्यपायसमशब्दं मण्डले भोजने**
**मौनी स्नानजपाशनोत्सृतिषु चामन्त्राशने काकता ॥२९॥**

**अन्वयः**—स्वसुगृहे मासिकवार्षिकान् यज्ञान् नित्यान् च चरेत् पाठं सकृत् चरेत् श्राद्धं चरेत्। पोष्यभरः सास्वग्निहोत्रं हितमितं अमृतं चरेत् लवणाज्यपायसं निःशेषं अशब्दं च मण्डले भोजने चरेत् स्नान-जपाशनोत्सृतिषु मौनी भवेत्। अमंत्राशने च काकता भवेत् ॥

**अर्थः**—दर्शपूर्णमासादि यज्ञांना आचरावें. आग्रयणादिक वार्षिक याग आचरावे. आपल्या घरींच करावेत. आपत्कालांत भाड्याच्या घरांत, परगृहांत असतांना यज्ञादिक केलें असतांना पुण्यहानि नाहीं. नित्य देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ हे आत्मसंस्कारार्थ अन्नसंस्कारार्थ पंचसूनादोषपरिहार्थ प्रातःकाल सायंकाळ या दोन्ही वेळां आचरावे. ब्रह्मयज्ञ मात्र एकदांच दिवसा करावा. नित्य, मासिक, वार्षिक श्राद्ध करावें. अग्नि, अतिथि, भृत्यादिक पोष्यांना भरणाऱ्या गृहस्थानें प्राणाग्निहोत्रसहित अनिंद्य, पथ्यकारक, परिमित, पवित्र यज्ञशिष्ट भक्षण करावें. मीठ, तूप आणि पायस हे निःशेष खावें. बाकीचे पदार्थ थोडेथोडे शिल्लक ठेवावे. पायसादिक शब्द न करितां खावें. भोजनाचें पात्र मंडलावर असावें. स्नान, जप, भोजन, मलमूत्रविसर्जन या वेळीं मौन असावें. आपोशन प्राणाग्निहोत्र मंत्ररहित असें अन्न स्वेच्छेनें खाल्लें असतां द्विजाला कावळ्याचा जन्म प्राप्त होतो. अथवा आमंत्रणाशिवाय दुसऱ्याचे घरीं भोजन केलें असतां त्यालाहि कावळ्याचा जन्म प्राप्त होतो. ॥ २९ ॥

**पर्वार्केषु निशि व्रते न च चरेद्भूताष्टमीवासरे**
**ताम्बूलं विधवा यतीतर इदं नाद्याद् व्रते चान्हिकम् ॥**
**निश्याद्यप्रहरान्तमन्तरितकं नैशं निशीथात्पुरा**
**प्रायश्चित्तमतः स्वदारग ऋतौ रागी क्षणेऽनिन्दिते ॥३०॥**

**अन्वयः**—पर्वार्केषु निशि न चरेत्. तथा भूताष्टमीवासरे व्रते न च चरेत् विधवा यती ताम्बूलं न अद्यात्।इतरः व्रते न अन्तरितकं निश्याद्यप्रहरान्तं कुर्यात् नैशं निशीथात् पुरा कुर्यात् । अतः प्रायश्चित्तं कुर्यात् । रागी अनिन्दिते क्षणे स्वदारगः भवेत् ॥

**अर्थः**—पौणिमा, दर्श, रविवार या दिवशीं रात्रीं जेवण करूं नये आणि चतुर्दशी, अष्टमी,या दिवशीं दिवसां जेवूं नये. एकादश्यादि व्रतदिवशीं अहोरात्र भोजन करूं नये. विधवा व यतीनें तांबूल खाऊं नये. याशिवाय दुसऱ्या लोकांनींहि व्रतदिवशीं तांबूल भक्षण करूं नये. अडचणींमुळें दिवसाचें आन्हिक अंतरल्यास रात्रीचा पहिला प्रहर संपेपर्यंत तें करावें. रात्रीचें कर्म रात्र संपण्याचें पूर्वीं करावें. तें न झालेस अष्टोत्तरगायत्रीजपरूप प्रायश्चित्त आचरावें. रागी पुरुषानें अनिंदित वेळीं स्वस्त्रीशीं गमन करावें. अर्थात् परस्त्रीगमन करणारा, निंदित वेळीं स्वदारगमन करणारा हा नरकास जातो. ॥ ३० ॥

**कौ न्यासी विधवा स्वपेन्न यमदिक्पादोऽखिलो यत्कृतम्**
**तं संन्यस्य हरावयं वरवृषः षट्कर्मणो ब्रह्मणः ॥**
**नातः श्रेय इदं पराशरमुखैरुक्तं मयोक्तं तु ते**
**श्रुत्वा सोऽपि तथाऽऽचरत्समुदितो लुप्तोऽपि धर्मः पुनः**

**अन्वयः**—न्यासी विधवा कौ स्वपेत् । अखिलः यमदिक्पादो न स्वपेत् । यत् कृतं तत् हरौ संन्यस्य स्वपेत् । षट्कर्मणः ब्रह्मणः अयं वरवृषः अतः परं श्रेयः न इदं पराशरमुखैः उक्तं ते मया उक्तं सः अपि श्रुत्वा तथा आचरत् । लुप्तः अपि धर्मः पुनः उदितः ॥

**अर्थः—**संन्यासी व विधवा यांनीं जमिनीवरच झोपावें. खाटेवर वगैरे झोपूं नये. सर्व लोकांनीं दक्षिणेकडे पाय करून झोपूं नये. आपण केलेलें सर्व कर्म परमेश्वरास अर्पण करून झोपावें. याग, अध्ययन, दान, याजन, अध्यापन, प्रतिग्रह हीं सहा कर्में ब्राह्मणांचीं आहेत. याप्रमाणें वागणें हाच ब्राह्मणांचा उत्तम धर्म होय. याप्रमाणें सर्व वर्णाश्रम्यांचा श्रेयःसाधन हा धर्म आहे. यापेक्षां दुसरें श्रेयःसाधन कांहीं नाहीं. हे पराशरादिक महर्षींनीं सांगितलेलेंच मी तुला सांगितलेलें आहें. त्यांत माझ्या कल्पनेनें कांहीं सांगितलें नाहीं. याप्रमाणें गुरूंचा उपदेश ऐकून तोहि ब्राह्मण त्या प्रकारानें धर्माचरण करता झाला. कलियुगांत कालवशात् लुप्त झालेला धर्म पुनः उदय पावला. ॥ ३१ ॥

**त्रिपुंभुक्तिपर्याप्तमन्नं गृहीत्वा ययौ भास्कराख्यो द्विजोऽजाय भिक्षाम् ॥ प्रदातुं त्रिमासं स वासं चरन्वै न लेभेऽन्तरं तं हसन्तीतरे स्म ॥ ३२ ॥**

**अन्वयः**—भास्कराख्यः द्विजः अजाय भिक्षां प्रदातुं त्रिपुंभुक्तिपर्याप्तं अन्नं गृहीत्वा आययौ । स तत्र त्रिमासं वासं कुर्वन् अन्तरं न लेभे इतरे तं हसंति स्म ॥

**अर्थः—**भास्कर नांवाचा ब्राह्मण भगवंताला भिक्षा घालण्याकरितां म्हणून तीन माणसांना पुरेल एवढें अन्न घेऊन आला. तो भास्कर तेथें तीन मासपर्यंत निश्चयानें वास करूनहि भिक्षा घालण्याला अवकाश न मिळाल्यामुळें हा भिक्षा घालण्यास आलेला ब्राह्मण रोज गुरुमाऊलींच्या पंक्तींत जेवण करून आपण पुष्ट होत चालला. याप्रमाणें इतर लोक त्याचा उपहास करूं लागले. ॥ ३२ ॥

**गुरुः कारयामास पाकं च साकं स्न्यपत्यैर्द्विजैर्भोजयामास लोकम् ॥ परं चापि चान्नं न हीनं हि जातं तदाऽलौकिकं कौतुकं तत्र जातम् ॥ ३३ ॥**

**अन्वयः**—तदा गुरुः पाकं कारयामास स्त्र्यपत्यैः द्विजैः साकं लोकं भोजयामास परं अपि भोजयामास। तथापि अन्नं हीनं न जातं तदा तत्र अलौकिकं कौतुकं जातम् ॥

**अर्थः**—त्यावेळीं श्रीगुरूंनीं त्याच्याकडून पाक करविला आणि सर्व स्त्रिया, मुलें, ब्राम्हण इत्यादिकांसह ४००० लोकांना त्या स्वल्प अन्नानेंच जेऊं घातलें. शिवाय पशुपक्षादिकांनाहि जेवविलें. तथापि त्याचें अन्न कमी न झालेलें पाहून हें अलौकिक कौतुक झालें, असें सर्व लोक म्हणाले. ॥ ३३ ॥

**प्राकाम्यसिध्या स्वल्पान्नप्राकाम्यं हीश्वरोऽकरोत् ॥**
**सकाममागतं विप्रं निष्कामं चापि भास्करम् ॥ ३४ ॥**

**अन्वयः**—हि ईश्वरः प्राकाम्यसिध्या स्वल्पान्नप्राकाम्यं अकरोत्। सकामं आगतं भास्करं विप्रं निष्कामं अकरोत् ॥

**अर्थः**—निश्चयानें हा भगवान् अष्टमहासिद्धींपैकीं प्राकाम्यसिद्धीनें त्या थोडक्या अन्नाला परिपूर्ण करता झाला. सकाम भावनेनें आलेल्या त्या भास्कर ब्राह्मणाला निष्काम करितां झाला. ॥ ३४ ॥

**गङ्गानाम्नी सोमनाथकामिनी पुष्पवर्जिता ॥**
**परजन्मनि पुत्रार्थं समर्थमजमाभजत् ॥ ३५ ॥**

**अन्वयः**—पुष्पवर्जिता गंगानाम्नी सोमनाथकामिनी परजन्मनि पुत्रार्थं समर्थं अजं अभजत् ॥

**अर्थः**—अभीष्टदान करण्यास समर्थ असलेल्या भगवंताला शरण आलेली वृद्ध अशी सोमनाथ ब्राह्मणाची गंगा नांवाची पत्नी रजोदर्शन बंद झालेमुळें दुसऱ्या जन्मीं पुत्राची अपेक्षा करणारी अशी होऊन गुरूंच्या जवळ येऊन सेवा करती झाली. ॥ ३५ ॥

**तामाह तादृशीं तातः क जन्मैष्यं क्व वा स्मृतिः ॥**
**मृतिर्विस्मृतिरेवात्र सत्पुत्रौ ते भविष्यतः ॥ ३६ ॥**

**अन्वयः**—तातः तादृशीं तां आह । एष्यं ते जन्म क स्मृतिः क अत्र मृतिः विस्मृतिः एव ते सत्पुत्रौ भविष्यतः ॥

**अर्थः**—जगत्कर्ता भगवान् त्या वृद्ध ब्राह्मणस्त्रीला म्हणाले:-येणारे जन्म हे तुझे कोठें होणार, कोठून या वरदानाची आठवण? कारण मरण हें पूर्वजन्मीच्या विस्मृतिरूपांत आहे, म्हणून याच जन्मामध्यें १ मुलगा व १ मुलगी माझ्या प्रसादानें होतील. ॥ ३६ ॥

**इत्युक्त्वा नारदब्रह्मवादोक्ताश्वत्थसेवनम् ॥**
**शशंसाऽस्या अपुष्पत्वे फलवत्तेत्यसूचि किम् ॥ ३७ ॥**

**अन्वयः**—इति उक्त्वा नारदब्रह्मवादोक्ताश्वत्थसेवनम् शशंस अस्याः अपुष्पत्वे फलवत्ता असूचि किम् ॥

**अर्थः**—इतकें बोलून भगवंतांनीं नारद-ब्रह्मदेवसंवादरूपी अश्वत्थ-सेवा या ब्राह्मणीला सांगितली. पुत्रप्राप्त्यर्थ अश्वत्थसेवा सांगण्याचा काय अभिप्राय तर अश्वत्थ हा वनस्पति वृक्ष असलेनें फूल नसतांनाहि फलवत्ता ज्याप्रमाणें दिसते, त्याप्रमाणें पुष्प ( म्ह. रज ) नसलेल्या वृद्ध अशा तुलाहि माझ्या अनुग्रहानें पुत्रवत्ता प्राप्त होणार. याप्रमाणें भग-वंतांनीं सुचविलें. ॥ ३७ ॥

**ततो दृष्टरजा भूत्वा सगर्भा जरती त्वभूत्॥**
**तां वीक्ष्योचुर्जनाः किं नु जंगमोऽसौ वनस्पतिः ॥ ३८ ॥**

**अन्वय**—ततः जरती दृष्टरजा भूत्वा सगर्भा अभूत् । तां वीक्ष्य जना ऊचुः असौ वनस्पतिः जंगमः किन्नु ॥

**अर्थः**—अश्वत्थसेवा झालेनंतर वृद्ध असली तरी ती रजस्वला होऊन गर्भिणी झाली. विटाळ थांबलेल्या त्या स्त्रीला गर्भिणी झालेली पाहून

लोक म्हणूं लागले, हा चालताबोलता फिरणारा वनस्पतीच आहे कीं काय ? कारण पुष्पाशिवाय फलद्रप होणारा वनस्पति चालत नाहीं. ही तर चालत आहे, म्हणून असें म्हणाले. ॥ ३८ ॥

**कन्याऽथास्या अभूत्तां सा शुध्यूध्वं गुरुसंनिधिम् ॥**
**नीत्वोचे दारिका त्वेषा पितृहृद्दारिका न किम् ॥ ३९ ॥**

**अन्वयः**—अथ अस्याः कन्या अभूत् । सा तां शुद्ध्यूर्ध्वं गुरुसंनिधिं नीत्वा ऊचे एषा तु दारिका पितृहृद्दारिका न किं ॥

**अर्थः**—गर्भधारणेनंतर दहाव्या महिन्यामध्यें या ब्राह्मणस्त्रीला कन्या झाली. ती ब्राह्मणी शुद्धि झाल्यानंतर त्या कन्येला गुरुसंनिध नेऊन बोलली कीं, ही कन्या झाली ही पित्याच्या हृदयाला विदारण करणारी होणार नाहीं ? तर होणारच. अर्थात् पुत्र व्हावा. ॥ ३९ ॥

**तस्यै तदनुमत्यादादल्पायुष्यं बुधं सुतम् ॥**
**स तन्तुवर्धको जज्ञे तथा सा सद्गतिं गता ॥ ४० ॥**

**अन्वयः**—तस्यै तदनुमत्या अल्पायुष्यं बुधं सुतं अदात् । सः तन्तुवर्धकः जज्ञे । तथा सा सद्गतिं गता ॥

**अर्थः**—मूर्ख शतायु पुत्र अथवा पंडित अल्पायु पुत्र तुला पाहिजे ? याप्रमाणें गुरुमाउलीनें विचारलें असतां ब्राह्मणीनें अल्पायुषी पंडित पुत्राला मागितलें. तिच्या म्हणण्याप्रमाणें त्या ब्राह्मणस्त्रीला अल्पायुषी अत्यंत विद्वान् मुलगा झाला. तो मुलगा अल्पायुषी जरी झाला तथापि तंतुवर्धक म्ह० पांच पुत्ररूपानें आपल्या वंशतंतूला वाढविणारा विद्वान् दीर्घायु असा उत्पन्न झाला. ती सकाम असलेली ब्राह्मणीसुद्धां सद्गतीला (मोक्षाला) प्राप्त झाली. ॥ ४० ॥

**शुष्कौदुम्बरकाष्ठसेवनमहो कष्टं सुकुष्ठाय स प्रोचे कुष्ठनिवृत्तये नृहरये नत्वा गरिष्ठं स तु ॥ भेजे शिष्टनिवारितोऽपि तरुव-**

**त्काष्ठं सुकष्टेन तल्लोका ऊचुरजं स ताञ्छबरसन्निष्ठां तथारिष्टदाम् ॥ ४१ ॥**

**अन्वयः**—सुकुष्ठाय नृहरये कुष्ठनिवृत्तये कष्टं शुष्कौदुंबरकाष्ठसेवनं प्रोचे। स तु गरिष्ठं नत्वा शिष्टनिवारितः अपि तरुवत् काष्ठं सुकष्टेन भेजे। तत् लोकाः अजं ऊचुः स तान् रिष्टदां शबरसन्निष्टां तां उवाच ॥

**अर्थः**—तो भगवान् कुष्टनिवृत्तीकरितां अतिशय कष्टदायक औदुंबर काष्टाची कुष्टानें व्याप्त नृहरी नांवाच्या आपस्तंबशाखीय ब्राह्मणाला सेवा सांगता झाला. या काष्टाची सेवा कर. हें काष्ठ पल्लवानें युक्त झालें असतां तुझी शुद्धि होईल व तूं कुष्टहीन चांगल्या शरीराचा होशील असें गुरूनी सांगितलें. तो कुष्टी गुरुसर्वोत्तम भगवंताला नमस्कार करून लोकांनीं या वाळलेल्या काष्टसेवेचा काय उपयोग याप्रमाणें निवारलें असतांना सुद्धां मोठ्या कष्टानें वृक्षाप्रमाणें काष्टाची सेवा करिता झाला. त्याचें कष्टकारक कर्म पाहून लोक गुरूला म्हणाले, तेव्हां तो भगवान् त्यांना क्षेमदायक अरिष्ट हरण करणाऱ्या लिंगार्चनाकरितां राजपुत्रांनीं सांगितलेल्या रोज शंकराला चित्ताभस्म अर्पण करणाऱ्या शबराची सन्निष्ठा सांगता झाला. ॥ ४१ ॥

**हन्ताऽहं तारकोऽप्येतान् चिन्तानन्ता वृथागता ॥**
**मयि संतारिका भक्तिर्जाता संतारयेन्न किम् ॥ ४२ ॥**

**अन्वयः**—हन्त अहं तारकः अपि एतान् अनन्ता चिन्ता वृथा आगता मयि संतारिका भक्तिः जाता सा संतारयेत् न किम् ॥

**अर्थः**—भगवान् आपले मनांत म्हणाले:—अरेरे, मी सर्वांचा तारक आहें. तरी यांना अनंत व्यर्थ चिंता उत्पन्न झाली आहे. मजविषयीं उत्पन्न झालेली भक्ति तारणार नाहीं काय? तर तारणारच. ॥ ४२ ॥

**इत्युक्त्वा तत्र गत्वा प्रभुरथ करकस्थोदकैः प्रोक्ष्य काष्ठं**
**तद्दृष्ट्या दिव्ययैक्षद्विटपिवदभितस्त्वङ्कुराः प्रादुरासन् ॥**
**सन्विप्रोऽभूद्विकुष्ठः परतरकृपया स्वर्णवर्णोऽस्तुवत्तं**
**देवः सस्त्रीकमेतं खलु निजनिकटे स्थापयामास नित्यम् ४३**

**अन्वयः**—इति उक्त्वा अथ प्रभुः तत्र गत्वा करकस्थोदकैः तत् काष्ठं प्रोक्ष्य दिव्यया दृष्ट्या ऐक्षत्। विटपिवत् अभितः अंकुराः प्रादुरासन् परतरकृपया विकुष्ठः सन् स्वर्णवर्णः विप्रः अभूत्। तं अस्तुवत्। देवः सस्त्रीकं एतं निजनिकटे नित्यं स्थापयामास खलु ॥

**अर्थः**—असें बोलून भगवान् तेथें जाऊन आपल्या कमंडलुजलानें तें काष्ठ प्रोक्षण करून दिव्य दृष्टीनें पाहता झाला. तेव्हां त्या काष्ठावर झाडाप्रमाणें सर्व बाजूंनीं अंकुर उत्पन्न झाले. भगवत्कृपेनें तो कुष्ठरहित झालेला, सोन्यासारखा रंग झालेला ब्राह्मण त्या भगवंताची स्तुति करता झाला. भगवंतांनीं निश्चयानें स्त्रीसहित त्या ब्राह्मणाला आपलेजवळ नित्य ठेवून घेतलें. ॥ ४३ ॥

**प्रेष्ठदृष्ट्या तु कामादिदुष्टा नष्टाऽस्य संसृतिः ॥**
**विशिष्टेष्टस्य यः प्रेष्ठः कुष्ठवार्ता कुतोऽस्य तु ॥ ४४ ॥**

**अन्वयः**—प्रेष्ठदृष्ट्या तु अस्य कामादिदुष्टा संसृतिः नष्टा विशिष्टेष्टस्य यः प्रेष्ठः अभवत् अस्य कुष्ठवार्ता कुतः ॥

**अर्थः**—सर्वांचा आत्मा असलेल्या प्रियतम गुरूंच्या कृपादृष्टीनें या ब्राह्मणाचा कामादि दुष्टसंसार नष्ट झाला. विशेषानें शिष्टांना आवडता भगवान् त्याला प्रसन्न झाला. मग या ब्राह्मणाची कुष्ठवार्ता कोठून राहणार. ॥ ४४ ॥

**नामधारक ते पूर्वः सायंदेवाभिधानकः॥**
**वर्षादितोऽप्यजं भेजे तस्मै त्वाष्टकथां जगौ ॥ ४५ ॥**

**अन्वयः**—हे नामधारक, ते पूर्वः सायंदेवाभिधानकः वर्षार्दितः अपि अजं भेजे । तस्मै त्वाष्ट्रकथां जगौ ॥

**अर्थः**—हे नामधारका, तुझा पूर्वज सायंदेव नांवाचा पावसानें पीडित झाला असतांसुद्धां थंडीवारा इत्यादिक सहन करून भगवंताची सेवा करता झाला. भगवंतांनीं त्याला काशीयात्रा आचरणरूप विश्वकर्म्याची कथा सांगितली. ॥ ४९ ॥

**यात्रानिरूपणमिषेण स दर्शयित्वा काशीं निजासनगताय नताय तेन ॥ स्तोत्रेण किल्बिषहरेण सुतुष्ट ऊचे त्वं चेह दारसहितोऽवहितो वसेति ॥ ४६ ॥**

**अन्वयः**—स यात्रानिरूपणमिषेण निजासनगताय नताय काशीं दर्शयित्वा तेन किल्बिषहरेण स्तोत्रेण सुतुष्टः ऊचे । त्वं इह अवहितः दारसहितः वस ॥

**अर्थः**—काशीयात्रा निरुपणाच्या निमित्तानें आपल्या आसनावर बसलेल्या काशींत प्रविष्ट असलेल्या नम्र अशा सायंदेवाला काशी दाखवून त्या सायंदेवांकडून पापहारक स्तोत्रानें अत्यंत संतुष्ट झालेला भगवान् म्हणालाः—हे सायंदेवा, तूं समाधान मनानें भार्येसहित येथें माझ्याजवळ राहा. ॥ ४६ ॥

**उदारान्स दारान्समानीय सार्भान्विदर्भात्मजासंनिभानिन्दुभास्यम् ॥ ववन्देऽभवं देवदेवं स भावं निरीक्ष्यास्य वंशाय चाऽदात्स्वभावम् ॥ ४७ ॥**

**अन्वयः**—स उदारान् सार्भान् विदर्भात्मजासन्निभान् दारान् समानीय इन्दुभास्यं देवदेवं ववन्दे स अस्य भावं निरीक्ष्य अस्य वंशाय च स्वभावं अदात् ॥

**अर्थः**—तो सायंदेव उदार अशा पुत्रासहित असलेल्या रुक्मिणीसारख्या पत्नीला गुरुमाउलीसन्निध आणून प्रसन्नमुख अशा संसार-

निवर्तक देवदेवांना सपत्नीक नमस्कार करतां झाला. तो भगवान् त्याची भक्ति पाहून त्याला आणि त्याच्या वंशालाहि आपली भक्ति देता झाला. ॥ ४७ ॥

**तस्मै कौण्डिण्यगोत्राय कौण्डिण्यर्षिकृतं व्रतम् ॥**
**उक्त्वाकारयदानन्तं पाण्डवेन हरिर्यथा ॥ ४८ ॥**

**अन्वयः**—कौण्डिण्यगोत्राय तस्मै कौण्डिण्यर्षिकृतं आनन्तं व्रतं उक्त्वा अकारयत्। पाण्डवेन हरिः यथा तथा ॥

**अर्थः**—कौंडिण्य गोत्राच्या त्या सायंदेवाला कौंडिण्य ऋषीनें केलेल्या अनंतव्रताला सांगून धर्मराजाच्याकडून श्रीहरीनें जसें करवलें त्याप्रमाणें त्याच्याकडून अनंतव्रत करविता झाला. ॥ ४८ ॥

**कथां परां शृणु रुचिरां सुभाविकः कुविन्दकः प्रभुभजकः स तन्तुकः ॥ तमाह्वयच्छ्र्यगगमनाय बन्धुता स तां जगावग इह मेऽर्च्यदेवता ॥ ४९ ॥**

**अन्वयः**—( हे नामधारक ) परां रुचिरां कथां शृणु। सुभाविकः कुविन्दकः सः तन्तुकः प्रभुभजकः आस। तं बन्धुता श्र्यगगमनाय आव्हयत्। सः तां जगौ। इह मे अर्च्यदेवता (एव) अगः (अस्ति)।

**अर्थः**—हे नामधारका, अतिशय सुंदर कथा ऐक. अतिशय गुरुभक्तिमान् कोष्टी जातीचा तंतुक भगवत्सेवक होता. त्या तंतुकाला त्याच्या बंधुसमूहानें श्रीशैल्याला जाण्याकरितां हांक मारली. तो तंतुक त्या बंधूंना म्हणालाः येथें माझी उपास्य देवता भगवानच श्रीशैल्य आहे. ॥ ४९ ॥

**मत्वाऽज्ञं तं सा तु जगामाऽगमथोचे मध्यान्हे तं संगममासं स तु नो चेत् ॥ दृष्टोऽगोऽन्वेहीत्यनयत्तं स च दृष्ट्वा नृत्यन्रेजे मत्तमयूरोपम इष्ट्वा ॥ ५० ॥**

**अन्वयः**—सा तु तं अज्ञं मत्वा अगं जगाम. अथ मध्यान्हे संगमं आतं तं ऊचे। अगः त्वया न दृष्टश्चेत् त्वं अन्वेहि। इति तं अनयत् स तं दृष्ट्वा इष्ट्वा च नृत्यन् मत्तमयुरोपमः रेजे ॥

**अर्थः**—बंधुसमूहानीं तसें बोलणाऱ्या तंतुकाला अज्ञ समजून श्रीशैल्याला प्रयाण केलें. त्यानंतर शिवरात्री व्रताच्या दिवशीं मध्यान्हाच्या वेळीं संगमाला आलेल्या तंतुकाला भगवान् बोलले:—श्रीशैल्य तुझ्याकडून पाहिला नसेल तर, तंतुका, माझ्या पाठीमागून ये. असें बोलून आकाशगमन सिद्धीनें क्षणांत श्रीशैल्याला भगवानांनीं त्याला नेलें. तंतुकानें श्रीशैल्य मल्लिकार्जुन पाहून पूजा करून मत्त हर्षानें मयूरासारखें वर्तन केलें. ॥ ९० ॥

**कृत्वा वपनं द्रष्टुं गुरुणाऽऽदिष्टः स मल्लिकार्जुनं गत्वा ॥**
**तत्र गुरून्स्वजनानपि दृष्ट्वैत्य पुनर्जगौ गुरुं नत्वा ॥९१॥**

**अन्वयः**—गुरुणा आदिष्टः वपनं कृत्वा मल्लिकार्जुनं द्रष्टुं गत्वा तत्र गुरून् स्वजनान् अपि दृष्ट्वा पुनः गुरुं एत्य जगौ ॥

**अर्थः**—भगवंतांनीं आज्ञा दिलेला तंतुक वपन व स्नान करून मल्लिकार्जुनाला पाहण्याकरितां जाऊन त्या देवस्थानांत गुरुमाउलीला आणि देवालयांत आपल्या स्वजनबंधू इत्यादिकांना पाहून पुनः गुरुजवळ जें पाहिलें होतें तें सांगता झाला. ॥ ९१ ॥

**अवेक्ष्याप्यन्तिकस्थं त्वामुपेक्ष्यापि कुतो जनः ॥**
**दूरमेतीति संपृष्टो दूरदृष्टिरुवाच तम् ॥ ९२ ॥**

**अन्वयः**—अन्तिकस्थं त्वां अवेक्ष्य जनः दूरं कुतः एति इति पृष्टः दूरदृष्टिः तं उवाच ॥

**अर्थः**—जवळ असलेल्या तुला भगवंताला पाहूनहि, देवा, पुनः उपेक्षा करून लोक काय हेतूनें येथें दूर येतात? असा विचारलेला दूरदृष्टीचा भगवान् त्या तंतुकाला बोलला. ॥ ९२ ॥

**कारुण्यात्स्वेच्छया मे जननमिह कृतं कर्म दिव्यं च तज्ज्ञा**
**गौण्या भक्त्या पवित्राः स्मृतिकथनमुखैश्चार्चनैर्नापराधैः ॥**
**पादोदाद्यैर्मदात्मा विदित इह तु यैर्भक्तिमाप्ताः परां ये**
**संमानाद्यङ्कितास्तत्कृतवसतिषु मे नित्यवासो विभोश्च ॥ ५३ ॥**

**अन्वयः**—मे कारुण्यात् स्वेच्छया इह जननं कृतं दिव्यं कर्म च कृतं तज्ज्ञाः, स्मृतिकथनमुखैः नापराधैः अर्चनैः गौण्या भक्त्या पवित्राः यैः मदात्मा विदितः ये परां भक्तिं आप्ताः संमानाद्यांकिताः तत्कृतवसतिषु मे विभोः नित्यवासः अस्ति ॥

**अर्थः**—माझ्याकडून या लोकांमध्यें, लोकांच्या वरील करुणेनें अवतार धारण केला गेला आहे. आणि दिव्य वर्णाश्रमाचारविहित कर्महि केलेलें आहे. याविषयीं जे तज्ज्ञ माझा अवतार व कर्म जाणणारे शास्त्रानुसारी शुद्ध पूजनादिकांच्या योगानें व चरणतीर्थसेवनानें गौणी भक्ति करून पवित्र झालेले नंतर ज्यांच्याकडून मत्स्वरूप ज्ञात झाले, जे पराभक्तीला प्राप्त झाले, माझ्या सम्मानतेला प्राप्त झालेले जे आहेत त्यांच्या कृतीमध्यें, वसतीमध्यें माझें नित्य वास्तव्य असतें. ॥ ५३ ॥

**इत्युक्त्वा कथयित्वाऽस्मै विमर्षणकथां पुनः ॥**
**सुमर्षणो धारयित्वा पादुके मठमानयत् ॥ ५४ ॥**

**अन्वयः**—सुमर्षण इति उक्त्वा पुनः अस्मै विमर्षणकथां कथयित्वा पादुके धारयित्वा मठं आनयत् ॥

**अर्थः**—नित्य शांत भगवान् असें बोलून त्या तंतुकाला विमर्षण राजाची कथा सांगून पुनः पादुका धरण्यास सांगून त्याला पुनः मठाकडे आणता झाला. ॥ ५४ ॥

**जनाय पृच्छते क्षौरहेतुं तन्तुक आह सत् ॥**
**असन्मेने स पक्षान्ते सदासाऽऽप्तात्तु तैर्थिकात् ॥ ५५ ॥**

**अन्वयः**—क्षौरहेतुं पृच्छते जनाय तन्तुकः सत् आह. स असत् मेने। पक्षान्ते तैर्थिकात् आतात् तु सत् आस ॥

**अर्थः**—क्षौर केल्याचें कारण विचारणाऱ्या लोकांना तंतुकानें खरी गोष्ट सांगितली. तें ऐकूनहि ते लोक खोटें समजतें झालें. पुढें १५ दिवसांनंतर श्रीशैल्याहून आलेल्या. लोकांकडून ऐकल्यानंतर सत्य असें त्यांना वाटलें. ॥ ५५ ॥

**दूरीकृत्यान्तरं साक्षादूरीकृत्याङ्ग तन्तुकः ॥**
**परां भक्तिं ययौ साक्षात्परां भागवतीं गतिम् ॥ ५६ ॥**

**अन्वयः**—अन्तरं दूरीकृत्य अङ्ग, परां भक्तिं ऊरीकृत्य तन्तुकः परां भागवतीं गतिं ययौ ॥

**अर्थः**—हे नामधारका, अविद्या माया उपाधिगत भेदाला तंतुकानें दूर करून साक्षात् पराभक्तीचा स्वीकार करून पराकाष्टात्मक असलेल्या भगवद्गतीला ( मोक्षाला ) प्राप्त झाला. ॥ ५६ ॥

**नन्दिशर्माऽभजद्देवीं कुष्ठान्ताय तया यतिम् ॥**
**गन्धर्वस्थं चरेत्युक्तः स्वप्ने बुद्धोऽवदत्स ताम् ॥ ५७ ॥**

**अन्वयः**—नन्दिशर्मा कुष्टान्ताय देवीं अभजत्। तया गंधर्वस्थं यतिं चर इति स्वप्ने उक्तः स बुद्धः तां अवदत्।

**अर्थः**—कुष्टी अशा नंदीशर्मा ब्राह्मणानें कुष्टनाशाकरितां देवी-चंदलापरमेश्वरीची सेवा केली. त्या देवीकडूनहि-तूं गाणगापुरींत राहणाऱ्या यतींच्याजवळ जा याप्रमाणें स्वप्नामध्यें सांगितलेला असा तो, जागा होऊन त्या देवीला बोलला ( देवीसह साक्षात् भाषणाचा अभाव असला तरी देवीप्रतिमेसान्निध्य बोलणें शक्य आहे. ). ॥ ५७ ॥

**वृषाकपाय्योर्नो भेदो वृषाकप्योर्मनागपि ॥**
**संमतो देवदैवज्ञे विमतोऽमर्त्यमर्त्ययोः ॥ ५८ ॥**

**अन्वयः**—वृषाकपाय्योः भेदः न संमतः वृषाकप्योः मनाक् अपि भेदः न संमतः हे देवदैवज्ञे अमर्त्यमर्त्ययोः भेदः विमतः न किन्तु मतः एव ॥

**अर्थः**—गौरी आणि लक्ष्मी एकरूप असलेमुळें यांच्यांत भेद नाहीं. आणि शिव व विष्णु यांच्यांतहि भेद संमत नाहीं. हें देवांचें दैव जाणणारे देवी, देव आणि माणूस यांच्यांत मात्र परस्पर विरुद्ध असलेमुळें भेद मानावाच लागतो. ॥ ५८ ॥

**नरं चरेति कथितुं देवि लज्जाऽपि ते न किम्**
**तेन किं मम चात्रैव कुर्वे प्रायोपवेशनम् ॥ ५९ ॥**

**अन्वयः**— नरं चर इति कथितुं देवि ते लज्जा न किं मम तेन किं प्रयोजनं अत्रैव प्रायोपवेशनं कुर्वे ॥

**अर्थः**—तूं मनुष्याजवळ जा-याप्रमाणें सांगतेस-असें सांगण्यास हे देवी, तुला लज्जाहि वाटत नाहीं काय ? त्या मनुष्याशीं माझें काय प्रयोजन आहे ? म्हणून येथें प्रायोपवेशन सुरू करतों. ॥ ५९ ॥

**ततोऽसौ हापितो यातो यतिं तेनोदितोऽपि ते ।**
**कृत्यं मर्त्येन किमिति स तदा वेद तं परम् ॥ ६० ॥**

**अन्वयः**—ततः असौ हापितः यतिं यातः तेन अपि मर्त्येन ते किं कृत्यं इति उदितः स तदा तं परं वेद ॥

**अर्थः**—त्यानंतर देवीकडून आपल्या भक्ताच्या द्वारां वालवला गेलेला हा ब्राह्मण गुरुमाउली भगवंताकडे गेला. तेथें त्या भगवंताकडूनहि मानव अशा माझ्याकडून तुझें कार्य काय होणार असें बोललेला तो नंदी ब्राह्मण तेव्हां त्या भगवंताला बुद्धिसाक्षी परमेश्वर असें समजता झाला. ॥ ६० ॥

**संगमे स्नापयित्वा स आनीतो गुरुणान्तिकम् ॥**
**एकं प्रतीकं कुष्ठाक्तं दृष्ट्वाऽभाणीत्स तं हितम् ॥ ६१ ॥**

**अन्वयः**—ततः गुरुणा संगमे स्नापयित्वा अन्तिकं आनीतः सः एकं प्रतीकं कुष्ठाक्तं दृष्ट्वा हितं तं अभाणीत् ॥

**अर्थः**—त्यानंतर गुरूंकडून संगमावर स्नान घालून जवळ आणलेला तो नंदीशर्मा ब्राह्मण एक कुष्टयुक्त अवयव पाहून हितकारक अशा त्या भगवंताला म्हणाला. ॥ ६१ ॥

**कुष्ठं शिष्टमिदं कुतो वद हरे मत्संशयाच्चेत्सुधा पीताऽप्यम्बुधिया मृतिं नयति किं स्पृष्टोऽनलोऽज्ञानतः॥ किं वाऽल्पं दहतीत्यजोऽवददमुं जन्मान्धबुद्ध्या यथा भात्यर्कोऽपि तमोमयो मयि तथा त्वत्कल्पनेयं वृथा ॥ ६२ ॥**

**अन्वयः**—हरे ! इदं कुष्ठं कुतः शिष्टं मत्संशयात् अवशिष्टं इति चेत् अम्बुधिया अपि पीता सुधा मृतिं नयति किं ? वा अज्ञानतः स्पृष्टः अनलः अल्पं दहति किं ? इति श्रुत्वा अजः अमुं अवदत् । यथा जन्मान्धबुद्ध्या अर्कः तमोमयः भाति, तथा मयि इयं त्वत्कल्पना वृथा ॥

**अर्थः**—हे हरे, हें कुष्ट काय कारणांस्तव शिल्लक राहिलें तें सांगा. हा मनुष्य आहे कीं देव आहे या माझ्या संशयानें हें कुष्ट राहिलें आहे, असें जर आपण म्हणाला तर–पाण्याच्या बुद्धीनें प्यालेलें अमृत मरण देईल काय ? अथवा अज्ञानानें स्पर्श केलेला अग्नि थोडा जाळतो काय ? असा विचारलेला भगवान् त्या नंदीशर्माला बोलला:—ज्याप्रमाणें जन्मांधाच्या बुद्धीनें सूर्य तमोमय भासतो, त्याप्रमाणें मजविषयीं व्यर्थ ही तुझी कल्पना आहे. तुझा दोष हाच. ॥ ६२ ॥

**विप्राऽथाऽपि स्तुहि परधिया मां तया तेऽस्तु शुद्धिस्तद्धि श्रुत्वाऽवददयमहो विद्धि मां हीनबुद्धिम् ॥ मौने जाने न च लिपिमपीत्यत्रिजो भस्म दिव्यं तज्जिह्वाग्रेऽक्षिपदथ कविः सोऽपि भूत्वेशमस्तौत् ॥ ६३ ॥**

**अन्वयः**—विप्र ! अथापि परः इति धिया मां स्तुहि तया ते शुद्धिरस्तु तद्धि श्रुत्वा अयं अवदत् । अहो मौने ! मां हीनबुद्धिं विद्धि । लिपिं अपि न जाने इति अत्रिजः दिव्यं भस्म तज्जिह्वाग्रे अक्षिपत् । अथ सः अपि कविः भूत्वा ईशं अस्तौत् ॥

**अर्थः**—हे ब्राह्मणा, तथापि हा परमात्मा आहे या बुद्धीनें माझी स्तुति कर. त्या स्तुतीनें तुझी शुद्धि होईल. तें बोलणें ऐकून ब्राह्मण म्हणालाः हे यतिवर्य, मी अत्यंत हीन बुद्धीचा आहें. मला लिपीचें सुद्धां ज्ञान नाहीं. असें त्याचें म्हणणें ऐकून भगवानानें दिव्य अभिमंत्रित भस्म त्याच्या जिव्हेवर टांकलें. त्यानंतर तो ब्राह्मण कवि होऊन भगवंताची स्तुति करता झाला. ॥ ६३ ॥

**ब्रह्मन् तत्त्वमसि त्वमादिपुरुषः सन्निर्विशेषोऽकलः कालादीन्निजशक्तितः सृजति यः सोऽचिन्त्यशक्तिः स्वराट् ॥ पंचाग्निक्रमतोऽशकान्कृतफलप्राप्त्यै मुहुर्भ्रामयन्गर्भावासजनुर्दशादिभिरहंत्वेनापि नो लिप्यते ॥ ६४ ॥**

**अन्वयः**—ब्रह्मन् ! त्वं तत्त्वमसि त्वं निर्विशेषः अकलः आदिपुरुषः सन् निजशक्तितः कालादीन्सृजति । यः सः अचिन्त्यशक्तिः स्वराट् अंशकान् पंचाग्निक्रमतः गर्भावासजनुर्दशादिभिः भ्रामयन् अपि अहंत्वेन नो लिप्यते॥

**अर्थः**—हे ब्रह्मन्–आपण परब्रह्मरूप आहांत, तूं निर्विशेष म्हणून षोडशकलारहित आहेस. आदिपुरुष असून आपल्या मायेच्या संबंधानें कालादिकांना निर्माण करतोस. जो या तऱ्हेचा स्रष्टा तो तूं अचिंत्य, सत्त्वासत्त्वाहून अनिर्वचनीय अशा मायाशक्तीनें संपन्न स्वतःसिद्ध ज्ञानवान् , अंशभूत जीवांना त्यांनीं केलेल्या कर्माच्या फलप्राप्तीकरितां अंतरिक्ष, पर्जन्य, औषधि, पुरुष आणि स्त्री या पंचाग्नींच्या क्रमानें गर्भवास जन्मादिक अवस्थांप्रत फिरवीत असतांनाहि मी सर्वांचा कर्ता आहें या अभिमानानें तूं लिप्त होत नाहींस. ॥ ६४ ॥

**निवर्तते ज्ञानमृते त्वनादिभ्रमो न न त्वद्भजनं विना तत् ॥**
**अतस्त्वयि प्रीतिरनारताऽस्तु यथाबुधानां विषयेषु नाथ ॥६५॥**

**अन्वयः**—अनादिभ्रमः ज्ञानं ऋते न निवर्तते त्वद्भजनं विना तत् न नाथ ? यथा अबुधानां विषयेषु प्रीतिः तथा त्वयि अनारता प्रीतिः अस्तु॥

**अर्थः**—हा अनादिभ्रम आत्मज्ञानावांचून दूर होत नाहीं. भ्रम-निवृत्तीकरितां ज्ञानच आवश्यक आहे, तें ज्ञान तर तुझ्या भक्तीशिवाय प्राप्त होत नाहीं. म्हणून हे नाथा, मूर्खांची ज्याप्रमाणें विषयांच्या ठिकाणीं सतत प्रीति असते, तशी त्वद्विषयीं सतत माझी भक्ति असूं दे. ॥ ६९ ॥

**एकस्त्वं षड्रिपून् जेतुं भगवन्न क्षमोऽसि चेत् ॥**
**जह्येकं काममेवाऽथो शिष्टा यास्यन्ति पञ्चताम् ॥ ६६ ॥**

**अन्वयः**—भगवन् एकः त्वं षड्रिपून् जेतुं न क्षमः असि चेत् एकं कामं एव जहि । अथो शिष्टाः पंचतां यास्यंति ॥

**अर्थः**—देवा, कामादि षड्रिपूनें व्याप्त चित्ताच्या लोकांची माझ्या विषयीं कुठून सतत प्रीति होईल? असें म्हणशील तर त्यांना नाहींसें करून प्रीति दे. जरी साही शत्रूंना मारण्यांत प्रयास आहे असें म्हणाल तर, भगवन्, एकटा तूं षड्रिपूंना जिंकण्यास समर्थ नसशील तर एका कामालाच नाहींसा कर. त्यानंतर कामघातानंतर बाकीचे पांच शत्रु आपोआपच नष्ट होतील. बाकीचे पांचहि कामोद्भव आहेत. ॥ ६६ ॥

**तौतातितातीत तात ततन्तुततीत ते ।**
**तत्ता तूता तता तेऽन्तातीतताऽतितता ततः ॥ ६७ ॥**

**अन्वयः**—हे तौतातित ( हे ) तात ( हे ) ततन्तुततीत ते तता तत्ता तु उत अस्ति ( यत एवं ) ततः अतितता ते अन्तातीतता अस्ति पक्षे ( हे, तौतातितातीत ( हे ) तात ( हे ) ततन्तुततीत । तता ते तत्ता उत अस्ति हे ततः अतीत अतीतता ते अन्तातीतता चास्ति ॥

**अर्थ:**—क्षपणक सौगत अशा बौद्ध अवांतर मतरहित अशा तेज, पाणी, अन्नादिलक्षण प्रकृत्यादि द्वारा जगत्‌विस्तारका, हे विस्तृत अशा प्रकृतिविकृतिलक्षण भतभौतिकरूप पंक्तींना सोडून त्याहूनहि अधिक रूपांत असलेल्या हे भगवन्, तुझी सर्वत्र व्याप्ति ब्रह्मभावानें आहे. स्वकार्यसहित प्रधानतत्त्वाच्यापलीकडे असलेल्या ब्रह्मरूप भगवन्, तुझा ब्रह्मभाव सर्व प्रधानादिकांच्या ठिकाणीं अनुस्यूत आहे. म्हणून सर्वत्र व्याप्त असल्यानें अतिशयानें असणारी तुझी व्याप्ति देशकाल-वस्तुविभागातीत अशी आहे. ॥ ६७ ॥

**सरसासारसंसार सुरासाराारिसारर ।**
**सूरिसूरेऽसुरारे रैरसारेरं रसोऽसि सः ॥ ६८ ॥**

**अन्वय:**—(हे) सरस असारसंसार सुरासारारिसारर सूरिसूरे असुरारे रैरसारे (त्वं) अरं सः रसः (असि) ॥

**अर्थ:**—या प्रकारच्या स्तुतीनें प्रोत्साहित नंदिशर्मा ब्राह्मण सद्‌गुरूंची स्तुति करूं लागला. विक्षेप, आवरणरहित अशा विशुद्ध सत्त्व-उपाधींमुळें अनुभवाला येणारा जो नित्य, निरतिशय, निरुपाधिक, आनंद त्यानें सहित अशा हे परमानंदा, हा असार संसार ज्याच्यामुळें आहे अशा संसारबीजा, संसारांत असणारा सारभूत आनंद तोहि तुझ्याच अस्तित्वानें भासणारा आहे. इंद्रिय अंतःकरणानें सहित असलेल्यांचें निर्बल असे जे रागादि शत्रु त्यांचें बल हरण करणाऱ्या म्हणजे आपल्या भक्तांच्या इंद्रियादि दुर्वृत्तींच्या सामर्थ्याला नाहींसा करणारा आहेस. शिवाय अज्ञजनांच्या संशय, भावना, इत्यादिनाशक ज्ञान देणारा पंडित आहेस. म्हणून हे पंडितपंडिता, आणि असुरांचा म्हणजे दंभदर्पादि-कांचा शत्रु असलेल्या हे प्रभो, ऐहिक आमुष्मिक धनाचा जो राग म्हणजे प्रीति त्याच्या विघातका, सर्व मोक्षमार्गातील अनर्थांना निवारण करणाऱ्या, तो जो ब्रह्मास्वाद आहे, तो प्रत्यक्ष ब्रह्मरूप तूं आहेस.॥६८॥

**एवं संस्तुवतोऽस्य कुष्ठमभवन्नष्टं विशिष्टेष्टसंतुष्ट्या तं च सदारमात्मनिकटे तुष्टे ररक्षेष्टकृत् ॥ तस्याभूत्प्रथिता क्षितौ सुकविता कश्चित्समाकर्ण्य तां मेने नृस्तुतिमण्डिताऽपि कविता गर्ह्याप्युदारेत्यवित् ॥ ६९ ॥**

**अन्वयः**—एवं संस्तुवतः अस्य कुष्टं विशिष्टेष्टसंतुष्ट्या नष्टं अभवत् ॥ इष्टकृत् तं सदारं तुष्टेः आत्मनिकटे ररक्ष । तस्य सुकविता क्षितौ प्रथिता अभूत् । कश्चित् तां समाकर्ण्य उदारा अपि कविता नृस्तुतिमंडिता गर्ह्या इति मेने । यतः अवित् ॥

**अर्थः**—याप्रमाणें उत्तमप्रकारें स्तुति करणाऱ्या या ब्राह्मणाचें शिल्लक राहिलेलें कुष्टहि भगवंतांच्या संतोषानें नष्ट झालें. अपेक्षित फळ देणाऱ्या भगवंतानें संतोषानें पत्नीसहित त्या ब्राम्हणाला आपल्याजवळ ठेवून त्याचें रक्षण केलें. मग त्याची कवित्वाची प्रसिद्धि झाली. कोणी एक नरकेसरी नांवाच्या कवीनें त्याचें कवित्व ऐकून उदार अशा कवित्वाला मनुष्याची स्तुति आहे म्हणूनच निंद्य असें मानलें. कारण भगवंताचें तत्त्व त्याला समजलें नाहीं. ॥ ६९ ॥

**स नित्यवन्मानसपूजने नवस्वसत्कवित्वं गिरिशेर्पयन्निव ॥ ददर्श लिङ्गे यतिनं नृकेसरी ततः स तच्छिष्यपदं गतो व्यरिः ॥ ७० ॥**

**अन्वयः**—स नित्यवत् गिरिशे मानसपूजने नवस्वसत्कवित्वं अर्पयन्निव लिंगे यतिनं ददर्श । ततः व्यरिः स नृकेसरी शिष्यपदं गतः ॥

**अर्थः**—तो नरकेसरी नित्याप्रमाणें कल्लेश्वराला मानसपूजनांच्या वेळीं आपण नवीन केलेल्या कवित्वाला अर्पण करतांना लिंगावर वसल्याप्रमाणें असलेल्या भगवान् यतीला पाहता झाला. त्यानंतर अभिमानादिक शत्रु गेलेला असा तो नरकेसरी त्या भगवंतांचा शिष्य झाला. ॥ ७० ॥

**एवं विचित्रचरितो विचित्रगुणमण्डितः ॥**
**ततान भगवान् भव्यं नव्यं सेव्यं यशो भुवि ॥ ७१ ॥**

**अन्वयः**—एवं विचित्रचरितः विचित्रगुणमण्डितः भगवान् भव्यं नव्यं सेव्यं यशः भुवि ततान ॥

**अर्थः**—याप्रमाणें विचित्र चरित्रांना करणारा विचित्र गुणांनीं अलंकृत असा तो भगवान् क्षेमकर अशी अपूर्व, सेवा करण्यास योग्य कीर्ति भूमंडलांत वाढविता झाला. ॥ ७१ ॥

**सप्तर्षय इव सप्त प्रियभक्ता आप्तभक्तयः प्राप्ताः ।**
**आप्तं नेतुं स्वगृहान्दीपावल्युत्सवे तमनुरक्ताः ॥ ७२ ॥**

**अन्वयः**—सप्तर्षय इव आप्तभक्तयः सप्त प्रियभक्ताः तं अनुरक्ताः दीपावल्युत्सवे स्वगृहान् आप्तं नेतुं प्राप्ताः ॥

**अर्थः**—सप्तर्षीप्रमाणें असलेले भगवद्विषयीं भक्ति प्राप्त झालेले सात प्रिय भक्त अतिशय प्रेमानें अनुरक्त असलेले, दीपावलीच्या उत्सवाकरितां आपल्या घराकडे भगवंताला नेण्यासाठीं प्राप्त झाले. ॥७२॥

**मद्गृहं चर मद्गृहं चर मद्गृहं चर मद्गृहं मद्गृहं चर मद्गृहं चर मद्गृहं त्विति तद्ग्रहम् ॥ सोऽवधार्य च तान्निवार्य विचार्य कार्यमथार्यवानष्टमूर्तिरुताष्टभक्तहृदिष्टकृत्परिपृष्टवान् ॥ ७३ ॥**

**अन्वयः**—मद्गृहं चर ( सप्तभिः पृथक् पृथक् उक्तं ) इति तद्ग्रहं अवधार्य तान् निवार्य कार्यं विचार्य अथ आर्यवान् अष्टभक्तहृदिष्टकृत् अष्टमूर्तिः सन् परिपृष्टवान् ॥

**अर्थः**—माझ्या घराकडे चला, माझ्या घराकडे चला, असें सातहि भक्त म्हणूं लागले. त्या सातहि लोकांचा आग्रह ऐकून कलह दूर करून भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा, कार्याचा विचार करून आठहि भक्तांच्या अंतःकरणाप्रमाणें इष्ट फल देणारा तो भगवान् अष्टमूर्ति असा देव विचारता झाला. ॥ ७३ ॥

**सप्त यूयं त्वहं केवलस्त्वेकलः सप्तगेहेषु चैकक्षणेऽतोऽनलः॥ एष चैकत्र चैकैकगेहं हि वाऽनीयतामन्यथा स्याद्व्यथा सा वृथा॥ ७४॥**

**अन्वयः—**यूयं तु सप्त अहं तु केवल एकलः अतः सप्तगेहेषु एकक्षणे अनलः अतः एषः एकत्र नीयतां अथवा एकैकगृहं नीयताम् अन्यथा सा व्यथा वृथा स्यात्॥

**अर्थः—**तुम्ही सात आहांत, मी केवळ एकटा आहें. तुम्हां सातहि लोकांच्या घरांत एकाच वेळीं एका उत्सवांत राहणें शक्य नाहीं. म्हणून सातहि लोकांनीं मिळून एके ठिकाणीं कोठें तरी न्या अगर अनुक्रमानें एकेकाचे घरीं न्या, नाहीं तर व्यर्थ मला त्रास होईल. ॥ ७४॥

**अथापि तेषां निरवद्यमाग्रहं महर्विदित्वा रह आह चैककम्। न वाच्यमन्यत्र चरैष्य आलयं तवेत्यगुस्तेऽपि विभुस्तदालयान्॥ ७५॥**

**अन्वयः—**अथ अपि तेषां निरवद्यं आग्रहं महः विदित्वा एकैकं रहः आहूय आह त्वया अन्यत्र न वाच्यं (त्वं) तवालयं चर (अहं) एष्ये इति ते अगुः विभुः अपि तदालयान् जगाम॥

**अर्थः—**तथापि त्यांच्या अनिंद्य अशा आग्रहाला ज्योतिस्वरूपी भगवंतानें जाणून एकेकट्याला एकान्तांत बोलावून म्हणाले, तूं कोणांलाहि बोलूं नकोस. तूं घराकडे जा. तुझ्या घराकडेच येईन, असें सर्वांना सांगितलें. तें ऐकून सगळे आपापले घराकडे गेले. भगवानहि त्यांच्या घराकडे गेले. ॥ ७५॥

**सप्तात्मासौ सप्त गेहानि गत्वा स्थित्वाऽप्यस्मिन्नेवमेकोऽपि भूत्वा॥ अष्टात्मैवं ते विदुः प्राप्तकामाः कार्तिक्यां तं तुष्टुवुर्नष्टकामाः॥ ७६॥**

**अन्वयः**—सप्तात्मा असौ अस्मिन् स्थित्वा अपि सप्त गेहानि गत्वा एवं एकः अपि अष्टात्मा भूत्वा भिक्षां जग्राह । प्राप्तकामाः तं कार्तिक्यां मिलिताः संतः विदुः नष्टकामाः संतः तं तुष्टुवुः ॥

**अर्थः**—सात रूपें धारण करून राहणारा भगवान् हा गाणगापुरांत राहूनहि सातहि लोकांच्या घराकडे जाऊन याप्रमाणें आठ रूपें धारण करून भिक्षा घेता झाला. प्राप्तमनोरथ असे ते भक्त कार्तिकी पौर्णिमेच्या दिवशीं जमलेलें, भगवंताचें हें स्वरूप समजते झाले. त्यानंतर ते नष्टकाम झालेले भगवंताची स्तुति करते झाले. ॥ ७६ ॥

**श्रवणाध्ययनार्थप्रतिषेधात् कुर्वन् गुरोस्तु परिचर्याम् ॥**
**वर्यां मर्यादातो वृषलो वृषलोभ्यगाद्गतिं वर्याम् ॥ ७७ ॥**

**अन्वयः**—श्रवणाध्ययनार्थप्रतिषेधात् मर्यादातः वर्यां गुरोः परिचर्यां कुर्वन् वृषलोभी वृषलः वर्यां गतिं अभ्यगात् ॥

**अर्थः**—शूद्रांना वेद स्मृति इत्यादिकांच्या श्रवणाचा निषेध असल्यामुळें मर्यादेनें श्रेष्ठ अशा गुरूंची नमस्कारादिरूप सेवा करणारा, धर्माची अपेक्षा करणारा, कोणी एक शूद्र मुख्य अशा गतीला (मोक्षाला) प्राप्त झाला. ॥ ७७ ॥

**कण्टकाश्माद्यपाकृत्य प्रत्यहं संगमायनम् ॥**
**व्यधाद्विशदमाधात्किं स्वात्मनोः संगमायनम् ॥ ७८ ॥**

**अन्वयः**—कण्टकाश्मादि अपाकृत्य प्रत्यहं संगमायनं विशदं व्यधात् किं तु स्वात्मनोः संगमायनं व्यधात् ।

**अर्थः**—कांटे, दगड वगैरे प्रतिबंधक वस्तूंना दूर करून रोज संगमाकडचा मार्ग स्वच्छ उत्तम तयार करिता झाला. केवळ संगमाकडचा मार्ग स्वच्छ केला नाहीं तर या सेवेनें जीवात्मा व परमात्मा यांच्या संगमरूप अखंडैकरसरूपी मार्गाला तयार करता झाला. ॥ ७८ ॥

**तं चैकदा प्राह गुरुः किमिच्छसि प्रोचे स चेति त्वमनेन गच्छसि । सोध्वा सुसेव्यो भवदीक्षयाऽभवत्क्षेत्रे फलर्द्धिस्तु तदीक्षको भव ॥ ७९ ॥**

**अन्वयः**—एकदा गुरुः तं प्राह किं इच्छासि इति स प्रोचे त्वं अनेन अध्वना गच्छसि सः सुसेव्यः अस्तु । भवदीक्षया क्षेत्रे फलर्द्धिः अभवत् तदीक्षकः भव ॥

**अर्थः**—एकदा सद्गुरु त्या शूद्राला म्हणाले, हे शूद्रा, 'तूं काय इच्छितोस ?' याप्रमाणें विचारलेला शूद्र म्हणालाः—"हे भगवन्, तूं ज्या मार्गानें जातोस, तो मार्ग तुझ्या सुखाकरितां माझ्याकडून चांगला केला जावा, अशी इच्छा करतों. तुझ्या कृपादृष्टीनें शेतांत धान्यसमृद्धि झाली. तूं त्या धान्यसमृद्धीकडे पाहणारा हो. एकदां माझ्या शेताकडे पाहा."—असें म्हणाला. ॥ ७९ ॥

**तथेति दृष्ट्वा तदजोऽप्यपक्वमुपादिशच्छेत्तुमथाप्यपक्वम् ॥ पत्याऽऽच्छिनद्वारित एव पत्न्या चूर्णोपमानीकृतपादधूल्या ॥ ८० ॥**

**अन्वयः**—तथा इति अजः अपक्वं अपि तत् दृष्ट्वा छेत्तुं उपादिशत् अथ एषः पत्या वारितः चूर्णोपमानीकृतपादधूल्या पत्न्या वारितः अपक्वं अपि तत् क्षेत्रं आच्छिनत् ॥

**अर्थः**—'ठीक आहे,' असें म्हणून भगवंतांनीं अपरिपक्व अशा त्या शेताकडे पाहून धान्य कांपण्याविषयीं सांगितलें. त्यानंतर हा शूद्र शेताच्या मालकांकडून निवारण केला गेलेला व पत्नीच्याकडूनहि पुढें जाऊन कांपण्यास विरोध केला असतांना पाठीमागून जाऊन अपक्व अशा तऱ्हेचें शेतांतील धान्य कांपता झाला. ॥ ८० ॥

**आगच्छन् गुरुरप्यवेक्ष्य तुदितं तं प्राह किं ते कृतं नोक्तं सत्यतया मया स च वचः प्रोचे न चेदं मया।। मौढ्येनापि कृतं त्वया यदुदितं मेऽभीप्सितं तन्मतं श्रुत्वा तद्वदितं तथेत्यपि गुरुर्यातो मठं स्वर्चितम् ॥ ८१ ॥**

**अन्वयः**—गुरुः अपि आगच्छन् तुदितं अवेक्ष्य तं प्राह किं ते कृतं ? मया सत्यतया न उक्तं स वचः प्रोचे। मया मौढ्येन अपि न कृतं यत् त्वया उक्तं तत् मे अभीप्सितं मतं च एवं तद्वदितं श्रुत्वा तथा इति गुरुः स्वर्चितं मठं यातः ॥

**अर्थः**—गुरूनेंहि संगमाकडून जात असतां कांपलेलें क्षेत्र पाहून त्या शूद्राला म्हणाले की,–'हे शूद्रा, तुझ्याकडून हें काम कां केलें गेलें ? मी कांपून टाक असें खऱ्या अर्थानें सांगितलें नव्हतें.' तें ऐकून तो शूद्र म्हणाला,–'मी मूर्खपणानें हें केलें नाहीं. चुकीनेंहि केलें नाहीं. जें तुझ्याकडून बोललें गेलें तें माझें इष्ट आहे व मान्य आहे.' असें बोललेलें ऐकून भगवान् " तथास्तु " असें बोलून शिष्यानें उत्तम पूजिलेल्या मठाकडे जाते झाले. ॥ ८१ ॥

**मूलं यातेंऽशुमालौ जलमुगलमपो मुक्तवान् तेन तत्र क्षेत्रे छिन्नेऽप्यनेके वरगुरुकृपया त्वङ्कुराः प्रादुरासन् ॥ शूद्री दृष्ट्वाऽनुतप्ता तमु शरणमिता सोऽमुयाऽभ्यर्च्य देवं धान्यं लेभेऽमितं द्राग्गुरुपदमपि यद्गोत्रमद्यापि धन्यम् ॥ ८२ ॥**

**अन्वयः**—अंशुमालौ मूलं याते सति जलमुक् अपः अलं मुक्तवान् तेन तत्र क्षेत्रे वरगुरुकृपया अंकुराः प्रादुरासन् । शूद्री दृष्ट्वा अनुतप्ता तं शरणं इता स अमुया सह देवं अभ्यर्च्य अमितं धान्यं लेभे। द्राक् गुरुपदं लेभे ! अद्यापि यद्गोत्रं धन्यम् ॥

**अर्थ:**—सूर्य मूळ नक्षत्रावर आला असतां ढगानें खूप पाणी टाकलें. त्यामुळें कांपलेलें शेतांत श्रेष्ठ गुरुकृपेनें अनेक अंकुर उत्पन्न झाले. त्यांना पाहून त्या शूद्राची भार्या अनुताप झालेली त्याच पतीला शरण गेली. तो शूद्र या भार्येसह येऊन भगवंताची पूजा करून अपरिमित धान्य मिळविता झाला, आणि लवकरच मोक्षाला प्राप्त करून घेता झाला. अद्यापि गुरुप्रसादामुळें त्याचें कुल अत्यंत धन्य असें आहे.॥८२॥

**काश्यादिक्षेत्रमुल्लंघ्य तस्थावत्राजितः कुतः ॥**
**इति पृष्टः स तेनाऽसौ क्षेत्रमाहात्म्यमादिशत् ॥ ८३ ॥**

**अन्वयः**—काश्यादिक्षेत्रं उल्लंघ्य अजितः अत्र कुतः तस्थौ इति तेन पृष्टः स असौ क्षेत्रमाहात्म्यं आदिशत् ॥

**अर्थ:**—भगवान् हा काश्यादि क्षेत्रांना सोडून या गाणगापुरांत कां राहिला ? याप्रमाणें नामधारकाकडून विचारलेला हा सिद्ध क्षेत्रमाहात्म्य सांगता झाला. ॥ ८३ ॥

**जालंधरासुरहतामृतजीवनार्थं शर्वार्पितामृतघटश्च्युत इन्द्रहस्तात् ॥ जाता ततोऽप्यमरजेति जगत्प्रतीता कालांतभीतिदुरितांतकरी परीता ॥ ८४ ॥**

**अन्वयः**—जालंधरासुरहतामृतजीवनार्थं शर्वार्पितामृतघटः इंद्रहस्तात् च्युतः ततः कालान्तभीतिदुरितान्तकरी परीता जगत्प्रतीता अमरजा इति जाता ॥

**अर्थ:**—जालंधरासुराकडून हत झालेल्या देवांना सजीव करण्याकरितां शंकरानें दिलेला अमृतघट इंद्राच्या हातांतून निसटला. त्यापासून कालमृत्यूची भीति आणि पाप यांचा नाश करणारी आणि आजूबाजूंनीं वाहणारी जगांत प्रसिद्ध असलेली अमरजा नदी झाली. ॥ ८४ ॥

**गङ्गयाऽर्कतनया यथा तथा भीमयाऽप्यमरजाऽत्र संगता ॥**
**अष्टतीर्थयुतसंगमोऽघहृत्स्यात्प्रयाग इव सर्वकर्महृत् ॥८५॥**

**अन्वयः**—यथा गंगया अर्कतनया संगता तथा भीमया अपि अमरजा संगता अष्टतीर्थयुतसंगमः अघहृत् सर्वकर्महृत् प्रयागः इव स्यात्।

**अर्थः**—ज्याप्रमाणें गंगेशीं यमुना मिळाली, त्याप्रमाणें भीमा नदीस अमरजा नदीहि येथें मिळाली आहे. हा आठतीर्थयुक्त संगम पापहारी व सर्वदुष्कर्म हरण करणारा प्रयागतीर्थाप्रमाणें आहे. ॥ ८५ ॥

**इच्छासंतोषतीर्थे अभिमतफलदे विश्वनाथोऽयमग्रे जीवन्मुक्तोऽत्र शैवो जड इव विचरन् दर्शयामास काशीम् ॥ कल्पद्रुवत्थमूले कलुषहृदिह सा नष्टकुष्ठा स्वसाऽभूद्रत्नाख्या कोटितीर्थं हरपदिह गया द्वार्वती चक्रतीर्थम् ॥ ८६ ॥**

**अन्वयः**—अभिमतफलदे इच्छासंतोषतीर्थे स्तः अग्रे अयं विश्वनाथः अत्र जीवन्मुक्तः (कश्चित्) शैवः जड इव विचरन् कल्पद्रुवत्थमूले (बंधुभ्यः) काशीं दर्शयामास। ततः कलुषहृत् अस्ति इह रत्नाख्या स्वसा नष्टकुष्ठा अभूत् ततः कोटितीर्थं ततः हरपत् इह गया अस्ति चक्रतीर्थं द्वार्वती॥

**अर्थः**—त्यानंतर इच्छातीर्थ आणि त्यापुढें संतोषतीर्थ ही दोन्हीं अभिमत फल देणारीं आहेत. त्यांच्या पुढें हा विश्वनाथ आहे. या ठिकाणीं एक जीवन्मुक्त शैव खुळ्याप्रमाणें फिरणारा अश्वत्थमूलाजवळ आपल्या बंधूंना काशी दाखविता झाला. त्याच्यापुढें पापविनाशी तीर्थ आहे. या तीर्थांत जी पूर्वी सांगितलेली रत्ना नांवाची बहीण ती नष्टकुष्ट झाली त्याच्यापुढें कोटितीर्थ, त्यांच्यापुढें रुद्रपादतीर्थ हीच गया जाणावी. त्यापुढें असणारे चक्रतीर्थ—ती द्वारका होय. याप्रमाणें आठ तीर्थे समजावींत. ॥ ८६ ॥

**एवमादीनि तीर्थानि पावनानि प्रकाशयन् ॥**
**तस्थाविहैव भगवान्म्लेञ्च्छमुद्धृत्य योगवान् ॥ ८७ ॥**

**अन्वयः**—एवमादीनि तीर्थानि पावनानि प्रकाशयन् योगवान् भगवान् म्लेञ्च्छं उध्दृत्य इहैव तस्थौ ॥

**अर्थः**—याप्रमाणें पवित्र अशा तीर्थांना प्रकट करून येथेंच योगसामर्थ्यसंपन्न भगवान् म्लेंछाचा उद्धार करून राहिले. ॥ ८७ ॥

**भगवन् हीनसंभूतः को म्लेञ्च्छः कथमुद्धृतः ॥**
**एवं द्विजेन संपृष्टस्तुष्टः स उपदिष्टवान् ॥ ८८ ॥**

**अन्वयः**—भगवन् हीनसंभूतः म्लेञ्च्छः कः कथं समुद्धृतः एवं द्विजेन संपृष्टः सः तुष्टः उपदिष्टवान् ॥

**अर्थः**—नामधारक ब्राह्मणांकडून—हे भगवन् हीन जातींत उत्पन्न झालेला कोण तो म्लेंछ कसा उद्धरला गेला असें विचारला गेलेला सिद्ध संतुष्ट होऊन सांगता झाला. ॥ ८८ ॥

**कृष्णातीरे कुरुपुरे सेवको रजकोऽभवत् ॥**
**श्रीपदो विपदो हर्तुर्वरं तस्मै स दत्तवान् ॥ ८९ ॥**

**अन्वयः**—कृष्णातीरे कुरुपुरे विपद्दः हर्तुः श्रीपदः रजकः सेवकः अभवत् तस्मै स वरं दत्तवान् ॥

**अर्थः**—कृष्णातीरीं कुरवपुरामध्यें आपत्ति दूर करणाऱ्या श्रीपादवल्लभांचा एक परीट सेवक होता. त्याला श्रीपादश्रीवल्लभांनीं राज्यप्रातीरूप वर दिला. ॥ ८९ ॥

**भवान्तरे म्लेञ्च्छकुलेऽभवत्स क्षमापतिः सन्मतिरात्तनीतिः।**
**प्राक्संस्कृतिप्राप्तसुरद्विजातिभक्तिर्निजज्ञातिसुशिक्षितोऽपि ।९०।**

**अन्वयः**—भवान्तरे म्लेञ्च्छस्य कुले सन्मतिः आत्तनीतिः निजज्ञातिसुशिक्षितः अपि प्राक्संस्कृतिप्राप्तसुरद्विजातिभक्तिः क्षमापतिः अभवत् ॥

**अर्थः**—जन्मांतरीं म्लेंछ कुलांत चांगल्या बुद्धीचा आपल्या ज्ञातिबंधूंनीं युक्त होऊन त्यांच्याकडून स्वधर्माचें शिक्षण दिलें असतांहि पूर्व

संस्कारानें देवद्विजांच्या बाबतींत अतिशय भक्ति असलेला असा तो म्लेंच्छ राजा झाला. ॥ ९० ॥

**वक्त्राद्यैर्देहसाम्येऽपि कथमवयवैर्वर्णभेदो विभेदो देवत्वं मृच्छिलादौ कथमिति स पतिर्ज्ञातिपृष्टः स्म वक्ति ॥ धीमान्द्यं वोद एते गुणचरणभिदा देवसृष्टास्त्वनादिर्वेदः सत्यः स्मृतिश्च प्रभुरिह भजतामस्ति सर्वत्र पूर्णः ॥ ९१ ॥**

**अन्वयः**—वक्त्राद्यैः अवयवैः देहसाम्ये अपि विभेदः वर्णभेदः कथं? मृच्छिलादौ देवत्वं कथं? इति ज्ञातिपृष्टः पतिः वक्ति स्म। वः अदः धीमान्द्यं एते गुणचरणभिदा देवसृष्टाः वेदः अनादिः सत्यः स्मृतिः (सत्या) इह भजतां प्रभुः सर्वत्र पूर्णः अस्ति ॥

**अर्थः**—हात पाय तोंड अवयवानें सर्वांच्या देहांत साम्य असतांहि ब्राम्हणादि जातिभेद वर्णभेद कसा आणि माती शिला इत्यादि जड पदार्थांत देवभाव कसा? याप्रमाणें स्वज्ञातीकडून विचारलेला तो राजा म्हणाला कीं, 'हे जातभाई हो, हें तुमचें बुद्धिमांद्य आहे. कारण हे ब्राह्मणादिक चार वर्ण गुणकर्मविभागानें ईश्वराकडून रचिले गेले आहेत. तत्प्रतिपादक वेद अनादि, अपौरुषेय म्हणून सत्य व स्वतः प्रमाणभूत असा आहे. आणि वेदानुसारी स्मृति ही सत्य आहे. येथें सेवा करणाऱ्यांना सर्वत्र माती, शिला इत्यादिकांत पूर्ण असा प्रभू आहे. ॥ ९१ ॥

**श्रुतिस्मृती निश्चित ईश्वराज्ञे राज्ञेह नीतिर्विहिता यथाऽज्ञा ॥ भवेदलंघ्याऽपि तथैव लोके लोकेश्वराज्ञे निहिते किलाज्ञे ॥ ९२ ॥**

**अन्वयः**—श्रुतिस्मृती ईश्वराज्ञे निश्चिते यथा इह राज्ञा नीतिः विहिता सा आज्ञा अलंघ्या भवेत्। तथैव अज्ञे लोके लोकेश्वराज्ञे निहिते एव किल ॥

**अर्थः**—श्रुति स्मृति या ईश्वराच्या आज्ञा निश्चित आहेत. ज्याप्रमाणें इहलोकांत राजांनीं केलेली नीति ( कायदे ) जसे त्या राज्यांत असणाऱ्या लोकांना पाळावे लागतात, तसेंच तत्त्वज्ञान नसलेल्या लोकांत श्रुतिस्मृतिरूप देवाच्या आज्ञा अनुल्लंघ्य आहेत. ॥ ९२ ॥

**तस्मादस्यानसूयामुखमकदमदः संविहायाऽऽश्रयंतु भक्त्येत्यूचे स चेशः स्वयमभजदिमान्भूसुरांस्तत्सुरांश्च ॥ तस्याप्येवं सतोऽभूदनिशमसुखदः स्फोटकोङ्के स तेन क्लिष्टोऽनिष्टेन शिष्टक्षितिसुरमवरः पृच्छति स्मास्य शान्तिं ॥ ९३ ॥**

**अन्वयः**—तस्मात् अकदं अदः असूयामुखं संविहाय अस्मान् भक्त्या आश्रयंतु इति स च ईशः ऊचे स्वयं अपि भूसुरान् तत्सुरान् च अभजत् एवं सतः अपि तस्य अंके स्फोटकः अभूत् स तेन अनिष्टेन क्लिष्टः अवरः शिष्टक्षितिसुरं अस्य शान्तिं पृच्छति स्म ॥

**अर्थः**—ज्या अर्थी असें आहे त्या अर्थी तुम्ही दुःख देणाऱ्या असूया वगैरे टांकून या ब्राह्मणादिकांचा भक्तीनें आश्रय करा. याप्रमाणें तो राजा बोलला, व आपणहि ब्राह्मणांची आणि त्यांच्या हरिहरादिदेवांची सेवा करता झाला. असें असलेल्या त्याच्या मांडीवर अतिशय दुःख देणारा फोड झाला. त्या अनिष्टकारक विस्फोटकानें अतिशय त्रासलेला यवनराजा शिष्ट अशा ब्राह्मणांना त्या विस्फोटकाच्या उपशमासंबंधीं विचारता झाला. ९३

**जनापवादात्स च विप्रवर्यो भीतोऽघहृन्नामकतीर्थदेशे ॥ तस्मै रहः प्राह दशार्णराजस्त्रीपुत्रकष्टं त्वृषभप्रसादम् ॥ ९४ ॥**

**अन्वयः**—जनापवादात् भीतः सः विप्रवर्यः अघहृन्नामकतीर्थदेशे रहः तस्मै दशार्णराजस्त्रीपुत्रकष्टं तु ऋषभप्रसादं च आह ॥

**अर्थः**—तो विचारलेला ब्राह्मण जनापवादामुळें भ्यालेला, पापविनाशी तीर्थप्रदेशांत एकान्ती त्या राजाला मात्सर्यानें सपत्नीनें दिलेल्या

सर्पगरळामुळें उत्पन्न झालेलें दशार्णराजाच्या स्त्रीपुत्रादिकांचें दुःख आणि मृतपुत्राचें पुनर्जीवनरूप ऋषभाचा प्रसाद सांगता झाला. ॥९४॥

**मृतस्यापि भद्रायुषो जीवनं तत्समाकर्ण्य स प्राह नाहं हि वेद्मि ॥ कुहेदृङ् महासाधुरास्ते नमस्ते समस्तेष्टकृच्छंस मे दीनबंधो ॥ ९५ ॥**

**अन्वयः**—तत् मृतस्य अपि भद्रायुषः जीवनं समाकर्ण्य स प्राह। ईदृक् महासाधुः कुह अस्ति? अहं न वेद्मि। ते नमः समस्तेष्टकृत् दीनबंधो तं मे शंस ॥

**अर्थः**—त्या मृत अशा भद्रायूचें पुनर्जीवन ऐकून राजा म्हणाला:- 'असा महासाधु कोठें आहे तें मला माहीत नाहीं. हे ब्रह्मन्, तुला नमस्कार असो. हे सर्व अपेक्षा पूर्ण करणाऱ्या दीनबंधो, हे ब्रह्मन्, तो कोण साधु आहे तें मला सांगा.' ॥ ९५ ॥

**स प्राह गंधर्वपुरेऽस्ति साधुर्म्लेञ्च्छोभिपूज्यापि च तं स साधु ॥ क्षेत्रं ययौ षड्बलयुक् तरस्वी ददर्श देवं स गुरुं मनस्वी ॥ ९६ ॥**

**अन्वयः**—स प्राह गंधर्वपुरे साधुः अस्ति सः म्लेञ्च्छः तं साधु अभिपूज्य षड्बलयुक् तरस्वी क्षेत्रं ययौ मनस्वी सः देवं गुरुं ददर्श ॥

**अर्थः**—तो ब्राह्मण त्या राजाला म्हणाला, 'गाणगापुरांत साधु आहेत.' तें ऐकून तो म्लेंच्छ राजा त्या ब्राह्मणाची उत्तमप्रकारें पूजा करून षडंग सैन्य घेऊन त्वरित गतीनें गंधर्वपुराला आला. प्रशस्त मनाच्या त्या राजानें देवाचें व गुरूंचें दर्शन घेतलें. ॥ ९६ ॥

**दृष्ट्वा तं गुरुराह रे रजक किं हृष्टोऽसि मां नागतः कस्मादित्यवधार्य हृष्टहृदयस्तं प्राह लब्धस्मृतिः ॥ स्वामिन्मां रजकं स्वसेवकमकप्राये भवाब्धौ प्रभो कस्मात्पातयसि प्रियं कमनयं प्रागाचरं वेद्मि नो ॥ ९७ ॥**

**अन्वयः**—तं दृष्ट्वा गुरुः आह रे रजक ! त्वं हृष्टोसि किं ? कस्मात् मां न आगतः ? इति अवधार्य हृष्टहृदयः लब्धस्मृतिः सन् तं प्राह । स्वामिन् ! प्रियं रजकं मां स्वसेवकं अकप्राये भवाब्धौ कस्मात्पातयसि ? प्रभो ! प्राक् कं अनयं आचरं नो वेद्मि ॥

**अर्थः**—त्या म्लेंच्छ राजाला पाहून भगवान् गुरु म्हणाले:- 'हे रजका, तूं आनंदांत होतास काय ? तूं इतका काल काय म्हणून माझ्याकडे आला नाहींस ? सांग.' याप्रमाणें भगवद्वाक्य ऐकून हर्षयुक्त अंतःकरणाचा राजा पूर्वीची आठवण झालेला असा, भगवंताला म्हणालाः—' भो स्वामिन् , आपल्या प्रिय सेवकाला (रजकाला) दुःखप्राय भवसागरांत कां म्हणून पाडतां ? पूर्वींच्या अन्यायामुळें असें जर म्हणाल तर पूर्वींचा अन्याय तरी काय घडला आहे हें मी जाणत नाहीं. ॥ ९७ ॥

**सती पतिवियोगेन प्राणेश्वर यथा तथा ॥**
**भगवन् त्वद्वियोगेन सदा दुःखातुरोऽभवम् ॥ ९८ ॥**

**अन्वयः**—सती पतिवियोगेन यथा तथा प्राणेश्वर त्वद्वियोगेन सदा दुःखातुरः अभवम् ॥

**अर्थः**—'हे प्राणेश्वर भगवन्-पतिव्रता स्त्री पतिवियोगानें ज्याप्रमाणें दुःखातुर होते, तद्वत् तुझ्या वियोगानें सदा दुःखातुर झालों आहें.॥९८॥

**दिष्ट्या स्फोटकदुर्निमित्तत इदं जातं भवद्दर्शनं श्रीशः प्राह कुहास्ति दर्शय स तं सन्तं निजाङ्के स्थितम् ॥ नापश्यत्स सुविस्मितोऽथ बहुशस्तं प्रार्थ्य निन्येऽर्थितः पूर्वं पापविनाशतीर्थमगमत्प्राङ् नागनाथार्चितः ॥९९॥**

**अन्वयः**—स्फोटकदुर्निमित्ततः इदं भवद्दर्शनं जातं । एतत् दिष्ट्या जातं । श्रीशः प्राह । कुह अस्ति तं दर्शय ? स निजांके स्थितं सन्तं तं न

अपश्यत् । सुविस्मितः तं बहुशः प्रार्थ्य स्वराष्ट्रं निन्ये अर्थितः पूर्वं नागनाथार्चितः पापविनाशितीर्थं अगमत् ।

**अर्थः**—'या फोडाच्या दुर्निमित्तानें हें आपलें दर्शन झालें हें माझ्या सुदैवानें फार चांगलें झालें.' भगवान् म्हणाले:–' फोड कोठें आहे मला दाखीव.' तेव्हां तो राजा आपल्या मांडीवर असलेल्याहि फोडाला पाहता झाला नाहीं. नंतर अत्यंत विस्मित झालेला राजा त्या भगवंताला पुष्कळ प्रार्थना करून आपल्या राष्ट्राला नेता झाला. त्या राजाकडून प्रार्थना केले गेलेले भगवान् पुढें जाऊन अगोदर सायंदेवाचा मुलगा नागनाथ याचेकडून पूजा घेतलेला व भोजन घेतलेला असा होऊन राजा येण्याचे अगोदर पापविनाशी तीर्थावर आला. ॥ ९९ ॥

**राजा स्वैर्निन्दितोऽपि प्रभुमपि पदगः पालकस्थं द्विजेड्यं नीत्वा वाद्यादिघोषैः पुरमतिमुदितोऽन्तःपुरे भद्रपीठे । स्वास्तीर्णे चोपवेश्य स्वविभवमखिलं दर्शयामास तस्मै दत्त्वाऽजो भक्तिमाप्तः स्वमठमिति जगौ पृच्छते सिद्ध एतत् ॥ १०० ॥**

**अन्वयः**—राजा स्वैः निंदितः अपि स्वयं पदगः प्रभुं पालकस्थं द्विजेड्यं वाद्यादिघोषैः पुरं नीत्वा अतिमुदितः अन्तःपुरे स्वास्तीर्णे भद्रपीठे उपवेश्य अखिलं स्वविभवं दर्शयामास । तस्मै अजः भक्तिं दत्त्वा स्वमठं आप्तः इति पृच्छते एतत् सिद्धः जगौ ॥

**अर्थः**—राजा आपल्या ज्ञातिबंधूंकडून निंदित, स्वतः पायानें चालणारा असाहि होऊन पालखींत बसलेल्या, ब्राह्मणांच्याकडून स्तुति केल्या जाणाऱ्या भगवंताला वाद्यादिघोषपूर्वक नगराकडे नेऊन स्वतः अत्यंत आनंदित झालेला अंतःपुरांत आपण स्वतः घातलेल्या सिंहासनावर भगवंताला बसवून आपलें सर्व ऐश्वर्य दाखविता झाला. भगवंतानें त्या राजाला आपली भक्ति देऊन आपल्या मठाकडे येणें केलें. हें विचारणाऱ्या नामधारकाला सिद्धांनीं सांगितलें. ॥ १०० ॥

**सदानन्दति विद्वत्वात्सर्वदाऽति विभुत्वतः ॥**
**मृत्युंजयति योगित्वाद्यः स मे हृदि तिष्ठतु ॥ १०१ ॥**

**अन्वयः**—यः विद्वत्वात् सदानंदति । विभुत्वात् सर्वदा अति योगित्वात् मृत्युंजयति सः मे हृदि तिष्ठतु ॥

**अर्थः**—जो भगवान् ब्रह्मज्ञ असल्यानें सदानंद ब्रह्मदेवाप्रमाणें आहे, सर्वदा व्यापक असल्यामुळें वासुदेवाप्रमाणें आहे आणि योगीपणामुळें मृत्युंजय शंकरासारखा आहे तो भगवान् माझ्या हृदयांत राहो. १११

**वन्देऽहं देवदेवं धृतिमतिगतिदं साङ्गयोगप्रगम्यं पारावाराभरागाद्यरिकरिहरिमाह्लादकं दत्तदक्षम्॥ तं यज्ञं यज्वयज्ञं सुरवरपरदं पारदं रम्यरम्यं पातारं तारतारं खलबलदलनं श्रीवरं वक्रवक्रम् ॥ १०२ ॥**

**अन्वयः**—देवदेवं धृतिमतिगतिदं सांगयोगप्रगम्यं पारावाराभरागाद्यरिकरिहरिं आल्हादकं दत्तदक्षं ज्ञेयज्ञं यज्वयज्ञं सुरवरपरदं पारदं रम्यरम्यं पातारं तारतारं खलबलदलनं श्रीवरं वक्रवक्रं तं देवं अहं वन्दे ॥

**अर्थः**—प्रकाशकत्वामुळें सूर्यादि देवांचा चक्षुरादि इंद्रियांचा देव असा असलेल्या धैर्य, बुद्धि ज्ञान देणाऱ्या अष्टांग योगानें समजण्यास योग्य असलेल्या समुद्राप्रमाणें दुष्पार व अगाध असलेले जे रागादिक शत्रु आहेत तत्स्वरूपी हत्तींना सिंहाप्रमाणें घातक अशा, भक्तांना आल्हादक अशा, दानदक्ष अशा, ज्ञेय अशा स्वरूपाला जाणणाऱ्या, विधीनें याग करणाऱ्यांच्या यज्ञरूपांत असलेल्या, इंद्रादि देवांना परमपद देणाऱ्या अतिरम्य अशा आपल्या सेवकांचें रक्षण करणाऱ्या, यतींना प्रणवानें रक्षण करणाऱ्या, दुर्जनांचें बल खंडण करणाऱ्या, त्या लक्ष्मीपतीला अथवा मोक्षलक्ष्मीविलासाला कुटिल लोकांना कुटिल असा असलेल्या अशा भगवंताला मी नमस्कार करतों. ॥ १०२ ॥

**वनजतु स तु वनजतु स तु यदि वा सुरवरतु स तु नरवरतु स तु वा ॥ निजचरणशरणतरणचरणकृद्य उ महितमहिमयुगिह तमु नुमः ॥ १०३ ॥**

**अन्वयः**—सः वनजतु । सः वनजतु । यदि वा सः सुरवरतु । सः नरवरतु वा यः उ निजचरणशरणतरणचरणकृत् महितमहिमयुक् इह लोके वर्तते तं उ नुमः ॥

**अर्थः**—तो भगवान मत्स्यावतार वा कूर्मावतार धारण करो अथवा सुरश्रेष्ठ वामनाचा अवतार धारण करो किंवा राम, कृष्ण, बुद्ध, कलंकी आदि मानवी अवतार धारण करो. पण जो आपल्या चरणांचा आश्रय केलेल्या भक्तांच्या उद्धारांत नेहमीं रत असतो आणि जो दिव्य ऐश्वर्यवान् आहे, त्यालाच आम्ही नमस्कार करितों. ॥ १०३ ॥

**दत्तं यो भजते नित्यं मुक्तिमेति न संशयः ॥**
**वित्तं यो भजतेऽनित्यं भुक्तिमेति न संशयः॥ १०४ ॥**

**अन्वयः**—यः नित्यं दत्तं भजते सः मुक्तिम् एति । अत्र संशयः न यः अनित्यं वित्तं भजते सः भुक्तिम् एति । अत्र न संशयः ॥

**अर्थः**—जो अविनाशी असलेल्या दत्ताची उपासना करतो, तो मोक्षाप्रत पावतो. आणि जो विनाशी असलेल्या द्रव्याची सेवा करतो म्हणजेच जन्मभर जो द्रव्य मिळविण्यासाठींच धडपडत असतो, तो ह्या जन्ममरणरूप संसाराच्या फेऱ्यांत सांपडतो. ह्याविषयीं अणुमात्र संशय नाहीं. ॥ १०४ ॥

**सा का र ता ता र का सा**
**का पि सा र र सा ऽऽ पि का ॥**
**र सा य मे मे य सा र**
**ता र मे य य मे र ता ॥ १०५ ॥**

(सर्वतोभद्रः)

**अन्वयः**—हे अमेय ! सारतारमेय ! तारका साररसापिका सा का अपि साकारता मे रसाय भवतु ॥

**अर्थः**—हे भगवन्, तूं प्रत्यक्षादि प्रमाणांनीं जरी अगम्य आहेस तथापि वेदांचा सारभूत जो ओंकार ( प्रणव ) त्याच्या उपासनेनें तुझें ज्ञान होऊं शकतें. हे ईश्वरा, दत्तात्रेया, तुझीं तीं द्विभुज षड्भुज चतुर्भुज आदि वेदपुराणांमध्यें प्रसिद्ध असलेलीं आणि सर्वसारभूत भक्ताला आनन्द देणारीं, त्याचप्रमाणें भक्ताला भवसागरापासून तारणारीं तुझीं सर्व सगुणरूपें मला परमानन्द देवोत. ॥ १०९ ॥

अ व रं श्री व रं वं दे ऽ
श्री व रं श्री क रं व दे ॥
दे व रं श्री ध रं स न्तं
नृ व रं श्री प रं स तं ॥ १०६ ॥

(मुरजबंध.)

**अन्वयः**—अश्रीवरं देवरं सन्तं सतं नृवरं श्रीपरं अवरं श्रीवरं श्रीकरं श्रीधरं वन्दे वदे च ॥

**अर्थः**—अज्ञान दूर करणाऱ्या, देवांना, स्वपदाची प्राप्ति करून देणाऱ्या—अथवा—इन्द्रादि देवांनासुद्धां ज्याची भीति वाटते अशा, ब्रह्मरूप असणाऱ्या अथवा—तीनहि कालांमध्यें—अबाधित आणि पूजनीय किंवा भक्ताच्या कामक्रोधादि विकारांचा नाश करणाऱ्या अशा, श्रीपादश्रीवल्लभश्रीनृसिंहसरस्वतीरूपानें अवतार धारण करणाऱ्या—असें असूनहि वेदांनासुद्धां ज्याचें यथार्थ स्वरूप कळत नाहीं—अशा, म्हणूनच ज्यापेक्षां कांहीं दुसरें श्रेष्ठ नाहीं, अर्थात्—श्रेष्ठतेची परमावधि असलेल्या सरस्वतीचा पति ब्रह्मा, लक्ष्मीचा स्त्री म्हणून स्वीकार करणारा—विष्णु, व हालाहल विषाची शोभा धारण करणारा शंकर—अशा ब्रह्मा-विष्णु-महेशस्वरूप

असणाऱ्या भगवान् दत्तात्रेयाला मी नमस्कार करतों, व त्याची स्तुतीहि करतों. ॥ १०६ ॥

( पं. श्रीपादशास्त्री तापस यांची टीका )

**अवरं श्रीवरं वन्देऽश्रीवरं श्रीकरं वदे ।**
**देवरं श्रीधरं सन्तं नृवरं श्रीपरं सतम् ॥**

**अन्वयः**—अश्रीवरं देवरं सन्तं सतं नृवरं श्रीपरम् अवरं श्रीवरं श्रीकरं श्रीधरं वन्दे वदे ( च ) ।

अश्रियम् अज्ञानं वरति वारयतीति अश्रीवरः तम् । ' अहमज्ञानजं तमः । नाशयामि ' इति स्मृतेः । ' वृञ् आवरणे ' इति चुरादिषु आधृषीयेषु पठयते । देवेभ्यो निजपदं रातीति ( ददातीति ) देवरः तम् । '–भगवता स्वपदं प्रवेशिता देवता अद्यापि तं भगवन्तं भजन्ते ' इति श्रीदत्तचम्पूक्तेः । ' चतुर्थी ' इति योगविभागात्समासः । अथवा देवानामिन्द्रादीनामपि रः रलयोरभेदात् लः भयस्वरूपः तम् । ' भीषास्माद्वातः पवते । भीषोदेति सूर्यः । भीषास्मादग्निश्चेन्द्रश्च–' इत्यादिश्रुतेः । '–लश्च भूमौ भये चाल्हादनेऽपि च ' इत्येकाक्षरात् । सन्तं ब्रह्मज्ञस्वरूपम् । ' अस्ति ब्रम्हेति चेद्वेद । सन्तमेनं ततो विदुः–' इति श्रुतेः । यद्वा सन्तं त्रिकालाबाध्यम् पूज्यं वा । 'सत्ये शाधौ विद्यमाने प्रशस्तेऽभ्यर्हिते च सत्' इत्यमरः । ' सः कोपे वरणे–' इत्येकाक्षरकोशात् ' स ' पदार्थः क्रोधः । उपलक्षणात्कामादयोऽपि । तेषां ' तः ' चोरः तम् । भक्तकामक्रोधादिनाशकमित्यर्थः । ' तावद्रागादयः......यावत्कृष्ण न ते जनाः ' इति श्रीमद्भागवतात् । ' तकारः कीर्तितश्चोरे ' इत्येकाक्षरकोशः । नृवरं पुरुषश्रेष्ठम् । श्रीपादश्रीवल्लभनरसिंहसरस्वत्यादिपुण्यपुरुषरूपेणावतीर्णमित्यर्थः । एवं यथाशक्तिवर्णनेऽपि वस्तुतः श्रीपरं श्रिया वेदत्रय्या अपि परं परतो वर्तमानम् । तस्या अगोचरमित्यर्थः । ' ऋचो यजूꣳषि सामानि । सा हि श्रीरमृता सताम् ' इति, ' अथात आदेशो नेति नेति ' इति, ' यतो वाचो निवर्तन्ते ' इति च श्रुतिभ्यः । अत एव अवरं नास्ति वरः श्रेष्ठो

यस्मात्सः अवरः तम्। श्रेष्ठतायाः परमावधिभूतमित्यर्थः। 'न त्वत्समोऽस्त्य भ्यधिकः कुतोऽन्यः?' इति स्मृतेः। ईदृशं, 'श्रीवरं श्रीकरं श्रीधरं' ब्रह्मविष्णुमहेशात्मकं दत्तं वन्दे नमस्करोमि। श्रियाः सरस्वत्या वरो वल्लभो ब्रह्मा। श्रियं करोति लक्ष्मीं पत्नीत्वेन स्वीकरोतीति श्रीकरो विष्णुः। (भक्तेभ्योऽविलम्बेन दानाय) श्रीः करेषु यस्य स इति वा। 'अनन्तहस्तैः कमलावरेण दत्तं किमादत्त करद्वयेन' इत्यभियुक्तोक्तेः। श्रियं हालाहलविष-शोभां (कण्ठे) धरतीति श्रीधरो महेश्वरः। (तमेव दत्तं) वदे स्तौमि च। चुरादेर्वदधातोराधृषीयत्वाण्णिजभावपक्षे रूपमिदम्। 'सतम्' इत्यत्र 'सः तम्' इति पदद्वयं वा। तं प्रसिद्धम्। सः तत्स्वरूपी (दत्तस्वरूपी) अहं वन्दे इति 'अहं' पदमध्याहृत्य योजना। 'ब्रह्मविद्ब्रह्मैव भवति' इति श्रुतेः। 'दासोऽहमिति या बुद्धिः पूर्वमासीज्जनार्दने। 'दा' कारोऽपहृत-स्तेन गोपीवस्त्रापहारिणा॥' इति अभियुक्तोक्तेश्चेत्यलं विस्तरेण॥

**दासपं गतिदं वन्देऽत्रिजं चारुहितं वृतम्॥**
**तं वृतं हि रुचाऽजं त्रिदेवं दंतिगपं सदा॥ १०७॥**

**अन्वयः**—दासपं गतिदं, चारुहितं भक्तैः प्रेम्णा वृतं रुचा वृतं दन्तिगपं त्रिदेवम् अजम् अपि अत्रिजम् अहं सदा वन्दे॥

**अर्थः**—भक्तांचें पालन करणारा, भक्तांना मुक्ति देणारा, मोक्षांमध्यें पर्यवसान पावणारें हित करणारा, भक्तांनीं प्रेमपाशांनीं बांधलेला, व ज्याच्याभोंवतीं दिव्य तेजोवलय आहे, आणि ज्यानें सहस्रार्जुनादि राजांचें पालन केलें, त्या भूलोक, भुवर्लोक व स्वर्गलोक या तिन्ही लोकांना प्रकाश देणाऱ्या अजन्मा असूनसुद्धां भक्तानुग्रहासाठीं अत्रिऋषीपासून झालेल्या दत्तात्रेयाला मी प्रणाम करितों. ॥ १०७॥

[ तृतीय शतक समाप्त ]

---

॥ श्री गुरु देव दत्त ॥

# श्रीदत्तचम्पूः प्रारभ्यते

## [ प्रथम स्तबक ]

श्रीपादश्रीवल्लभश्रीनृसिंहसरस्वतीदत्तात्रेयचरणारविंदाभ्यां नमः ।

श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामिचरणकमलाभ्यां नमः ॥

**वासुदेवयतिपादपंकजं चिंतयन् हृदि विभाव्य तत्कृतिम् ।**
**प्रार्थयामि दयया प्रपूरितं तत्कृतेर्विवरणार्थमादरात् ॥ १ ॥**

**बालोऽयं किं कुर्याद्व्याख्यां ग्रंथस्य दुरवबोधस्य ।**
**इति मनसि च मा कुर्याद्युष्मत्कृपयाह्यसंभवं किं मे ॥२॥**

**चरितं दत्तचम्प्वाख्यं वासुदेवैर्विनिर्मितम् ।**
**कुर्वे विवरणं तस्य महाराष्ट्रगिरा मुदा ॥ ३ ॥**

( १ )

**अन्वयार्थः**—( स्मृतोऽपि ) स्मरण केले असतां सुद्धां ( विघ्नं-निघ्नन् ) विघ्नाचा नाश करणारा असा ( यः ) जो ( अवति ) भक्तांचें रक्षण करतो ( सः ) तो ( गंधर्वस्थः ) घोडयावर बसलेला अथवा गाणगापुरांत असणारा ( हि ) हें सर्व लोकप्रसिद्धच आहे कीं देवांनीं व मनुष्यांनीं ( स्तुतः ) स्तुति केला गेलेला ( कलौ ) कलियुगामध्यें (मलौ-घघ्नः ) सर्व पापांचा नाश करणारा ( अम्बासुतः ) अंबा या नांवाच्या ब्राह्मणस्त्रीचा मुलगा नृसिंहसरस्वती दत्तात्रेय किंवा अंबा म्ह. पार्वती तिचा मुलगा गजानन ( सः ) तो ( मे ) माझ्या ( हृदि ) हृदयामध्यें ( अस्तु ) असो. म्ह. त्याचें मी स्मरण करतों. ॥ १ ॥

( २ )

**अन्वयार्थः**—( योगभ्रष्टः ) ब्रह्मसाक्षात्कार होण्याकरितां योगाभ्यास करणारा व ब्रह्मज्ञान न होतां मध्येंच मरण पावलेला व योगीकुलांत जन्मलेला ( कश्चन ) कोणी एक ( ब्रह्मपुत्रः ) ब्राह्मणाचा मुलगा ( अत्रिपुत्रः ) त्रिगुणात्मक श्रीदत्तात्रेयानें ( यां सल्लीलां ) जी लीला ( चक्रे ) केली ( तां ) ती ( पित्रे प्रोचे ) आपल्या वडिलांना सांगता झाला. ( तां ) ती लीला ( चिच्छुध्यै ) बुद्धि शुद्धी होण्याकरितां मी ( संक्षेपतः ) संक्षेपानें म्ह. थोडक्यांत ( वच्मि ) सांगतों ( हि ) कारण ( एतदंतं ) या लीलेचें संपूर्णतया वर्णन (कश्चित्) कोणीहि (न यायात्) करूं शकला नाहीं. ॥ २ ॥

( ३ )

**अन्वयार्थः**—(पुरा) कृतयुगामध्यें (प्रतिष्ठानपुराग्र्ये ) प्रतिष्ठान या नांवाच्या गांवांत (द्विजः) कौशिक नांवाचा ब्राह्मण (आसीत्) राहत असे. (सः) तो (रुजार्तः) रोगानें अत्यंत पीडित होऊन (गन्तुम्) पायानें चालण्याविषयीं (एव) सुद्धां (अक्षमः) असमर्थ झाला; तेव्हां (दिनस्त्री) रस्त्यानें चाललेल्या वेश्येला (दृष्ट्वा) पाहून (निजस्त्रियं) आपल्या बायकोला (जगौ) म्हणाला (हे साध्वि) हे प्रिये, (तद्धाम) त्या वेश्येच्या घरीं (मां) मला (अद्य) आज (रंतुं) संभोग करण्याकरितां (नय) घेऊन चल. ॥ ३ ॥

( ४ )

**अन्वयार्थः**—(इति) याप्रमाणें (पतिगदितं) पतीचें भाषण (निशम्य) ऐकून (स्मितवदना) हास्यमुखी पतिव्रता (निजातं) आपल्या पतीला (निजभुजाशिरसि) स्वतःच्या खांद्यावर (प्रगृह्य) घेऊन (निजात्) आपल्या (सदनात्) घरांतून (याता) बाहेर गेली. (निशि) रात्रीं गाढ अंधकारांत (तडिता) विजेच्या प्रकाशानें (अपथं) कुमार्गाला (अवलोक्य) पाहून (शांता) स्थिर अंतःकरणानें (सती) पतिव्रता (याता) चालूं लागली. ॥ ४ ॥

( ५ )

**अन्वयार्थः**—(कांता) स्वतः सुस्वरूप ती स्त्री (कांताऽकांताय) नवऱ्याच्या कामरूप दुःखाचा नाश करण्याकरितां (प्रयाता) निघालेली (अकांतरे) अंधाररूपी दुःखामध्यें (स्थिता) असलेली (सा) ती (सती) कौशिक ब्राह्मणाची बायको (कांतारे) निर्जन मार्गावर (स्थितं) असलेल्या (शूलोतं) सुळावर चढविलेल्या (तं) त्या (मांडव्यं) मांडव्य ऋषीला (अवीक्ष्य) जाण्याच्या वेगांत न पाहिल्यामुळें (अताडयत्) धक्का देऊन पुढें गेली. ॥ ५ ॥

( ६ )

**अन्वयार्थः**—(ततः) सुळाला धक्का लागल्यानंतर (मुनिनाथेनापि) सर्व मुनींमध्यें श्रेष्ठ असूनहि (क्रुद्धेन) क्रोधयुक्त (मुनिना) मांडव्य ऋषींनीं (इनालोकनात्) उद्यां सूर्योदय होतांच (एतत्पतिना) या स्त्रीचा पति (कीनाशभवनातिथिना) यमलोकाला (भाव्यम्) जाईल (इति) असा (अभिहितं) शाप दिलेला (आकर्ण्य) ऐकून (उद्गतिं) हे सूर्या, तूं उदयाला (मैहि) येऊं नकोस (इति) असा (द्युनाथं) सूर्याला (शप्त्वा) शाप देऊन (अभीष्टं) पतीला जें इष्ट होतें तें (संपाद्य) प्राप्त करून घेऊन (स्वसदनं) ती स्त्री आपल्या घरीं (अगमत्) परत आली. ॥ ६ ॥

( ७ )

**अन्वयार्थः**—(शापाद्भीतः) पतिव्रतेच्या शापानें भ्यालेला (अर्कः) सूर्य (नोदितः) उदयाला आला नाहीं तेव्हां (अत्र) भूमितलावर (गाढध्वांते) गाढ अंधकार पडल्यामुळें (लुप्ताचारः) यज्ञयागादि सर्व क्रिया बंद पडल्या. (सर्वो लोकः) सर्व पृथ्वीवर (सशोकः) हाहाकार (आस) झाला. (एवमेव) याचप्रमाणें (यज्ञभोक्तापि) यज्ञयागादिकांवरच ज्यांची उपजीविका आहे असे (नाकः) स्वर्गामध्यें राहणारे लोकसुद्धां (शोकाविष्टः) दुःखव्याप्त व (अनाकः) सुखरहित (आस) झाले. ॥ ७ ॥

(८)

**अन्वयार्थः**—( अथ ) सर्व देव दुःखी झाल्यावर (धातृगिरा ) ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून ( अमरावराः ) इन्द्रादिदेव ( सतीवरां ) सर्व पतिव्रतांमध्यें श्रेष्ठ अशा ( अत्रिसतीं ) अनुसूयेकडे ( अगमन् ) गेले, (अभिवाद्य ) आणि तिला सर्वांनीं नमस्कार करून प्रार्थना केली व ( सदराः) भीतियुक्त ( सुराः ) इन्द्रादिदेव ( कृतादरां ) जिनें इन्द्रादिदेवांचा आदरसत्कार केला आहे अशा अनुसूयेला ( सतीगृहं ) कौशिकपत्नीच्या घरीं ( लघु ) तावडतोब ( निन्युः ) घेऊन गेले.॥ ८ ॥

(९)

**अन्वयार्थः**—( अथ ) कौशिक पत्नीच्या घरीं गेल्यानंतर ( अनसूया ) जिच्या अंतःकरणामध्यें मात्सर्य वगैरे कांहींच दोष नाहींत अशी अत्रिऋषींची पत्नी अनुसूया ( द्विजसतीं ) कौशिक ब्राह्मणाच्या पत्नीला ( सतीं ) पतिव्रतेला ( भारतीं प्राब्रवीत् ) गौरवयुक्त वाणीनें म्हणाली. ( हे साध्वि ) हे पतिव्रते ( एषः ) विद्वान लोकांनाच माहीत असणारा (वृषः) पातिव्रत्यधर्म ( साधु ) चांगल्या तऱ्हेनें ( ते ) तुझ्याकडून (धृतः ) आचरला गेला आहे. म्हणून ( एषः ) हा ( लोकः ) लोक ( ते ) तुझ्या (वशे) ताब्यांत ( विहितः ) आहे. ॥ ९ ॥

( १० )

**अन्वयार्थः**—(अनन्यगतिः) पति हेंच जिचें दैवत आहे अशी(या) जी स्त्री (छायेव)जणुं आपलें प्रतिबिंबच आहे असें समजून (पतिं)आपल्या पतीची (भजेत्) सेवा करील. (अत्र) या लोकांत (प्राक्) आपला पति निजण्यापूर्वी, भोजन करण्यापूर्वी व गमन करण्यापूर्वी (स्वापभुक्ती) आपलें जेवण निजणें ( गतिं ) बाहेर कोठेंतरी जाणें इत्यादि (या) जी स्त्री (त्यजेत्) आचरण करीत नाहीं. (उत्थानबोधाप्लवं) त्याचप्रमाणें पति उठण्यापूर्वी, जागा होण्यापूर्वी व स्नान करण्यापूर्वी (अग्रतः चरेत्) जी

स्त्री उठते, जागी होते व स्नान करते, (हे सति) हे पतिव्रते (सैव) तीच स्त्री (पत्या) आपल्या पतीशीं सह (उर्ध्वलोकं) पतिलोकाला (संचरेत्) जाते. ॥ १० ॥

( ११ )

**अन्वयार्थः**—(सती) कौशिक पत्नी (इति ब्रुवंतीं) पातिव्रत्यधर्माचें निरूपण करणाऱ्या (सतीं) अनुसूयेला (अवदत्) म्हणाली, (हे सति) हे अनुसूये (इदं) हें धर्मतत्त्व (प्रशस्तं) व्यवस्थित (उक्तम्) सांगितलेंस (कुतः) कां बरें (आगमः) आपलें येथें येणें झालें. (इति) याप्रमाणें कौशिकपत्नीचें भाषण ऐकून (इनोदयायेति) सूर्योदय व्हावा म्हणून या ठिकाणीं मी आलें, असें (तया) अनुसूयेनें (सती) कौशिकपत्नीला (उदिता) सांगितलें. (तदा) तेव्हां (सतीक्ष्णदृक्) कौशिकपत्नी कठोर दृष्टि करून (मुनेः सतीं) अनुसूयेला (प्राह) म्हणाली. ॥ ११ ॥

( १२ )

**अन्वयार्थः**—(प्रियं) मला जें प्रिय असेल तें (वद) तूं बोल (का) कोण बरें (निजसखीं) आपल्या मैत्रिणीचा ( अत्ति ) घात करील? (अद्य) पण या वेळेला तर (अत्तिकापि) वडील बहिणीप्रमाणें असणारी तूं (प्रियंवदा) प्रिय बोलणारी (कागिरं) कुत्सित शब्द (वक्ति) बोलतेस ? (अहो) खरोखर (न वेद्म्यहं) माझ्या कानांवर ते शब्द आले नाहींत असेंच मी समजतें. (पुत्तिकासमतनुः) पण हे शब्द कानीं पडतांच लांकडाच्या बाहुलीप्रमाणें (अहं) मी (भवामि) निश्चल झालें. ॥ १२ ॥

( १३ )

**अन्वयार्थः**—(अनुसूया) ऋषिपत्नी अनुसूया (उवाच) म्हणाली हे पतिव्रते,(अर्कं) सूर्याला (आव्हय) बोलाव. (हे दयालो) हे सदय पतिव्रते, (ते प्रियाग्र्ये) तुझा प्राणप्रिय पति (हरेर्धाम) सूर्योदयानंतर जर यमलोकाला (याते) गेला तर (ततः) यमलोकांतून (अपि) सुद्धां (निवर्त्य)

परत या ठिकाणीं आणून (नीरुक्) रोगरहित (सुराभः) देवाप्रमाणें कांतियुक्त करून (असौ) हा तुझा पति (मया) मी (द्रुतं) लौकरच (अद्य) आजच्या आज (दीयते) देईन. (यर्हि) जर (ते) तुला (रोचते) आवडेल तर. ॥१३॥

( १४ )

**अन्वयार्थः**—( तथेति ) जशी तुझी इच्छा असेल त्याप्रमाणें असें म्हणून ( प्रणता ) नम्र अशा ( सा सती ) त्या पतिव्रतेनें (अर्क ) सूर्याला (आव्हयत् ) उदयाला ये असें म्हणून बोलाविलें. (सः) तो ( तीक्ष्णगुः ) प्रचंडसूर्य ( स्राक् ) ताबडतोब (उदितः ) उदयाला आला. ( अब्जिनीनां) कमलिनींच्या ( ततिं ) समुदायांना ( प्रहर्षयन् ) विकासित करणारा (सतीं) कौशिकपत्नीला ( भृशं ) अत्यंत ( व्यथयन् ) पीडा देणारा ( द्विजासूंश्च ) कौशिकाच्या प्राणांचें ( हरन् ) हरण करणारा ( समं ) त्याचबरोबर ( तमस्ततिं ) अंधकारसमुदायाचाहि नाश करणारा असा सूर्य उदयाला आला.॥ १४ ॥

( १५ )

**अन्वयार्थः**—( सा ) ती ( देवहूतिदुहिता ) अनुसूया ( दयितांघ्रिं ) अत्रिऋषींच्या चरणाचें ( विचिंत्य ) ध्यान करून ( सहसा ) हास्यमुद्रेनें ( सहसा ) एकदम ( आह ) म्हणाली.( भर्तुः ) पतीचे (एव ) च (चरणं) पाय (मे) मला (यर्हि) जर (अनन्यशरणं) एकमेव उपास्य असतील (तर्हि) तर (जीर्णः) मेलेला वृध्द (स तु) कौशिक ब्राह्मण (जीवतु) जिवंत व्हावा.॥ १५ ॥

( १६ )

**अन्वयार्थः**—(तत्र) त्यावेळीं (इति) पूर्वी सांगितल्याप्रमाणें (सत्यां) पतिव्रता अनुसूया (वदन्त्यां) बोलली (सत्यां) असतां (प्रमीतः) मेलेला (अपि) असतांहि (सत्याः) पतिव्रतेचा (दयितः) पति (विप्रः) कौशिक

ब्राह्मण (सः) तो (जीवितः) जिवंत झाला. (सतीप्रभावात्) अनुसूयेच्या प्रभावामुळें (नितान्तशान्तः) अत्यंत समाधानशील (देव इव) देवाप्रमाणें (नीरुक्) निरोगी (च) हि पण (आस) झाला. ॥ १६ ॥

( १७ )

**अन्वयार्थः**—(तदा) सूर्योदय झाला तेव्हां (सुमनसः) इन्द्रादिदेव (अपि) सुद्धां (सवराः) वराशींसहित (सुमनसः) फुलें (ववृषुः) उधळूं लागले (मुदा) आणि आनंदानें (स्वपदं) आपआपल्या स्थानाला (ययुः) गेले. (यदनुभावतः) देवांच्या वरप्रभावानें (इह हि) खरोखर या लोकांत (सुरत्रयं) ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर हे तिघे (कर्दमजात्रिसुतत्रयं) कर्दम-ऋषींची मुलगी व अत्रि यांचीं तीन मुलें होऊन (आस) राहिले. ॥१७॥

( १८ )

**अन्वयार्थः**—(लोकेशः) ब्रह्मदेव (तारकेशः) चन्द्ररूपानें (दिविचरः) आकाशसंचारी (आस) झाला. (चंडिकेशः) शंकर (दुर्वासाः) दुर्वासऋषि होऊन (गविचरः) भूमीवर संचार करणारा (आस) झाला. (स्वयं) स्वतः ( भगवान् त्र्यधीशस्तु ) त्रिगुणमायाधीश भगवान् श्रीविष्णु (श्रीदत्तः) श्रीदत्तरूपानें (इह) अत्रिऋषींच्या घरीं (आस) राहिला. (यदृष्ट्यंशतः) ज्या श्रीदत्ताच्या कृपाकटाक्षलेशमात्रानें (क्षमेशाः) राजे ( उभयर्धिगाः) स्वर्ग व मृत्युलोकांतील मुक्ति व धनसमृद्धियुक्त झाले. ॥ १८ ॥

( १९ )

**अन्वयार्थः**—(अथ खलु) पूर्वी (अत्र) येथें (कश्चन) कोणी एक (सोमवंशीयः) चंद्रवंशामध्यें उत्पन्न झालेला (हैहयोत्तमः) हैहयकुलश्रेष्ठ (कृतवीर्यः) कृतवीर्य नांवाचा राजा होता.(मृततनयोऽपि) ऋषीच्या शापानें त्याचा मुलगा मेल्यामुळें (गुरुवर्योपदेशेन) बृहस्पतीच्या सांगण्यावरून (सूर्यसप्तमीव्रतं) रविवारीं सप्तमी आली असतां करण्याचें व्रत (स्वयं) स्वतः राजानें (कृत्वा) करून (मैत्रेय्याज्ञयापि) मैत्रेयीनें सांगितलेलेंहि

(द्वादशमासात्मकं) एक वर्षभर करण्याचें (अनंतव्रतं) अनंताचें व्रत (जायया) स्त्रीकडून (कारयित्वा) करवून घेऊन (कुमारपराक्रमं) कार्तिकेयाच्या तोडीचा (शूरतरं) अत्यंत शूर असा (कुमारं) मुलगा (अलभत्) मिळविला. ॥ १९ ॥

( २० )

**अन्वयार्थः**—(अथ) पुत्रप्राप्तीनंतर (काले) अकराव्या वर्षी (तमेव) त्या (सुतं) अर्जुनाची (उपनीय) मुंज करून (ताते) राजा (दिवमिते सति) स्वर्गवासी झाला असतां (अमात्यमुखैः) सर्व मंत्र्यांनीं (पित्र्यं राज्यं) वडिलोपार्जित राज्यकारभार (कुरु) तूं आतां पाहा (इत्युदितः) असें सांगितलें असतां (विनीतोऽपि) अत्यंत नम्र असणारा (सः) तो (सुतः) अर्जुन (हसन्) हंसून (आह) मंत्र्यांना म्हणाला ॥ २० ॥

( २१ )

**अन्वयार्थः**—(यः) जो राजा (प्रजाः) लोकांना (स्वप्रजावत्) आपल्या कुटुंबीयांप्रमाणें (अपश्यन्) न पाहतां (भूषष्ठांशं) भूमीचा सहावा भाग (पण्यकद्वादशांशं) व्यापारांतील बारावा भाग (भुङ्क्ते) कर म्हणून घेतो, (दंडयादंडयौ) दंड करण्यास कोण योग्य व अयोग्य (नो वेत्ति) याचा विचार जो करीत नाहीं (एनं) अशा प्रकारच्या (स्तेनं) चोराला (कालः) यम (हन्ति) शासन करतो. (ईदृक्) अशा प्रकारचें अनिष्टपरिणामकारक (राज्यं) राज्य (मम) मला (न इष्टम्) इष्टकारक वाटत नाहीं. ॥ २१ ॥

( २२ )

**अन्वयार्थः**—(धार्मिकोऽपि) धर्मानें वागणाराहि (नृपः) राजा (भृत्यकृतांहस्तुर्यभागभाक्) सेवकांनीं केलेल्या पापाचा चतुर्थांशभागी होतो. (अतः) म्हणून (इदं) हें (अपूज्यवत्) निंद्य असल्यामुळें (प्राज्यं राज्यं) पुष्कळ मोठें व एकचक्री राज्य जरी असलें तरी (तोषदं) मला संतोषकारक (न) वाटत नाहीं. ॥ २२ ॥

( २३ )

**अन्वयार्थः**—(मुनिवर्गोत्थितः) सर्व मुनींमधून उठलेले ( भर्गोपमः) शंकराप्रमाणें असलेले (गर्गः) गर्गाचार्य (तं) त्या अर्जुनाला (उवाच) म्हणाले, (अनिर्गलं) तूं कोणाचेंहि न ऐकतां (दत्तं) श्रीदत्ताला (निर्गच्छ) शरण जा. (सः) तो श्रीदत्तात्रेय (ते) तुझ्या (चित्तं) अंतःकरणाला (प्रसादयेत्) शांति देईल. ।। २३ ।।

( २४ )

**अन्वयार्थः**—(यदा) ज्या वेळीं (देवानां) इन्द्रादिदेवांची (पदानि) स्थाने (बलात्) बलात्कार करून (जंभासुरः) जंभ नांवाच्या दैत्यानें (अहरत्) हरण केली, (तदा) त्या वेळीं (पदार्थिनः) आपापलीं स्थानें मिळावीं म्हणून इच्छा करणारे (देवाः) इन्द्रादि देव (श्रीदत्तपदं) श्रीदत्तात्रेयाला (आश्रिताः) शरण गेले. ।। २४ ।।

( २५ )

**अन्वयार्थः**—(तदनु) इन्द्रादिदेव श्रीदत्ताला शरण गेल्यावर त्यांचे मागोमाग (दनुजाः) दैत्य (अपि) सुद्धां (योद्धुकामाः) देवांबरोबर युद्ध करण्याकरितां (तमाश्रमांतं) दत्तात्रेयांच्या आश्रमांत (आसाद्य) येऊन (दत्तांके) श्रीदत्तांच्या मांडीवर (आसीनां) बसलेल्या (अनुत्तमां) अत्यंत सुंदर पण (मायामयीं) मायेनें निर्माण केलेल्या (मानिनीं) स्त्रीला (विलोक्य) पाहून (कामातुरतया) दैत्य अत्यंत कामपीडित झाल्यामुळें (बलात्) बळजबरीनें (तां) त्या स्त्रीला (आदाय) घेऊन (द्रुतं) वेगानें (निर्ययुः) निघून गेले. ।। २५ ।।

( २६ )

**अन्वयार्थः**—(ततः) स्त्री हरण केल्यानंतर (भगवता) श्रीदत्तात्रेयांनीं (निमित्तभूतैः) निमित्त मात्र असणाऱ्या (देवैः) इन्द्रादि देवांकडून (तान्) त्या (असुरान्) दैत्यांचा (घातयित्वा) नाश करवून (देवताः) इन्द्रादि देव (स्वपदं) आपापल्या स्थानाला (प्रवेशिताः) पोंचविले;

(अद्यापि) हल्लींसुद्धां (तं) त्या ( भगवंतं ) श्रीदत्तात्रेयाची (भजंते) देव उपासना करतात. (एवंप्रभावं) तेव्हां सर्व समर्थ अशा (भावज्ञं) सर्वांचें हृद्गत जाणणाऱ्या (भावलभ्यं) भक्तीनें मिळणाऱ्या (सदयहृदयं) दयाशील ज्याचें अंत:करण आहे अशा (दत्तात्रेयं) श्रीदत्तात्रेयाला (शरणं) शरण (व्रज) जा. ॥ २६ ॥

( २७ )

**अन्वयार्थः—**(तथा) ठीक आहे (इति) असें म्हणून (तत्) गर्ग-ऋषींच्या उपदेशाचा (अंगीकृत्य) अंगिकार करून (असह्यपराक्रमः) भयंकर पराक्रमी (अर्जुनः) अर्जुन (सह्यं) सह्याद्रि (अगं) पर्वतावर (गतः) गेला, (नम्रः) आणि नम्रतेनें (अंगं) शरीरानें (दत्ताग्रतः) दत्तात्रेयांच्यापुढें (निपात्य) साष्टांग नमस्कार घातला व (तं) श्रीदत्तात्रेयाला (आह) म्हणाला, (प्रभो) हे समर्था, (मां) माझें (पाहि) रक्षण कर. (तव) तुझ्या (कम्रः) प्राप्तीच्या इच्छेनें या ठिकाणीं आलों (अस्मि) आहें. ॥ २७ ॥

( २८ )

**अन्वयार्थः—**(दत्तेन) श्रीदत्तात्रेयांनीं (सकोपं) अत्यंत क्रुद्ध होऊन (निर्भर्त्स्यमानोऽपि) निर्भर्त्सना केली असतांहि (सेवनतत्परः) सेवेमध्यें तत्पर असा (अकंपं) निश्चल (भावं) भक्तीमध्यें (गतः) स्थित असा (सः) तो (नृपः) राजा अर्जुन (न विव्यथे) यत्किंचित्‌हि घाबरला नाहीं. (येन) ज्या गुरूंनीं (भयं निरस्तं) दर्शनमात्रानें भय नाहीसें केलें, (गुरुः) ते दत्तात्रेय (तं) अर्जुनाला (प्रोचे) म्हणाले. ॥ २८ ॥

( २९ )

**अन्वयार्थः—**(हे आयुष्मन्) दीर्घायुषी अर्जुना, (ते) तुझें (भद्रं) कल्याण असो. (इतः) येथून (गच्छ गच्छ) तूं आतां जा. (यतः) कारण (अहं) मी (स्त्रिया) या स्त्रीमुळें (उच्छिष्टभाक्) उच्छिष्ट भक्षण करणारा (विवसनः) विवस्त्र असा (धर्माधर्मानभिज्ञः) धर्म कोणता व अधर्म कोणता हें न जाणणारा (भक्ष्याभक्ष्यविवर्जितः) कांहींहि भक्षण करणारा (अंकगत-

व नितासंगदूषितः) मांडीवर बसलेल्या या स्त्रीमुळें दोषी व (उन्मत्तः) उन्मत्त असा मी झालों आहें. (अतः) म्हणून (मत्संगतः) माझ्या संगतीनें (तें) तुझें कार्य (अशुभंभावी) शुभ होणार नाहीं (इति) असें (उक्त्वा) म्हणून (दृङ्मात्रेण) केवळ दृष्टिक्षेपानें (तद्भुजौ) त्याचे दोन्ही हात (अपातयत्) खालीं पाडले. ॥ २९ ॥

( ३० )

**अन्वयार्थः**—(हे भगवन्) षडगुणऐश्वर्यसंपन्न श्रीदत्ता (त्वद-भिन्नत्वात्) तूं व मी एकच असल्यानें (इतः) तुला सोडून (क) कोठें (अस्य) या देहानें (गमनं) जावें? (भवान्) आपण (मायारचितपदार्थ-भागिव) आपल्या मायेनें निर्माण केलेल्या वस्तूंचा उपभोग आपण घेतां असें मूढ लोकांना वाटतें. (विक्षेपावरणाभावात्) विक्षेप व आवरण ह्या अज्ञानाच्या शक्ति असल्यानें व आपण तर ज्ञानी असल्यानें आपणांला कोणतेंच आवरण नाहीं, अर्थात् विक्षेप व आवरणहि नाहीं. (विवसनः) म्हणूनच आपण विवस्त्र अहांत. (नित्यमुक्तत्वात्) आपण नित्यमुक्त असल्यानें (धर्माद्यतीतः) धर्माधर्माचें उल्लंघन केलें आहे. (स्वयमनश्नन्) आपण न खातां (अश्नतः) खाणाऱ्या (जीवस्य) जीवाला (साक्षी) साक्षीभूतपणें पाहतां (इतः) म्हणूनच (भक्ष्यादिवर्जितः) भक्ष्याभक्ष्य उभयवर्जित आहांत. (भवतः) आपल्या (मायायाः) मायेमध्यें (एकदेशस्थितत्वात्) आपण एकांशानें आहांत म्हणून (वनितायाश्च असंगतत्वं) स्त्रीसंगति ही तुम्हांला नाहीं. (लोकदृष्ट्या तु) परंतु लोकांच्या दृष्टीनें पाहिलें तर (दूषितत्वं) दोषी आहांत, (उन्मत्तत्वं च) व उन्मत्तहि आहांत असें वाटतें. (अतः) म्हणून माझ्या दृष्टीनें (मम) माझें (शुभं) शुभ (भावी) होणार (इत्युक्त्वा) असें बोलून (मां) माझें (पाहि) रक्षण करा (इति) असें म्हणून (प्रणिपतंतं) नमस्कार करणाऱ्या (शोचंतं) आक्रोश करणाऱ्या (अर्जुनं) अर्जुनाला (वरान्) वर (वृणीष्व) मागून घे (इति) असें (आश्वास्य) आश्वासन देऊन (अशोकं) शोकरहित (चकार) केलें. ॥ ३० ॥

**भावार्थः**—अर्जुनाला श्रीदत्तात्रेयांनीं येथून जा असें सांगितलें असतां अर्जुन म्हणतो, हे षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीदत्ता, जीवब्रह्म यांचें ऐक्य असल्यामुळें आपल्याहून मी वेगळा नाहीं. तेव्हां आपण ज्या ठिकाणीं असाल त्या ठिकाणींच मी असणार. आपणांला सोडून मी कोठें बरें जाणार ? आपण मायाविनिर्मित पदार्थांचा उपभोग घेत असून मी हि इतर लोकांप्रमाणेंच एक आहे असें भासवितां. पण खरें पाहिलें असतां तसें नाहीं. कारण 'असंगो ह्ययं पुरुषः' अशी श्रुति असल्यानें आपण असंग आहांत. आपण पूर्वीं सांगितलें कीं मी विवस्त्र आहें, पण तो आपला दोष नसून उलट गुणच आहे. कारण अज्ञानाच्या आवरण व विक्षेप अशा दोन शक्ति आहेत. सद्वस्तूचें आच्छादन करून ती नाहीं असा व्यवहार करविणारी आवरणशक्ति व आवरणानंतर त्या वस्तूला विपरीत रूपानें भासवून विपरीत व्यवहार करविणारी विक्षेपशक्ति या दोनही शक्ति अज्ञानाच्या असल्यानें आपल्या स्वरूपावर त्यांची मात चालत नाहीं. म्हणून आपण दिगंबर आहांत. धर्माधर्मांचे अधिकारी बद्ध अज्ञानी पुरुषच आहेत. आपण नित्यमुक्त असल्यानें आपणांला धर्माधर्म कांहींच नाहीं. "अनश्नन्नन्यो अभिचाकशीति" या श्रुतीवरून आपण कांहींच न खातां जीव खात असतां साक्षीभूतपणें त्याचेकडे पाहतां म्हणून भक्ष्य असा पदार्थच आपणांला नसल्यानें अभक्ष्यभक्षणरूप दोष आपणांला कोठून लागणार ? आपणाला स्त्रीसंगाची बाधा नाहीं. कारण "विष्टभ्याहमिदं कृत्स्नं एकांशेन स्थितो जगत्" असें असल्यानें सर्व जगत् एकांशानें व्याप्त करून टाकल्यामुळें आपल्या एकदेशामध्यें मायेचा संबंध आहे. तेव्हां आपला त्या स्त्रीशीं कांहींच संबंध नाहीं. परंतु हें सर्व परमार्थ दृष्टीनें. लोकांच्या दृष्टीनें तर आपण उन्मत्त व दोषी आहांत असें वाटतें. म्हणून सत्यान्वेषण केलें असतां आपल्या संगतीनें माझें निश्चित कल्याण होणार यांत शंका नाहीं. असें म्हणून वारंवार त्यांच्या पायां पडूं लागला व शोकहि करूं लागला.

आणि माझें आपण रक्षण करा असें मुखानें बोलत असतां श्रीदत्तात्रेय त्याला म्हणाले,अरे अर्जुना वर मागून घे; मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. असें त्याला आश्वासन देऊन त्याचा शोक नाहींसा केला. ॥ ३० ॥

( ३१ )

**अन्वयार्थः**—( कृतवीर्यसमुद्रेकः ) धाष्टर्य दाखवून आपलें बल ज्यानें प्रगट केलें आहे असा ( कृतवीर्यनृपार्भकः ) कृतवीर्य राजाचा मुलगा अर्जुन ( दत्ताभयं ) ज्यांनी अभयदान दिलें आहे अशा ( दत्तात्रेयं ) श्रीदत्तात्रेयांना ( नमस्कृत्य ) नमस्कार करून ( इदं ) पुढील श्लोकांत निर्दिष्ट केलेलें ( जगौ ) बोलला. ॥ ३१ ॥

( ३२ )

**अन्वयार्थः**—(सप्तद्वीपधरेशता) संपूर्ण पृथ्वीवर माझेंच राज्य असावें, (अन्यवशता) सर्व लोक माझ्या ताब्यांत असावेत, (युद्धेऽप्रतिद्वंद्वता) युद्धामध्यें माझ्यापेक्षां मोठा योद्धा कोणी असूं नये. (बाहूनां च सहस्रता) मी इच्छा करीन त्यावेळीं मला हजार हात असावेत, (विजयता) कुठल्याहि परिस्थितींत माझा विजय असावा, (ख्यात्याधिकात्पंचता) आपल्यासारख्या प्रसिद्ध पुरुषापासून मरण यावें, (वित्ता) माझे ठिकाणीं विद्वत्ता असावी, (सिध्द्यनुकूलता) सर्व सिद्धि माझ्या ताब्यांत असाव्यात, (अर्थबहुता) अक्षय्य धन असावें, (अकुंठेतिता) अस्खलित गमन असावें, (दातृता) दानशील स्वभाव असावा, (आयुष्मत्ता) दीर्घायुष्य असावें, (भवदंघ्रिभक्तिदृढता) आपली चरणसेवा घडावी (च) आणि (अन्ते) शेवटीं (सायुज्यता) जन्ममरणरहित अशा आपल्या स्वरूपाची प्राप्ती (अस्तु) व्हावी. ॥ ३२ ॥

( ३३ )

**अन्वयार्थः**—(अर्थविदा) आशय जाणणाऱ्या श्रीदत्तात्रेयांनीं (तथेति) ठीक आहे असें म्हणून (उदितः) आश्वासन दिलेला (नतः)

नम्र असणारा (भूपः) राजा अर्जुन (गतः) आपल्या नगराला परत गेला. (मुनिभिः) गर्गादि सर्व मुनींनीं (अभिषिक्तः) राज्याभिषेक केलेला अर्जुन (पदे स्थितः) राज्यपदावर आरूढ झाला. (अधर्मकर्ता) भूमीवर अधर्म करणारा (परपीडकः) दुसऱ्यांना त्रास देणारा व (मया विना) माझ्याशिवाय (अस्त्रभृत्) जो कोणी हातांत शस्त्र धरील (तं) त्याला (हन्मि) मी ठार मारीन (इति) अशी (अघोषयत्) दवंडी गांवांत पिटली. ॥३३॥

( ३४ )

**अन्वयार्थः**—(पूः, ग्राम, गो, क्षेत्र, धन, अश्व, पाता) नगर, खेडें, गाय, शेत, धन व घोडे वगैरेंचें पालन करणारा, (स्मृतोऽपि) केवळ स्मरण केलें असतांहि (सर्वार्तिहरः) सर्वांची सर्व पीडा नाश करणारा, (अरिहन्ता) शत्रूंचा नाश करणारा, (प्रपन्नस्य) शरणागताचें (त्राता) रक्षण करणारा, (रुगाधिहर्ता) शारीरिक व मानसिक पीडा नाश करणारा, (नैकांगधर्ता) अनेक शरीरें धारण करणारा, (अत्रिजवत्) अत्रिपुत्र दत्तात्रेयाप्रमाणें (विहर्ता) सर्वत्र संचार करणारा राजा अर्जुन राज्य करूं लागला. ॥ ३४ ॥

( ३५ )

**अन्वयार्थः**—(नयविदि) नीति जाणणारा, (भूपाले) अर्जुन राजा (ईज्यपूज्यं) श्रेष्ठ लोकांना मान्य असणारा, (राज्यं) राज्य (शासति) कारभार करीत असतां (अकाले) अयोग्य वेळीं (मृतिः) कोणालाहि मरण (नास) येत नसे. (अरिभीतिः) शत्रूंची भीति (न हि) वाटत नसे.(दुर्भिक्षं) दुष्काळ (मारिकेतिभीतिः) अतिवृष्टि, अनावृष्टि इत्यादिकांपासून भीति (न हि) वाटत नसे. (स्तेनाग्निजभयं) चोर व जाळपोळ यांपासूनहि भय (नास) नसे. (कूटनीतिः) गुप्त कारभारहि त्याच्या राज्यांत नव्हता. ॥ ३५ ॥

( ३६ )

**अन्वयार्थः**—(बहुनर्मदां) पुष्कळ क्रीडानंद देणाऱ्या. (शर्मदां) व सुख देणाऱ्या (नर्मदां) नर्मदा नदीच्या (परावर्त्य च) पलीकडे जाऊन

आणि (तत्पतिं) त्या नर्मदेचा पति (सिंधुं) जो समुद्र त्याला (जित्वापि) जिंकून आणि (कर्कोटकाहिजित्) कर्कोटक सर्पाचा जो मुलगा यालाहि जिंकणारा अर्जुन (रेमे) नर्मदा नदीच्या तीरावर स्त्रियांसहित रममाण झाला. ॥ ३६ ॥

( ३७ )

**अन्वयार्थः**—(चतुरशीतिसहस्रसमाः) अर्जुनानें याप्रमाणें चवऱ्याऐंशीं हजार वर्षे (भुवि) भूमितलावर (राज्यं) राज्य (व्यधात्) केलें. (भुवनेशकृपावशात्) श्रीदत्तात्रेयांच्या कृपाप्रसादानें (त्रिभुवने) स्वर्ग, मृत्यु व पाताळामध्यें (सुयशोऽपि) आपलें चांगलें यशहि प्रस्थापित केलें. (अहो) काय आश्चर्य आहे! (अथ) नंतर (सः) राजा अर्जुन (विधेर्वशात्) पूर्व पुण्याईनें (विरागं) विरक्त (गतः) झाला.॥ ३७ ॥

( ३८ )

**अन्वयार्थः**—(कुस्त्रियां) दुष्ट स्त्रियांचे ठिकाणीं (वर्णरतिरप्रमोदाः-शृंगारादि क्रिया करून होणारा हर्ष (क्व) कोणीकडे (आत्मरूपानुभव) प्रमोदाश्च) आणि आत्यंतिक दुःखनिवृत्तिपूर्वक सुखप्राप्तिरूप आनंदानुभवजन्यहर्ष (क्व) कोणीकडे? (ये) जे कुत्सित स्त्रियांचे ठिकाणीं शृंगारादि क्रिया करून होणारे आनंद (इन्द्रियाणां) इन्द्रियांचें (तेजः) सामर्थ्य (जरयन्ति) नाहींसे करतात, (अजः) ब्रह्मदेवसुद्धां (तैः) त्या आनंदाशीं (चिरजीविते) पुष्कळ आयुष्य असूनहि (रमेत किं) रममाण होतो का? अर्थात् दीर्घायुषी ब्रह्मदेवसुद्धां ज्या गर्ह्य आनंदाचा उपभोग घेत नाहीं, तर अल्पायुषी मनुष्यांनीं त्या आनंदामध्यें कां रममाण व्हावें? ॥ ३८ ॥

( ३९ )

**अन्वयार्थः**—(जन्मांतरे) पूर्व जन्मामध्यें (ये) जे भोग उपभोगले (ते च) तेच (अद्य) या जन्मामध्येंहि आहेत. (श्वः एव) व उद्यांहि तेच उपभोगावयाचे आहेत. (सदा तद्भुक्) जो नेहमीं अशा प्रकारचे भोग

भोगतो (सः) तो मनुष्य (श्वा, खरः, अश्वः एव) कुत्रा, गाढव किंवा घोडा आहे असेंच म्हटलें पाहिजे. त्याच्यांत व याच्यांत फरक नाहींच. ( मनोविभ्रमबंधहेतून् ) मनाच्या विविध भ्रमाला कारणीभूत असलेल्या (तान् ) त्या भोगांना (धिक्) धिक्कार असो. (आत्मसेतून् ) स्वतःला संसारसागरांतून पार जाण्यास मार्गरूप असलेल्या (सतः) संतांना (न च ईक्षे) मी पाहत नाहीं. (मां) तेव्हां मलाहि (धिक्) धिक्कार असो.॥३९॥

( ४० )

**अन्वयार्थः**—(चलद्दलांतजलोपमजीविते ) हालत्या पानावर असलेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणें आपलें नश्वर जीवित असतांना ( मृगजलोपमभोगे ) मृगजलाप्रमाणें भोग हे खोटे असतांना (सेविते) अशा अल्पायुष्यांत जर त्या भोगांचा उपभोग घेतला तर ( क्व सुखम् ) सुख कसें बरें मिळणार ? (अद्य) ईश्वरानुग्रहानें आज मला (विवेकः) सुविचार (उपस्थितः) उत्पन्न झाला आहे हें मी माझें भाग्य समजतों. (ततः) म्हणून (इतस्तु) इथन पुढें (उपस्थितः) त्या श्रीदत्तात्रेयांच्याजवळ जाऊन (अजं) त्या दत्तात्रेयांची (भजे) सेवा करतों.॥ ४० ॥

( ४१ )

**अन्वयार्थः**—(एवं) याप्रमाणें संसार हा असार आहे असें पाहून (सुनिर्विण्णमतिः) ज्याच्या अंतःकरणांत वैराग्य उत्पन्न झालें आहे, असा (नृपतिः) अर्जुन राजा (सत्पतिं) श्रीदत्तात्रेयांच्याकडे (प्राप्तः) गेला.(सद्गतिः) साधु लोकांना एकमेव गति असलेले श्रीदत्तात्रेय (तत्परीक्षार्थं) अर्जुन राजाची परीक्षा घेण्याकरितां (व्यर्थं) उगीचच ( ध्यानस्थवद्भमौ ) समाधिस्थितींत बसले. ॥ ४१ ॥

( ४२ )

**अन्वयार्थः**—(भूयो भूयः) पुनः पुनः (उच्चैः) मोठ्या आवाजानें (भूयो भूयः) पुनः पुनः (नामभिः) पुष्कळ नांवांनीं (देवं) श्रीदत्तात्रेयांना

(हंत) खेदानें (संबोध्य) हांक मारून (गिरा) वाणीनें (साकं सास्रं) प्रेमाश्रूनें युक्त (कं) असें मस्तक (नीचैः) नत (आधाय) करून (तद्यशः) भक्तानुग्रह करणाऱ्या प्रभूचें यश (स्मारं स्मारं) पुनः पुनः स्मरण करून (तं देवं) त्या श्रीदत्तात्रेयांची (एवं) पुढील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें (अस्तौत्) अर्जुनानें स्तुति केली. ॥ ४२ ॥

( ४३ )

**अन्वयार्थः**—(हे मघवन्) सर्वश्रेष्ठ (मान्य) सर्वमान्य (हे दयानिधे) कृपासागर (हे सन्निधे) साधु लोकांना आश्रयभूत असणाऱ्या (भगवन्) षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीदत्ता, (अद्य) आज (तव) तुझ्या (सविधे) जवळ (पतितं) अनन्य होऊन शरण आलों असतां (मां) माझा (उपेक्षसे किं) तिरस्कार करणार कीं काय? (हे स्वदृक्) स्वरूपानुभवामध्यें निमग्न असणाऱ्या (ईश) श्रीदत्ता, (हि) ज्या अर्थीं (ते) आपला (दृक्) कृपादृष्टिलेशसुद्धां (पतितं) पतितालाहि (पावयति) पावन करूं शकतो, मग माझ्यासारख्या भक्ताला पावन करील यांत काय शंका? ॥ ४३ ॥

( ४४ )

**अन्वयार्थः**—(अयं) शरण आलेला हा भक्त अर्जुन (अघवान्) भयंकर पापी आहे (इति) म्हणून जर (भगवान् भवान्) षड्गुणैश्वर्यसंपन्न आपण (अद्य) आज (मां) माझी (उपेक्षते) उपेक्षा करीत असाल तर (अघवानपि) अत्यंत पापी असूनहि (नतो मघवा) पण आपणाला शरण आलेल्या इन्द्राचें (यथा) जसें (अवितः) रक्षण आपण केलें (तथापि) त्याचप्रमाणें (अघवंतं) मी जरी पापी असलों तरी (नतं मां) आपणांला शरण आलों आहें. म्हणून (अव) इन्द्राप्रमाणें माझेंहि आपण रक्षण करा. ॥ ४४ ॥

( ४५ )

**अन्वयार्थः**—(प्रथमं) मी आपल्याकडे पूर्वी आलों त्या वेळीं (तव मायया) आपल्या मायेनें (आवृतः) आवृत केला गेलों व माझें हित मला

समजलें नाहीं. (ततः) म्हणूनच (एतद्विभवः) हें सर्व राज्यवैभव (मया वृतः) मला असावें म्हणून मीं वर मागून घेतला.(स्वयमेव) मी स्वतःच (निजाहितः) माझा शत्रु (अभवम्) झालों.(अतः) म्हणून (अद्य) आज (अहं) मी (त्वां) आपणाला (शरणं) अनन्यशरण (गतः) आलों आहें. ॥ ४५ ॥

( ४६ )

**अन्वयार्थः**—( एष उ ) राज्यादि वैभव मागून घेतलें हाच दोष (अन्यतः) माझ्याशिवाय दुसऱ्याचा (क्व च वद) कोणाचा आहे हें आपण सांगावें. अर्थात् दुसऱ्याचा नाहीं. (वदान्यतः) कोणताहि वर मागून घे असें म्हणणाऱ्यापासून (तुषकांक्षिवदेव) ज्याप्रमाणें कोंडा मागून घ्यावा त्याप्रमाणें माझें झालें. ( भवतोषधिया ) स्त्रीपुत्रादिसुखप्राप्तीच्या इच्छेनें (भवः) पुनर्जन्माला देणारा संसारच (ईप्सितः) मागून घेतला. (हे अभव) संसाराला नाशक श्रीदत्ता, (भवतः) आपल्यापासून (अभवः) मोक्ष ( न ईप्सितः ) मागून घेतला नाहीं. ॥ ४६ ॥

( ४७ )

**अन्वयार्थः**—( हे वरद ) वर देण्यामध्यें समर्थ श्रीदत्ता, (द्विरदाश्वधनादिषु) हत्ती, घोडे, धनसंपत्तीमध्यें (किं) काय (सुखम्) सुख आहे? ( अभवभूत्थं ) स्त्रीपुत्रादिकांमध्यें (उ) हि ( किं सुखम् ) काय सुख आहे? ( सुखरूपनिजात्मविघातकैः ) सुखरूप जो आपला आत्मा त्याचा नाश करणारे ( भवसागरपातकैः ) संसारसमुद्रामध्यें ढकलून देणारे (तैः) राज्य, स्त्रीपुत्रादि व पश्वादि जे पदार्थ त्यांच्याशीं (किमु) काय कर्तव्य आहे? ॥ ४७ ॥

( ४८ )

**अन्वयार्थः**—(अहिताः) माझ्याशीं द्वेष करणारे शत्रू (मया) मीं (अनुगाः) माझे सेवक (विहिताः) केले. (सानुगापि श्रीः) अष्ट महासिद्धीसहित लक्ष्मीचासुद्धां (सुहिता कृता) इष्ट वाटेल त्याप्रमाणें उपयोग केला.

(सुराः) इन्द्रादि देवांनीं सुद्धां (अनुगायकवत्कृताः) माझीच री ओढणें केलें. (अनुगा) प्रत्येक जन्मामध्यें मागोमाग येणारे (मृतिः) मरण मात्र (नैव पराकृता) मीं नाहींसें केलें नाहीं. ।। ४८ ।।

( ४९ )

**अन्वयार्थः**—(यथा) जसा (भवचक्रतः) जन्ममरणरूप संसारचक्रापासून (अहं) मी (बिभेमि) अत्यंत भयग्रस्त होतों, (तथा) तसा (नयमानी) न्यायानें वागणारा मी (यमाच्च) मला साक्षाद्यमापासूनहि (न बिभेमि) भीत नाहीं (ते पदं) तेव्हां निर्भय असें जें आपलें स्थान तें (यमादिभिः) यमनियमादि अष्टांग योगानेंहि (न आप्यते) मिळूं शकत नाहीं अशा आपल्या स्थानाला (आद्य) सर्व कारणांचें कारण (ईश) श्रीदत्ता, (अभयं) भयरहित अशा (ते पदं) आपल्या स्थानाला (मां) मला (नय) नेऊन पोंचवा. ।। ४९ ।।

( ५० )

**अन्वयार्थः**—(हे ईश) सर्व जगन्नियंत्या श्रीदत्ता, (भौमवैभवं) हें राज्यवैभव (न स्पृहयामि) मला नको. (दैववैभवं) इन्द्रादि देवांचें ऐश्वर्यहि (न स्पृहयामि) मला नको. (सिद्धिवैभवं) अणिमादि अष्ट सिद्धिहि (न स्पृहयामि) मला नकोत. (दास्यवैभवं) केवळ आपल्या चरणाची सेवा (स्पृहयामि) अखंड मिळावी एवढीच इच्छा आहे. ।। ५० ।।

( ५१ )

**अन्वयार्थः**—(दासवतः अपि) ज्यांना पुष्कळ सेवक आहेत अशा राजांनासुद्धां (परतन्त्रता) पारतन्त्र्य आहेच. (तव दास्यतः इत्) पण तुझे जे सेवक आहेत त्यांनाच मात्र (निजतंत्रता) स्वातन्त्र्य आहे. कारण ते विधिनिषेधातीत आहेत. (अतः एव) असें आहे म्हणूनच (तव) आपली (सेवनं) सेवा करावी असें (मतं) मला वाटतें. (ततः एव) म्हणूनच (वनसेवनं) वन्य फळपुष्पादिकांचें सेवन (चरे) मी करतों. ।। ५१ ।।

( ५२ )

**अन्वयार्थः**—(यदा) जर (नरकोट्यधिपस्य) कोट्यवधि लोकांच्या स्वामीला (नरकः) नरकवास असेल, (नरकोत्तरकोशभृतोऽपि) त्याच-प्रमाणें धनधान्य संपत्ति ज्यांच्याजवळ पुष्कळ आहे अशांनासुद्धां जर नरक असेल, (तदा हि) तर मग (अमानदं) लाजिरवाणें (भैक्ष्यं) हें भिक्षा मागणें (वरं) उत्तम दर्जाचें आहे. (तव यत्परं पदं) कारण अशा भैक्ष्य वृत्तीनें राहिलें असतां आपलें जें श्रेष्ठ पद आहे (एव लभेत) तेंच मिळेल. ॥ ९२ ॥

( ५३ )

**अन्वयार्थः**—(अत एव) माझे ठिकाणीं दृढ वैराग्य उत्पन्न झालें आहे म्हणूनच (योग्यं) जें योग्य असेल तें (योग्याय) योग्य असणाऱ्या (मे) मला (देहि) आपण द्यावें. ( हे स्वतःपूर्णकाम ) कारण आपण पूर्णकाम आहांत, आपणांला मोबदला नको. (मद्दृष्ट्या) माझ्या दृष्टीनें आपण मला निजलेले दिसतां म्हणून म्हणतों कीं (उत्तिष्ठोत्तिष्ठ) आपण आतां उठावें. (प्रभो) सर्वसमर्थ श्रीदत्ता, (जागृहि जागृहि) आपण मला आज्ञा देण्याकरितां आतां जागें व्हा. लवकर जागें व्हा. ॥ ९३ ॥

( ५४ )

**अन्वयार्थः**—(भूभृति) राजा अर्जुन (इति) याप्रमाणें श्रीदत्तमहा-राजांची (स्तुवति) स्तुति करीत असतां (च) आणि (भूभृति) सह्याद्रि पर्वतावर (मूर्छां याति) मूर्छा येऊन पडला असतां (उषसि) प्रातःकालीं (ऋषयः) कश्यपादि ऋषि (च) आणि (देवाः) इन्द्रादि देव (एत्य) त्या पर्वतावर येऊन (ईशं नत्वा) श्रीदत्ताला नमस्कार करून (निर्ययुः) पुनः परत निघून गेले. ॥ ९४ ॥

( ५५ )

**अन्वयार्थः**—(तदनु) कश्यपादि ऋषि व इन्द्रादि देव दर्शन करून गेल्यावर ( उत्थितः श्रीदत्तः ) श्रीदत्तमहाराज उठले. (शिष्याभिवादितः) ज्यांना शिष्यांनीं नमस्कार केला आहे असे ( स्वीकृतशिष्यदत्तामृतः ) शिष्यांनीं दिलेलें पाणी ज्यांनीं घेतलें आहे असे (आचांतः) ज्यांनीं आचमन केलें आहे असे ( श्रितनैर्ऋतदिक्प्रान्तः ) शौचाकरितां नैर्ऋत्य दिशेकडे गेलेले ( कृतमलोत्सृतिः जलाशयमितः ) शौचविधि आटोपून पाण्याकडे गेलेले ( शोधितपद्धस्तमुखदंतः ) पाण्यानें हात, पाय, मुख व दांत धुतले आहेत असे (सुस्नातः) ज्यांनीं स्नान केलें आहे असे ( कृत-संध्योपास्तिः ) संध्यावंदन ज्यांनीं केलें आहे असे ( तर्पितदेवतादिः ) ज्यांनीं ब्रह्मयज्ञ केला आहे असे ( श्रीपत्तनादाहृतयाचितकः ) कोल्हापुराहून ज्यांनीं भिक्षा आणली आहे असे (कृतभुक्तिः) ज्यांनीं भोजन केलें आहे असे (आचांतः) आचमन केलें आहे असे श्रीदत्तात्रेय (पुनर्ध्यानमास्थितः) पुनः ध्यान लावून बसले, (तदा) तेव्हां (प्रणतः शांततपाः) नम्र असा शांततपा नांवाचा शिष्य म्हणाला, ( भगवन् ) हे श्रीदत्ता (उपोषितं) उपाशी व (मूर्छितं) बेशुद्ध अवस्थेंत (स्थितं) असणाऱ्या ( एतं कृतवीर्यसुतं) ह्या कृतवीर्याच्या मुलाला अर्जुनाला (द्रष्टुमर्हसि) आपण डोळे उघडून पाहावें ( इति प्रणिपपात) असें म्हणून श्रीदत्तात्रेयांना शिष्यांनीं नमस्कार केला.॥ ५५ ॥

( ५६ )

**अन्वयार्थः**—(उदारचित्तः) ज्यांचें उदार अंतःकरण आहे असे (दत्तः) दत्तात्रेय (तं) त्या शांततपा नामक शिष्याला (उवाच) म्हणाले, (प्रियाय) मत्प्रिय अर्जुनाला (ससुसिद्धिवित्तः) ऋद्धिसिद्धिसहित (भूगोलः एव) सप्तद्वीपात्मक राज्य (दत्तः) दिलें आहे. (अद्य) पण आज (अस्मै) अर्जुनाला (अदत्तं) न दिलेलें (स्वरादिं) स्वर्गादि ब्रह्मलोकांपर्यंतचें राज्य (ददामि) देतों. (यतः) कारण (एषः) हा माझा (भक्तः) भक्त आहे.॥५६॥

( ५७ )

**अन्वयार्थः**—(कृतवीर्यसुतः) कृतवीर्य राजाचा मुलगा अर्जुन (र्‍हीतः) लज्जायुक्त (नतः) व नम्र झाला आणि (अमृतं) मला मोक्ष (वव्रे) पाहिजे असें म्हणाला. (यतः) कारण (श्रुतभ्रांतिनिवृत्तिश्च) शास्त्राध्ययनानें उत्पन्न झालेले असंभावनादि भ्रम मोक्षानेंच नाहींसे होतात. तेव्हां (प्राचामाचार्यः) ब्रह्मादि देवांचेहि जे गुरु श्रीदत्तात्रेय (तं) अर्जुनाला (आह) म्हणाले. ।। ५७ ।।

**भावार्थः**—लोभ दाखविला असतांहि अर्जुनानें स्वर्गाची अपेक्षा न करतां मोक्षच मागून घेतला. कारण ब्रह्मज्ञानानें, शास्त्रश्रवण केल्यावर ज्या शंका येतात त्या नाहींशा होतात. प्रमाणासंभावना, प्रमेयासंभावना व विपरीत भावना असे तीन प्रकारचे भ्रम आहेत. हे ज्ञानाला म्ह० मोक्षाला विघ्न करतात, त्यांतील पहिला प्रमाणासंभावना अद्वैत व निरतिशय अखंड एकरस जें ब्रह्म त्याला प्रतिपादक जी प्रमाणभूत श्रुति तिच्याबद्दल शंका येणें. दुसरा प्रमेयासंभावना आपल्या ज्ञानांत विषय जें ब्रह्म तेंच आपलें वस्तुतः स्वरूप आहे कीं नाहीं असा संशय येणें. तिसरा विपरीत भावनानित्यनिरतिशय सुखरूप व सर्वज्ञ जें ब्रह्म तें अनित्य सातिशय दुःखी व किंचिज्ञ असें माझें स्वरूप कसें असूं शकेल. याप्रमाणें भ्रमत्रयानें भ्रमग्रस्त होऊन शास्त्र वाचून अथवा श्रवण करूनहि त्या मनुष्यास ब्रह्मज्ञान होऊं शकत नाहीं. म्हणून त्याकरितां नेहमीं श्रवण मनन व निदिध्यासन केलें पाहिजे व यानेंच हे भ्रम नाहींसे होऊन ब्रह्मज्ञान होऊं शकतें. म्हणूनच अर्जुनानेंहि इतर स्वर्गादि राज्य न मागतां मोक्षच मागून घेतला. नंतर ब्रह्मादि देवांचे गुरु श्रीदत्तात्रेय अर्जुनाला म्हणाले ते पुढील श्लोकांत सांगतात. ।। ५७ ।।

( ५८ )

**अन्वयार्थः**—( हे भूतिनाथ ) हे ऐश्वर्यसंपन्न अर्जुना, (बृहस्पतिः) देवांचे गुरूंनीं (देवपतिं) इन्द्राला (गाथाततिं) जी हर्कागत (वक्ति स्म)

सांगितली, (तां) ती हकीगत (श्रृणु) मी तुला सांगतों ऐक. (पुरा) पूर्व-युगामध्यें (अत्र) पृथ्वीतलावर (शास्त्रवित्) कोणी एक शास्त्र जाणणारा (अभवत्) होऊन गेला. (त्वाष्ट्रं शास्त्रं विद्वान् सः) शिल्पशास्त्र जाणणारा तो शास्त्री त्यानें (कृतभूरिगेहः) पुष्कळ लोकांची सुंदर तऱ्हेनें घरें बांधिलीं. ॥ ५८ ॥

( ५९ )

**अन्वयार्थः**—(सः) तो शिल्पशास्त्री (आयादिवित्) आयव्यय जाणणारा (यस्य) त्यांनें कोणाचेंहि (गृहं चक्रे) घर केलें कीं (सायास-दुःखार्तिरुगादिहीने) त्रास दुःखपीडा रोगरहित (तद्भवने) अशा त्या घरांत (यज्ञादयः) यज्ञयागादि (अमिताः स्युः) अनेक पुण्यकारक क्रिया होत असत. (ततः) याप्रमाणें कांहीं काळ गेल्यावर (सुपुण्यः) चांगल्या प्रकारचें पुण्य ज्याचें आहे (सः) असा तो शास्त्री (मृतः) मेला व (स्वर्गमितः) स्वर्गाला गेला. ॥ ५९ ॥

( ६० )

**अन्वयार्थः**—(भूयः) पुनः (सः) तो शास्त्री (अत्र) पृथ्वीवर (नृपो भूत्वा) राजा होऊन (ततः भूयोऽपि) नंतर पुनः पुनः जन्माला आला व मेलाहि पण शेवटीं (विप्रः अभूत्) ब्राह्मण झाला व (अमृतं गतः) मोक्षाला गेला (हि) असें पुराणांत प्रसिद्ध आहे. (एषा तु) ही तर (आदिगाथा) त्या सातपैकीं पहिली गोष्ट आहे. (अपरा तु गाथा) आतां दुसरी गोष्ट सांगतों (कश्चन) कोणी एक (कामशास्त्री) कामशास्त्र जाण-णारा (विप्रः) ब्राह्मण (अभवत्) होऊन गेला. ॥ ६० ॥

( ६१ )

**अन्वयार्थः**—(सः) तो कामशास्त्री (स्त्रीसुमान्यः) स्त्रियांना अत्यंत प्रिय असा (वृतराजकन्यः) ज्यानें राजकन्येशीं विवाह केला आहे असा (वात्स्यायनोक्तं सुरतं) वात्स्यायन कामसूत्राप्रमाणें संभोगक्रिया (स वेद)

तो जाणत असे. (मृतः सः) कांहीं दिवसांनीं तो कामशास्त्री मेला,(गंधर्वतां प्राप्य) व गंधर्व होऊन (धातृप्रसादतः) ब्रह्मदेवाच्या कृपाप्रसादानें (सः) तो कामशास्त्री (तत्र) त्या गंधर्व अवस्थेंत असतांना (मुक्तिं गतः) मोक्षाला गेला. ॥ ६१ ॥

( ६२ )

**अन्वयार्थः**—(विकम्प्रःसन्) एकचित्त करून (तथा) पूर्वीप्रमाणें (अन्यगाथां) तिसरी गोष्ट (शृणु) ऐक. (इह) या देशांत (सतग्रहग्रस्तः) सात पिशाचांनीं पछाडलेला (विप्रः) एक ब्राह्मण (आस) होता. ( क्षिप्रप्रसादः भगवान् ) आशुतोष श्रीदत्तात्रेय (तदोकः) त्या ब्राह्मणाच्या घरीं (प्रातः) आले, (येन) व श्रीदत्तात्रेयांच्या दर्शनानें (लोकः) त्या ब्राह्मणाचें शरीर (सुगुप्तःखलु) खरोखर पिशाचपीडेपासून सुरक्षित झालें. ॥ ६२ ॥

( ६३ )

**अन्वयार्थः**—( द्विजस्य पिता ) पिशाचपीडित ब्राह्मणाच्या बापानें (तल्लब्धमंत्रैः) त्या श्रीदत्तात्रेयाच्या कृपेनें मिळालेल्या मंत्रांनीं (विधिना) न्यासध्यानादि विधीनें ( स्वजस्य प्रसादात् ) व दत्तात्रेयांच्या कृपेनें (क्रमतः) क्रमाक्रमानें एकेक पिशाच (न्यवारयत् ) नाहींसें केलें. (यद्वत्) ज्याप्रमाणें (इह) मोक्षमार्गामध्यें (क्रमात् ) क्रमानें (योगैः) दोषदृष्टीला उपायभूत असलेल्या योगांनीं म्ह० चित्तवृत्तिनिरोधांनीं (आत्मदोषाः) आत्म्याचे किंवा मनाचे रागादि दोष नाहींसे केले जातात, त्याप्रमाणें (तदा) पिशाचांचा नाश झाल्यावर (एषः) त्या ब्राह्मणाचा मुलगा (क्रमात्) श्रवण, मनन, निदिध्यासनाच्या योगानें (मुक्तिमगात्) मोक्षाला गेला. ॥ ६३ ॥

( ६४ )

**अन्वयार्थः**—(तथा) त्याचप्रमाणें (अन्यगाथां) आणखी एक गोष्ट सांगतों. (शृणु) ऐक. ( स्वकर्मणाभ्यर्चितदेवदत्तः ) आपल्या वर्णाश्रमा-

चाराप्रमाणें वागून श्रीदत्तात्रेयांची ज्यानें उपासना केली आहे असा (विष्णुदत्तः) विष्णुदत्त नांवाचा ब्राह्मण माहुरपुरांत होता. (बल्यन्नभुजा भूतेन) भूतबली खाणाऱ्या कोणी एका पिशाचानें (त्रिर्दत्तोऽपि दर्शितः) तीन वेळेस त्या विष्णुदत्त ब्राह्मणाला श्रीदत्तात्रेयांचें दर्शन करवून दिलें. (येन) ज्या श्रीदत्ताचें दर्शन झालें त्यानें (परोऽपि) मोक्षहि (दत्तः)विष्णुदत्ताला दिला. ॥ ६४ ॥

( ६५ )

**अन्वयार्थः**—(तथापि) त्याचप्रमाणें (गाथापि) पांचवी गोष्ट सांगतों ऐक. (पिशुनः) अत्यंत दुष्ट (झुटिंगः) एक पिशाच (साध्वीशतुल्याकृतिगः) एका पतिव्रतेच्या नवऱ्याप्रमाणें आपण रूप घेऊन (सतीगः) कपटानें त्या पतिव्रतेशीं तिचा पति बाहेर गेला असतां संभोग करीत असे. (तयोः स्वरादिसाम्येऽपि) त्या दोघांचा आवाज, स्वरूप सौन्दर्य हें सर्व एकसारखें जरी होतें तरीपण (द्विजेन) त्या विष्णुदत्तानें (अनृतिवत्) मंत्राच्या सामर्थ्यानें (कुसंगः झुटिंगः) दुष्ट तो पिशाच (बद्धः) एका मडक्यांत वाळून बंद करून टाकला. ॥ ६५ ॥

( ६६ )

**अन्वयार्थः**—(तथापि) त्याचप्रमाणें (गाथा) सहावी गोष्ट सांगतों ऐक. (अपिबते) औषध म्हणून न पिणाऱ्या (रुग्णाय अर्भकाय) रोगी लहान मुलाला (खंडप्रलोभनात्) साखरेच्या लाडवाचें मिष दाखवून (तदम्बा) त्या मुलाची आई (निंबं प्रददौ) ज्याप्रमाणें कडु लिंबाचा रस पाजते, (तथा) त्याप्रमाणें (भवपीडिताय) संसार हाच कोणी एक रोग त्यांनीं पीडित मनुष्याला (श्रुतिः) चातुर्मास्य याग केला कीं पुष्कळ पुण्य मिळतें असें सांगणारी श्रुति (अमुख्यफलं स्वरादि) स्वर्गादि गौण फल सांगून त्या मिषानें मुख्य फल जें कर्म त्यामध्यें रुचि उत्पन्न करते. ॥ ६६॥

**भावार्थः**—याप्रमाणें पांच गोष्टी सांगून सहावी गोष्ट सांगणेस आरंभ करतात व ती दोन श्लोकांत सांगतात. आरोग्य होण्याकरितां कडू लिंबाचा रस पी असें रोगी मुलाला सांगितलें तर तो कडू आहे म्हणून पिणार नाहीं म्हणून जर युक्तीनें त्या मुलाला आई सांगेल कीं, अरे, तो रस पी मग मी तुला साखरेचा लाडू देईन, असें प्रलोभन करून आईनें त्या मुलास सांगितलें तर तो मुलगा झटकन् तो रस पितो व निरोगी होतो. त्याचप्रमाणें संसार हाच कोणी एक रोग त्यांनीं पीडित मनुष्याला श्रुति माऊली सांगते कीं, अरे कर्म करा, पण त्यांत कष्ट फार म्हणून कोणीहि कर्म करण्यास प्रवृत्त होत नाहीं. मग श्रुति सांगते कीं या कर्मानें अक्षय्य पुण्य मिळतें असे गौण फल स्वर्गादि सांगून मुख्य फल म्हणजे चित्तशुद्धि करून जीवाला आत्मस्वरूप करते आणि चित्त-शुद्धि कर्मानें होतें म्हणून कर्माचें स्वर्गादि गौण फल सांगून श्रुति कर्मामध्यें जीवाची रुचि उत्पन्न करते व त्यामुळें चित्तशुद्धि होते. नंतर ज्ञानोत्पत्ति होऊन अज्ञान नाश होतो. एकंदरींत चित्तशुद्धि कर्मानें होते व त्यानंतर शमदमादि साधनानें ज्ञान होतें. सारांश, अंतःकरणाच्या शुद्धीकरतां कर्माची अपेक्षा आहे म्हणून परंपरेनें कर्मच ज्ञानाला कारणी-भूत असल्यानें श्रुतीनें तें सांगून यत्किंचित् कर्मानेंहि जीवांचा उद्धार केला. ॥ ६६ ॥

( ६७ )

**अन्वयार्थः**—(सत्यर्थितः) माझ्या पतीचा रोग बरा करून मला सौभाग्यदान द्यावें अशी पतिव्रतेनें प्रार्थना केलेला (कृती) कुशल विष्णु-दत्त ( प्रायश्चित्त्यस्तगुल्मादिरुजं ) ज्याचा देवद्रोहादि पापानें झालेल्या गुल्मव्याधीचा नाश प्रायश्चित्तादि विधीनें केला आहे अशा (तं द्विजं) त्या ब्राह्मणाला (रसेन) रसायनादि औषधें देऊन (प्रकृतिं) पूर्वीप्रमाणें निरोगी (निन्ये) केलें (भवार्तमिव) संसारपीडित मनुष्याप्रमाणें. ॥ ६७ ॥

( ६८ )

**अन्वयार्थः**—( अथ अंतिमा गाथा) आतांपर्यंत सात गोष्टी सांगितल्या पण त्याचप्रमाणें ही एक शेवटची गोष्ट आहे ती सांगतों ऐक. (योगभ्रष्टः) ध्यानधारणा करीत असता मध्येंच मेलेला योगी ज्ञान नसल्यामुळें पुनः सत्कुलांत जन्मास येतो. त्याला योगभ्रष्ट म्हणतात. असा कोणी योगभ्रष्ट ( द्विजस्य अर्भकः ) एका ब्राह्मणाचा मुलगा (आस) होता. (उज्झितभोगसंगः ) आपलें खाणेंपिणें किंवा कोणत्याहि गोष्टींशीं संगति न करणारा असा, ( संसर्गहत्यै कृतदुष्टचेष्टः ) ज्यानें लोकांशीं आपला संबंध येऊं नये म्हणून विचित्र चेष्टा करून वेडेपणा प्रगट केला आहे असा, ( संबंधभीत्या ) हा पिता ही माता इत्यादि संबंधाला भ्याल्यामुळें (अस्य) त्या योगभ्रष्ट मुलाला ( गुरुः न चेष्टः ) आपले आईबापसुद्धां इष्ट वाटत नसत. ॥ ६८ ॥

( ६९ )

**अन्वयार्थः**—( विष्णुदत्तः ) विष्णुदत्तांनीं ( अंतःसंगविसर्गेण ) आंतून संगति सोडावी असें सांगून ( तस्य भयं व्यस्य) त्या मुलाचें भय नाहींसें करून (नयं आदेश्य) वेदान्तशास्त्रोपदेश करून (तं) त्या मुलाला (सतीं प्रकृतिं आनयत्) त्याचा वेडेपणा घालवून शहाणें केलें. ॥६९॥

( ७० )

**अन्वयार्थः**—(हे आर्य) अरे अर्जुना (दभ्राणामदभ्राणां) लहान व मोठ्या (शास्त्राणां) शास्त्रांचें (पर्यवसानं तु) शेवटीं पर्यवसान तर (स्रोतसां सिंधौ इव) सर्व नद्या शेवटीं ज्याप्रमाणें समुद्रामध्येंच जातात त्याप्रमाणें (परेऽद्वये ब्रह्मणि) श्रेष्ठ व एकमेव जें ब्रह्म त्यामध्येंच आहे असें तूं समज. ॥ ७० ॥

( ७१ )

**अन्वयार्थः**—(इदं) हें प्रत्यक्ष दिसणारें जगत् (पुरा) सृष्टिउत्पत्तीच्या पूर्वीं (अजं अद्वयं ब्रह्मैवैकं) जन्मादि विकाररहित असें अद्वितीय ब्रह्म-

स्वरूपानेंच होतें. (यन्मायया रूपाख्यात्मकमेतत्) ज्या ईश्वराच्या मायेनें नामरूपात्मक ब्रह्मादिस्तंबपर्यंत हें सर्व जगत् (उज्जृंभितम्) उत्पन्न केलें. (अत्र) या ब्रह्मामध्यें (सदसत) जगद्रूपी कार्य सत् व कारणमात्र प्रकृतिमहत्तत्त्व अहंकार वगैरे असत् (तत्कार्यकमपि मिथ्या) त्या असत्कारणाचें कार्य पंच महाभूतें, चतुर्दश भुवनें वगैरे कार्य करूनहि तें कारण मिथ्या म्ह. खोटेंच आहे. (एतदनुप्रवेशातः कार्यकृत्) पण त्या खोटया कारणाला ब्रह्माची सहायता घेतल्याशिवाय मात्र कोणतेंहि कार्य करतां येत नाहीं. (इतः परं)पूर्वी सांगितल्यापेक्षां निराळें म्ह. प्रकृतिविकृतिरहित (सत्यादिरूपं) सत्य, ज्ञान, आनंद रूप असें जें (तत्त्वं) मूळस्वरूप तें तूं (धिया विद्धि) सूक्ष्म बुद्धीनें जाण आणि(योगेन सुखी कृती भव) योगाभ्यास करून निरतिशय आनंदरूप व कृतकृत्य हो. (भोगेन किम्) परमसुख मिळाल्यावर मग या क्षुद्र राज्यभोगाची काय पर्वा! ॥७१॥

**भावार्थः**—सर्व शास्त्रें ज्या परब्रह्माचें वर्णन करतात असें तें पर ब्रह्म कोणतें असें म्हणशील तर हे अर्जुना, त्या परब्रह्माचें स्वरूप तुला सांगतों. आपणाला प्रत्यक्ष दिसणारें हें जगत् उत्पन्न होण्यापूर्वी निर्विकार अद्वितीय असें ब्रह्म तेंच एकमेव होतें. माया जरी अनादि असली तरी तिच्यामुळें द्वैत येऊं शकत नाहीं. कारण तिला वस्तुस्वरूप नसल्यानें व ती अनिर्वचनीय असल्यानें ब्रह्मापेक्षां विलक्षण द्वितीय म्हणून म्हणतां येत नाहीं. एकंदरींत सजातीय, विजातीय व स्वगत अशा भेदत्रयानें रहित ब्रह्म होतें. पूर्वी एकरूपानें असणारें व आतां तेंच द्वैतरूपानें भासतें. हा विरोध वाटतो पण तो सत्य आहे. जें आम्हांला द्वैत दिसतें तें केवळ मायेमुळेंच, वास्तविक नाहीं. त्यामुळें विरोध येऊं शकत नाहीं. यालाच 'बाधासामानाधिकरण्य' असें म्हणतात. म्हणजे जें द्वैत दिसतें तें मायेमुळेंच, वास्तविक नाहीं. आणि अशा ब्रह्मानेंच मीं पुष्कळ व्हावें अशी इच्छा केली व मायाउपाधि घेऊन आकाशादि सर्व जगत् उत्पन्न केलें.

तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्' आणि त्या जगांत समाविष्ट झालें. त्यामुळें चतुर्दशभुवनांची निर्मिति व त्यांतील लोकांची निर्मिति प्रत्यक्ष सत्य वाटत असूनसुद्धां ती मिथ्या म्हणजे खोटी आहे असें म्हणणें सयुक्तिक वाटतें. नाहींतर मिथ्याप्रकृतिरूप कारणांपासून दृश्यमान सत्य कार्य कसें होईल, ही शंका ब्रह्म त्यांत समाविष्ट झाल्यामुळें आतां येऊं शकत नाहीं. ज्याप्रमाणें राजाची सही किंवा शिक्का एखाद्या कागदाच्या चिठोरीवर असल्यास त्या जड कागदाचा खरेपणानें व्यवहार केला जातो. त्याचप्रमाणें या जगालासुद्धां ब्रह्मामुळेंच सत्यता आली आहे. अर्थात् जी ब्रह्माची सत्ता तीच जगाची सत्ता. म्हणजे ब्रह्माहून जगाला स्वतंत्र अस्तित्वच नाहीं. सर्वच ब्रह्ममय आहे. तेव्हां अशा या प्रकृतिविकृतिस्वरूपाहून विलक्षण म्हणजे निराळें असंग सत्य, ज्ञान, आनंदरूप व जें देहेंद्रियादि विलक्षण जें तुझें चैतन्य तें एकच आहे, असें तूं सूक्ष्म बुद्धीनें जाण. सर्व भूतांमध्यें सूक्ष्म रूपानें हें ब्रह्म राहिलें असल्यामुळें आम्हांला प्रत्यक्ष दिसत नाहीं. पण 'दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या' या उक्तीप्रमाणें अंतःकरणशुद्धि झाली असतां त्या ब्रह्माचा साक्षात्कार होतो. तेव्हां अशा या योग, ध्यान, धारणाजन्य ज्ञानानें निरतिशय सुखरूप होऊन कृतकृत्य हो. एवढा आत्मरूप मोठा लाभ झाल्यावर यत्किंचित् क्षुद्र राज्यभोगाची कोण बरें इच्छा करील? अर्थात् कोणीहि करणार नाहीं. ॥ ७१ ॥

( ७२ )

**अन्वयार्थः**—(प्रत्यहं) दररोज (यमाद्याभिज्ञः) यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधि हीं अष्टांगें जाणणारा, (आसनज्ञः) पद्मासनादि जाणणारा, (इडया असुं पीत्वा) इडा नामक नाडीनें श्वासपूरण करून (कृतकुंभकः) मध्यें कुंभक म्हणजे प्राण स्तब्ध करून (अर्कात् त्यक्त्वा) पिंगला नामक नाडीनें पुनः श्वास बाहेर सोडून

(पुनर्व्यस्तं) पुनः पूर्वीपेक्षां विरुद्ध म्ह० पिंगलेनें आंत घेऊन इडेनें बाहेर सोडावा. (इति त्रिकालं) याप्रमाणें त्रिकाल म्ह० सकाळ, दुपार व संध्याकाळ करावें. (हे नृप) हे राजा (त्रिमास्या) याप्रमाणें तीन महिन्यांनंतर अभ्यास केला असतां (अलं) निश्चयानें (सः) तो योगी (कालं जयेत्) समाधि लावूं शकतो. ॥ ७२ ॥

**भावार्थः**—ज्या योगाभ्यासानें आनंदानुभव आपणाला प्राप्त होतो तो योग कोणता हें सांगतात. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार धारणा, ध्यान, समाधि याप्रमाणें योगाचीं अष्टांगें जाणणारा पद्मासनादि आसनें व शास्त्रशुद्ध प्राणायाम केला असतां योगी होतो. तो प्राणायाम याप्रमाणें इडा व पिंगला अशा दोन नाड्या आपल्या शरीरांत आहेत. चित्त एकाग्र करून आसनाधिष्ठित होऊन प्रथमतः इडा नामक नाडीनें (म्हणजे डाव्या नाकपुडीद्वारां) श्वास आंत घेऊन तो आंत थांबवून ठेवून म्हणजेच कुंभक करून नंतर पिंगला नामक नाडींतून उजव्या नाकपुडीद्वारां बाहेर सोडावा नंतर याच्या उलट म्ह. पिंगलेनें श्वास आंत घेऊन द्वाराबाहेर सोडावा; याप्रमाणें सकाळ, दुपार व संध्याकाळ प्राणायामाचा अभ्यास केला असतां तीन महिन्यांनंतर निश्चयानें तो योगी समाधि लावूं शकतो. ॥ ७३ ॥

( ७३ )

**अन्वयार्थः**—(घटशोधनाज्ञः) देहशुद्धि न जाणणारा (त्रिबंधयुक्ताष्टककुंभकाज्ञः) जालंधरबंधयुक्त सूर्यादिभेदरूपी कुंभक न जाणणारा, (मुद्रादशकानभिज्ञः) शक्तिचालनादि ज्या दहा मुद्रा आहेत त्या न जाणणारा, (नादश्रवणानभिज्ञः) आंतून अनाहतनाद येत असतो तो न जाणणारा, (विज्ञोऽपि) स्वतः ज्ञानी असूनहि (योगसिद्धिं) योगानें मिळणारी सिद्धि जिला जीवन्मुक्ति असें म्हणतात, ती (नोपैति) वर सांगितलेला योगी प्राप्त करून घेऊं शकत नाहीं. ॥ ७३ ॥

**भावार्थः**—धौति १, बस्ति २, नेति ३, त्राटक ४, नौलिक ५ व कपालभाति ६ या सहा प्रकारच्या कर्मांनीं योग्यानें देहशुद्धि करावयाची असते. ही देहशुद्धि झाल्यावर मग प्राणायाम करणेस कठिणता येत नाहीं. पण ही न करणारा योगी व पद्मासन घालून हनुवट छातीवर टेकवून खालीं मान घालून केला जाणारा प्राणायाम याला जालंधरबंधयुक्त प्राणायाम असें म्हणतात. प्राणायामांत आठ प्रकारचे कुंभक आहेत. ते म्हणजे सूर्यभेद १, उज्जायी २, सीत्कारी ३, शीतली ४, भस्त्रिका ५, भ्रामरी ६, मूर्च्छा ७ आणि प्लाविनी ८ याप्रमाणें आहेत. **सूर्यभेद** म्हणजे उजव्या नाकपुडीनें श्वास पूरक करून कुंभक करून नंतर डाव्या नाकपुडीनें रेचक म्हणजे श्वास बाहेर सोडणें याला सूर्यभेद असें म्हणतात. **उज्जायी** म्हणजे मुख बंद करून इडा व पिंगला या नाडीनें श्वास हळूं हळूं आंत घ्यावा. तो घेत असतां कंठापासून हृदयापर्यंत त्याचा आवाज व्हावा व सूर्यभेदाप्रमाणेंच कुंभक करून नंतर डाव्या नाकपुडीनें रेचक करावा. याला उज्जायी असें म्हणतात. **सीत्कार** म्हणजे यांत जिभेनें आवाज करीत तोंडानें कुंभक करावा व रेचकमात्र दोन्ही नाकपुडीनें करावा. याला सीत्कार असें म्हणतात. **शीतली** म्हणजे यांत जीभ ओठाच्याबाहेर काढून श्वासाचें पूरण करावें. नंतर सूर्यभेदनाप्रमाणें नाकपुडीनें रेचक करावा याला शीतली असें म्हणतात. **भस्त्रिका** म्हणजे दोन्ही पाउलें मांडीवर ठेवून म्हणजे पद्मासन घालून ताठ बसून तोंड बंद करून नाकाच्या एका पुडींतून प्रथम रेचक करावा म्ह. श्वास बाहेर सोडावा. सोडतांना त्याचा आवाज होऊं नये व दुसऱ्या नाकपुडीनें श्वासपूरण करावा. उजव्या हाताच्या किरंगळी व तिच्या जवळील बोटांनीं डावी नाकपुडी बंद करून ठेवून उजव्या नाकपुडीनें श्वास जोरानें बाहेर सोडावा. असें करतांना थकल्यास अंगठ्यानें उजवी नाकपुडी बंद करून डाव्यानें श्वास बाहेर सोडावा. याप्रमाणें अदलाबदल करून श्वासप्रश्वास केला असतां भस्त्रिका नामक कुंभक होतो. **भ्रामरी** म्हणजे वेगानें

भोंग्याच्या आवाजाप्रमाणें आवाज करून प्राणायाम व कुंभक करावा व नंतर हळूं हळूं रेचक करावा. याला भ्रामरी असें म्हणतात. **मूर्च्छा** म्हणजे यांत पूरक करून जालंधरबंधानें पुष्कळ वेळ कुंभक करून नंतर हळूं हळूं रेचक करावा, याला मूर्च्छाकुंभक असें म्हणतात. **प्लाविनी** म्हणजे सर्व शरीरभर प्राणसंचार करून त्या प्राणांत जो योगी बुडून जातो म्ह. प्राणमय होतो. ज्याप्रमाणें कमळपत्र आश्रयाशिवाय पाण्यांत राहतें त्याप्रमाणें हा योगी प्लाविनी कुंभकानें पाण्यावरून चालूं शकतो. याला प्लाविनी कुंभक म्हणतात. याप्रमाणें जालंधरबंधयुक्त सूर्यभेदादि अष्टकुंभक न जाणणारा योगी, त्याचप्रमाणें महामुद्रा १, महाबंध २, महावेध ३, खेचरी ४, उडयानबंध ५, मूलबंध ६, जालंधरबंध ७, विपरीतकरणी ८, वज्रोली ९ व शक्तिचालन १०, या दहा मुद्रा न जाणणारा व कान, नाक, डोळे, मुख हे सर्व बंद करून मन एकाग्र करून बसलें असतां अनाहत म्ह. न वाजवितां झालेला आरंभीं नगाऱ्यासारखा व शेवटीं घंटे-सारखा नाद ऐकूं येतो तोहि ज्यांनीं ऐकला नाहीं, पण सर्व योगप्रक्रि-येचें ज्ञान मात्र उत्तम आहे अशा योग्याला जीवन्मुक्तिरूप योगसिद्धि मिळत नाहीं. म्हणून या सर्व क्रिया केल्या पाहिजेत तरच स्वरूपसुखाचा अनुभव येईल.॥ ७३ ॥

( ७४ )

**अन्वयार्थः**—(सपंचविपले पले) पांच विपलांसहित दोन पल म्ह० इतका वेळ (अंडजः प्राणः) जर ब्रह्मरंध्रांत प्राण राहील तर (प्राणायामः) त्याला प्राणायाम असें म्हणावें. (द्वादशघ्नोत्तरोत्तरं) अष्टांगामध्यें प्रत्येक अंग बारा बारा पट वाढविणें (प्रत्याहारादयो ज्ञेयाः) याचप्रमाणें प्राणायामाच्या बारा पट प्रत्याहार करावा. ॥ ७४ ॥

**भावार्थः**—जर पांच विपळांनीं सहित दोन पळें इतका काळ ब्रह्म-रंध्रांत प्राण राहिला तरच त्याला प्राणायाम असें म्हणावें आणि तोच

प्राणायाम अंतःकरणशुद्धि करून सर्व पापांचा नाश करतो. केवळ पोटामध्यें श्वास दाबून ठेवून जर प्राणायामरूपी क्रिया केली तर तो प्राणायाम होत नाहीं व त्यानें अंतःकरणशुद्धिहि होत नाहीं. आतां प्रत्येक जीं अष्टांगें आहेत तीं किती वेळ करावीं याचा खुलासा करतात. यम जर १पट केला तर त्याच्या बारापट नियम व नियमाच्या बारापट आसन. याप्रमाणें प्राणायामादि सर्व प्रत्येकाच्या बारा बारापट वाढवावें. याप्रमाणें केलें असतां चोवीस तासांत एक ध्यान होतें व बारा दिवसांनीं समाधि म्हणजे ब्रह्मरंध्रांत जर बारा दिवस प्राण राहील तर समाधि साध्य होईल. पुढील श्लोकांत प्रत्याहार व धारणा म्हणजे काय तें सांगतात. ॥ ७४ ॥

( ७५ )

**अन्वयार्थः**—(प्राणे जिते) याप्रमाणें प्राणायाम करून प्राणाला वश केलें असतां (हृदा) सत्त्वप्रधान अंतःकरणानें (अर्थेभ्यः) शब्दादि बाह्य विषयापासून (अखिलेन्द्रियम्) सर्व इंद्रियांना (प्रत्याहृत्य) पुनः आंत ओढून घेऊन (अविक्षिप्तम् ), विषयाकडे न जाऊं देतां (अचंचलं) शांत अशा (मनः) मनाला (आत्मनि) आत्म्याचे ठिकाणीं (स्थिरीकुर्यात्) स्थिर करावें. ॥ ७५ ॥

**भावार्थः**—पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्राणायाम करून प्राणाला आपल्या ताब्यांत ठेवल्यावर मग प्रत्याहार करावा, म्हणजे अंतःकरण हें त्रिगुणात्मक प्रकृतीच्या सत्त्वगुणापासून झालें आहे, अर्थात् तें निर्मल आहे अशा अंतःकरणानें शब्दादि विषयाकडे गेलेलीं पांच इंद्रियें विषयापासून परत फिरवावीं; या क्रियेला प्रत्याहार असें म्हणतात. एकदां प्रत्याहार झाला कीं नंतर मनोजय करण्याकरितां ( अंतःकरण व मन एकच ) विषयांकडे मनाला जाऊं न देतां त्याला शांत करून म्ह० त्यांतील जो थोडा रजोगुण आहे तो शांत करून तें आत्म्याचे ठिकाणीं स्थिर करावें, यालाच धारणा असें म्हणतात. ॥ ७५ ॥

( ७६ )

**अन्वयार्थः**—(तदनु) याप्रमाणें मन स्थिर केल्यावर (श्रुत्यनुकूल-युक्त्यनुसारी) श्रुतीला अनुकूल अशा युक्तीचें अनुसरण करणारा अधिकारी (गुरूक्तम् ) गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें (षड्लिङ्गवित्तम्) उपक्रमादि षड्विध लिंगांनीं तात्पर्यावधारण करून जाणलेले (भागत्यागलक्षितम् ) विरुद्ध जें किंचिज्ञत्व व सर्वज्ञत्व हे दोन भाग टाकून लक्षणेनें मिळणारे ( सोऽहमात्मेत्यभेदतः श्रुतं परमात्मैकत्वं ) तो मी आत्मा आहें अशा श्रुतींनीं अभेद रूपानें सांगितलें जाणारें ब्रह्मात्मैक्य करून (विजातीय-प्रत्ययनिरासपूर्वकं) असत् जड आणि दुःखरूप जो प्रत्यय त्याचा निरास करून (सजातीयप्रत्ययप्रवाहीकरणं) सत्यज्ञानानंदादि जो सजातीय प्रत्यय त्यानें सहित मी आहें असें जाणून (अनुक्षणं) प्रत्येक क्षणीं (विपर्यास-निरासकृत् ) विरुद्ध धर्माध्यासांचा निरास करणाऱ्यानें (निदिध्यासेत्) याप्रमाणें निदिध्यासन करावें. ॥ ७६ ॥

**भावार्थः**—याप्रमाणें धारणा करून मन स्थिर केल्यावर श्रुत्यनुकूल ज्या तर्कानें श्रुतीला बाध येणार नाहीं अशा तर्कानें म्हणजे युक्तीनें गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें उपक्रमोपसंहारादि जीं षड्विध लिंगें त्यांनीं तात्पर्यावधारण करून 'सोऽहमात्मा' या वाक्यांनीं सांगितलेल्या जीव-ब्रह्मैक्य श्रुतीमध्यें लक्षणेनें म्ह० जीव किंचिज्ञ आहे व ब्रह्म सर्वज्ञ आहे तर दोघांचें ऐक्य कसें होणार ? पण ऐक्य करण्यामध्यें विरोधी जें किंचिज्ञत्व व सर्वज्ञत्व हे भाग टाकल्यावर फक्त चैतन्य मात्र शिल्लक राहतें व तें तर एकच आहे. हा वाक्यार्थ लक्षणेनें मिळाल्यावर व त्यामुळें ऐक्यबुद्धि झाल्यावर जीवामध्यें भासणारें नश्वरत्व, जडत्व व दुःखत्व या सर्वांचा निरास करून त्याचें मूळचें स्वरूप जें सत्यज्ञानानंदादि अखंडैकरस जो ब्रह्मानुभव त्याचा निरंतर अनुभव घ्यावा. यालाच निदिध्यास असें म्हणतात. आणि हा निदिध्यास नेहमीं करण्याचें कारण हें कीं आपणांला नेहमीं जो

विपर्यास म्हणजे मी दुःखी वगैरे विरुद्ध धर्माध्यास होत असतो तो होऊं नये व आपलें मूळचें स्वरूप आपणांला समजावें याकरितां हा निदिध्यास सांगितला आहे. ॥ ७६ ॥

( ७७ )

**अन्वयार्थः**—(हे नृप) हे राजा (कुबुद्धयः) मंदबुद्धि असणारे (ते) लोक (भोगबुद्ध्या) उपभोग घ्यावा या बुद्धीनें (याः सिद्धयः) ज्या सिद्धि (आददते) प्राप्त करून घेतात (एताः) त्या सिद्धि (इह) मोक्षमार्गांत असतांना (उपस्थिताः अपि) जरी प्राप्त झाल्या तरी (तापदाः) त्या पीडाकारक आहेत. म्हणून (ताः) त्या सिद्धि (त्यज) तूं टाकून दे. ॥ ७७ ॥

( ७८ )

**अन्वयार्थः**—( समाधिसमये विक्षिप्तं चित्तं ) समाधीच्या वेळीं चंचल झालेलें चित्त (शमयेत्) शांत करावें. (लये बोधयेत् ) जर मनाला निद्रा येऊं लागली तर जागें करावें (च) आणि (तत् ) तें चित्त (अभये आत्मनि संस्थं) जर निर्भय अशा आत्म्यामध्यें स्थिर असेल तर (न चालयेत् ) त्याला हालवूं नये.(मध्येऽसाररसं) आत्मनिष्ठ असतांना असार जो आनंदरस त्याचा (नास्वादयेत् ) स्वाद घेऊं नये. (चित्तं संयमितं) अशा रीतीनें चित्ताचा संयम करून ( निर्वातदीपस्थितं ) शांत स्थळीं असलेल्या दिव्याप्रमाणें जर मन शांत असेल तर (तदेव हि शांतं समाधिगतं) त्या शांत अशा चित्तालाच समाधीमध्यें आहे असें म्हणतां येईल; म्हणूनच (परं रसं इतं) परमानंदाला प्राप्त झालें असें (मतं) वाटतें. ॥७८॥

( ७९ )

**अन्वयार्थः**—(ब्रह्ममूर्तिः) जे ब्रह्मरूप आहेत (शून्यवृत्तिः) ज्यांच्या चित्तांत् कोणत्याहि वृत्ति नाहींत असे (स्वात्मरतिः) आत्मनिष्ठ, (भिन्नसंशयहृद्ग्रंथिः) ज्यांचे संशय व हृदयग्रंथि नष्ट झाल्या आहेत असे

(सद्गतिः) परब्रह्मामध्यें नेहमीं रत असलेले (कृती) कृतकृत्य असणारे (यतिः) संयमी (मे) मला (अतिवल्लभः) अत्यंत प्रिय आहेत. ॥ ७९ ॥

( ८० )

**अन्वयार्थः**—(प्रारब्धाय तनुर्यस्य) ज्ञानानें संचित व क्रियमाण कर्मांचा नाश होतो. पण प्रारब्धकर्म तसेंच राहतें व त्या भोगाकरितां शरीराची आवश्यकता ज्यांना आहे असें (जनुर्यस्य पुनर्न हि) पण ज्यांना हें शरीर नष्ट झाल्यावर पुनर्जन्म नाहीं (हे हिमांशुकुलज) हे अर्जुना (अशुभैः) अशुभ कर्मानें (अस्य महिमा) या ज्ञानी पुरुषाचा महिमा (न हीयते) कमी होत नाहीं. ॥ ८० ॥

( ८१ )

**अन्वयार्थः**—(हे कार्तवीर्य राजन्) हे कृतवीर्याच्या मुला, राजा अर्जुना, (त्वमप्येवं युंजन्)तूंहि याप्रमाणें अभ्यास करून (कृती भव) कृतकृत्य हो. (महान्) याप्रमाणें दत्तात्रेयांनीं सांगितल्यावर अधिकारी अर्जुन (भवदाज्ञा मता) आपली आज्ञा मला शिरसावंद्य आहे (इत्युक्त्वा) असें म्हणून (गुहां गत्वा)एका गुहेंत जाऊन (दध्यौ) ध्यान करूं लागला.८१

( ८२ )

**अन्वयार्थः**—(सः सभ्यः) तो श्रेष्ठ अर्जुन (भूयो भूयः) पुनः पुनः (अभ्यसन्) अभ्यास करणारा (त्रिमासं समाहितः) तीन महिन्यांत समाधि लावूं लागला. (सन्नतः) गुरूजवळ येऊन त्यानें साष्टांग नमस्कार केला व (रवेस्तुल्याय गुरवे) सूर्याप्रमाणें दैदीप्यमान असणाऱ्या श्रीदत्तात्रेयांना (तच्छशंस) सर्व हकीगत सांगितली. ॥ ८२ ॥

( ८३ )

**अन्वयार्थः**—(असक्तः) निरिच्छ होऊन (गुर्वाज्ञया) श्रीदत्तात्रेयांच्या आज्ञेनें (भुक्तः) भोग भोगून झाल्यावर (पुनः योगयुक्तः) नंतर पुनः राजा अर्जुन योगी (अभवत्) झाला.(युक्तोऽपि) एक वर्ष समाधि स्थितींत

असतांहि (भक्तः) राजा अर्जुन (सता) श्रीदत्तात्रेयांनीं (वर्षेण हर्षेण) एक वर्षानंतर आनंदानें (उत्थापितः) समाधि स्थितींतून उठविला.॥८३॥

( ८४ )

**अन्वयार्थः**—(गुरुः) श्रीदत्तात्रेय (आह) म्हणाले (उद्गते महामते) समाधीमध्यें ज्याची उत्तम गति आहे व बुद्धिमान् अशा अर्जुना, (अत्र ते किं अनुभूतम्) तूं या समाधिस्थितींत कशाचा अनुभव घेतलास (वै वद) तें निश्चयानें सांग. (परंतप) कामादि शत्रूंचा नायनाट करणाऱ्या (उर्वीश) योगभूमीचें पालन करणाऱ्या अर्जुना, (हि) कारण (परं तपः विना) मनाचें व इन्द्रियांचें ऐकाग्र्य झाल्याशिवाय (चिरं) पुष्कळ काळ (रहः) एकान्त (स्थितिः) वास (न) होऊं शकत नाहीं. ॥ ८४ ॥

( ८५ )

**अन्वयार्थः**—(नृपः) राजा अर्जुन (आह) म्हणाला, (हे महानुभाव अज) हे महाप्रभावशाली स्वयंभू श्रीदत्ता, (ते कृपया) तुझ्या कृपेनें (मयि समाहिते) मी समाधिस्थितींत गेलों असतां (पटीयसी) अत्यंत कुशल अशी (धृतिमत्यपि) व कोणतीहि गोष्ट समजणारी अशी असूनहि (भेदहृत्) सर्व भेद नाहींसे करणारी (मतिः) माझी बुद्धि (त्रिपुटीं) ध्याता, ध्यान, ध्येय, असा भेद (न वेद) जाणूं शकली नाहीं. ॥ ८५ ॥

**भावार्थः**—याप्रमाणें श्रीदत्तात्रेयांचें भाषण ऐकून अर्जुन म्हणाला, हे नित्यसिद्ध महानुभावी श्रीदत्ता, आपल्या कृपेनें कांहीं काळ अभ्यास केल्यावर मला समाधियोग सिद्ध झाल्यावर अत्यंत कुशल असणारी व कोणतीहि गोष्ट ध्यानांत ठेवणारी अशी असूनहि सर्व द्वैत भावांचा नाश करणारी अशी माझी बुद्धि अत्यंत सूक्ष्म व कुशाग्र असूनहि समाधीचे वेळीं ध्याता, ध्यान व ध्येय म्हणजे मी ध्यान करणारा, हें ध्यान व ध्येय म्हणजे ज्याचें ध्यान करावयाचें तो विषय असा भेद ती घेऊं शकली नाहीं. अर्थात् मला कोणतेंहि भान नव्हतें. ॥ ८५ ॥

( ८६ )

**अन्वयार्थ:**—(हे प्रिय) हे भगवन् (मनसा सह गावः पंच पंच च) मनाशीं सहित पांच ज्ञानेंन्द्रियें व पांच कर्मेन्द्रियें (स्थिरतां गताः)स्थिर झालीं (मतिरपि) आणि बुद्धिसुद्धां (स्थिता) स्थिर झाली.(अतिहर्षः)ज्याला अत्यंत हर्ष झाला आहे असा मी (उत्थितः) समाधींतून उठलों व (हे ईश्वर) हे श्रीदत्ता, (एतां अनुवृत्तिं) त्या वृत्तींच्या अनुवृत्तीचें (स्मरे) मी स्मरण करतों. ॥ ८६ ॥

**भावार्थ:**—हे प्रिय भगवन् श्रीदत्ता, ज्या वेळीं मीं समाधि लावली त्या वेळीं मनाशीं सहित सर्व अकरा इन्द्रियें म्ह० पांच ज्ञानेन्द्रियें व पांच कर्मेन्द्रियें स्थिर झालीं, व बुद्धिहि स्थिर झाली असतां मी अत्यंत हर्षयुक्त झालों व समाधि अवस्थेंतून उठलों व समाधि अवस्थेंत जी वृत्ति होती तिचें स्मरण करूं लागलों. यद्यपि स्मरणाला अनुभव पाहिजे व त्या वेळीं तर वृत्ति नसल्यानें अनुभव नाहींच मग स्मरण तरी कसें होणार ? पण विशिष्ट प्रकारची वृत्ति जरी झाली नाहीं तरी आरंभीं प्रयत्न केला असल्यामुळें सामान्य रूपानें त्या अवस्थेचें स्मरण होण्यास हरकत नाहीं. त्या वेळीं समाधि स्थितींत वृत्तीचें ज्ञान जरी होत नसलें तरी त्या वृत्ति आत्मगोचर असल्यामुळें तेवढ्या संस्कारानें समाधींतून उठल्यावर अनुमानानें वृत्तींचें ज्ञान होऊं शकतें. त्यामुळें त्या वृत्तींचें स्मरण करतों हें अर्जुनाचें म्हणणें संगतच आहे.॥ ८६ ॥

( ८७ )

**अन्वयार्थ:**—(मिमंक्षया) त्रिविध तापाच्या शांतीकरितां स्नान करण्याच्या इच्छेनें (इमं) ह्या (आनंदऱ्हदं) योगी लोकांना गोचर असणाऱ्या आनंदरूपी डोहांत (एत्य) जाऊन (विगतोपाधिः) ज्याची उपाधि गेली आहे असा होऊन (सुखांबुधिं) निरतिशयानंद सागरांत (गतोऽस्मि) मी बुडलों आहें. (सुधीः) कृपासागर श्रीदत्ता, (आधिव्याधी) खरोखर मानसिक व शारीरिक पीडा (मे न)माझ्या नाहींशा झाल्या.॥ ८७॥

**भावार्थः**—त्रिविध तापानें म्ह० कायिक, वाचिक व मानसिक तापानें पोळलों असल्यामुळें त्यांची शांती व्हावी म्हणून स्नान करण्याच्या इच्छेनें या योगी लोकांना माहीत असलेल्या आनंदरूपी डोहांत बुडी मारली असतां सर्वोपाधिरहित असा मी झालों व सुखसागरांत जाऊन निरतिशय अखंडानंदस्वरूपच झालों. हे श्रीदत्ता, खरोखर आतां माझ्या मानसिक व शारीरिक पीडा शिल्लक राहिल्याच नाहींत. ॥ ८७ ॥

( ८८ )

**अन्वयार्थः**—(अलिंग्यधीशः) परमहंसांमध्यें श्रेष्ठ श्रीदत्तात्रेय (तं) त्या अर्जुनाला (आलिंग्य) आलिंगन देऊन (शस्तं प्राह) खूष होऊन म्हणाले (हे नृप अर्जुन) हे राजा अर्जुना, (प्रजाधिभूः) तूं प्रजेचा नायक आहेस. (प्रजाः) म्हणून प्रजेचें (शाधि) नीतीनें पालन कर. (गच्छ गच्छ) तूं आतां आपल्या राष्ट्रांत जा (न ते द्वयम्) तूं विरक्त असल्यामुळें द्वैत व तदुत्पन्न सुख व दुःख तुला होणार नाहीं. ॥ ८८ ॥

( ८९ )

**अन्वयार्थः**—(अंतःसंगविहीनस्य) ज्यानें कामक्रोधादि आंतूनच सोडले आहेत (बहिःसंगो न बाधकः) त्यानें बाह्य जगाशीं संबंध जरी ठेवला तरी तो त्याला बाधक होऊं शकत नाहीं. (परार्थं) दुसऱ्याकरितां म्हणून कां होईना (धर्मं चर) धर्माचरण कर.(क्वचित्तु) आणि केव्हां केव्हां (बहिः व्यस्तं)बाहेर वागणूक अशी दाखीव कीं लोकांनीं विक्षिप्त आहे असें म्हणावें. (चर) याप्रमाणें वागून राज्य कर. ॥ ८९ ॥

( ९० )

**अन्वयार्थः**—(यथा देही) ज्याप्रमाणें सर्वसामान्य लोक माझी सेवा करितात त्याप्रमाणें (मे अंघ्रि भज) माझ्या चरणांची सेवा तूंहि कर. (यथा गृही) ज्याप्रमाणें फलाची इच्छा मनांत धरून यज्ञयागादि क्रिया गृहस्थ लोक करितात त्याप्रमाणें (आद्यं) सर्व कारणांचेंहि कारण अस-

णाऱ्या (मां) माझी निष्कामपणानें (यज) यज्ञयागादि क्रियेनें सेवा कर. (हे नष्टभव) संसारभ्रम ज्याचा निवृत्त झाला आहे अशा अर्जुना, (आसक्तिं त्यज) कर्मामध्यें आसक्ति ठेवूं नकोस. (द्विजादेः) ब्राह्मण, गुरु वगैरे श्रेष्ठ लोकांची (अर्चको भव) पूजा नेहमीं कर. ॥ ९० ॥

( ९१ )

**अन्वयार्थः**—(तथा) ठीक आहे (इति) असें म्हणून (आज्ञां) त्यांची आज्ञा (प्रगृह्यापि) शिरसामान्य करूनहि (अयं) हा राजा अर्जुन (श्लथच्चित्तः)ज्याचें अंतःकरण गहिंवरून आलें आहे असा (अंघ्रिदत्तदृक्) श्रीदत्ताच्या चरणांवर दृष्टि ठेवणारा ( दत्तदृग्जातमुद् ) श्रीदत्तात्रेयांच्या दर्शनानें ज्याला आनंद झाला आहे अशा राजाला (महोदयं) श्रीदत्तात्रेयांची संगति (त्यक्तुं नैच्छत्) सोडूं नये असें वाटूं लागलें. ॥ ९१॥

( ९२ )

**अन्वयार्थः**—(यस्य सदयं हृदयं) ज्याचें कृपामय अंतःकरण आहे (तेन) अशा श्रीदत्तात्रेयांनीं (मोचातिरसया) अत्यंत पिकलेल्या केळापेक्षांहि गोड अशा (वाचा) वाणीनें (प्रस्थापितः) जा म्हणून पाठविलेला (सः) तो राजा (चित्र इव) एखाद्या चित्राप्रमाणें (अग्रतः) श्रीगुरूंच्यापुढें (स्थितः) तसाच उभा राहिला. ॥ ९२ ॥

( ९३ )

**अन्वयार्थः**—( ततः पुनः ) नंतर पुनः (प्रभुः) श्रीदत्तात्रेयांनीं (सहासं) हास्ययुक्त वाणीनें राजाला (प्रस्थापयामास) जा असें म्हणून पाठविलें. (नृपः) नंतर राजा (स्ववासं) आपल्या राजधानींत (प्राप) प्राप्त झाला. (नवोदयं) नवीनच उगवलेल्या (चन्द्रमिव) चंद्राप्रमाणें (तं प्रजाः) त्या राजाला सर्व प्रजाजन (दृशा पपुः) डोळे भरून पाहूं लागले. (च) (तदाधिः) त्याला पाहतांच प्रजेच्या मानासिक सर्व पीडा (अस्तमगात्) नाहींशा झाल्या. ॥ ९३ ॥

( ९४ )

**अन्वयार्थः—**(शशिवंशकेतुः) सोमवंश कुलाला भूषणभूत असा (सः)तो राजा अर्जुन(अगर्वकामः)अभिमान व फलाची इच्छा न करणारा (यज्ञान् ) यज्ञयाग (चक्रे) करूं लागला. (तदैव) त्याच वेळीं (सदैवः) सर्व देवांशीं सहित ( सुरवंशकेतुः ) इन्द्र (स्थिरासनस्थोऽपि) त्याचें आसन स्थिर असतांहि ( अनिलं ऋतेऽपि ) जोराचा वारा नसतांहि (भृशं) जोरानें (अकंपत) थरथर कापूं लागला. ॥ ९४ ॥

( ९५ )

**अन्वयार्थः—**(तत्सत्त्वहृत्यै) राजा अर्जुनाचें सत्त्व हरण करण्याकरितां ( सुरनोदितः अर्कः ) इंद्रादि देवांनीं पाठविलेला सूर्य ( अतिथिः भूत्वा ) अतिथीचें रूप धारण करून (नृपाधिपौकः) राजाच्या घरीं (प्राप) आला. (सः) सूर्यानें (नृपात् ) राजापासून (वृक्षभिक्षां उपादाय) वृक्षांची भिक्षा घेऊन (नृपं) अर्जुनाला (मुनिशापशिक्षां) वसिष्ठ ऋषींच्या शापास (निन्ये) पात्र केलें. ॥ ९५ ॥

( ९६ )

**अन्वयार्थः—**(ततः) नंतर कांहीं कारणांनीं (दैववशात्) व कांहीं दुष्ट दैव असल्यामुळें ( उद्धतेन तेन ) गर्विष्ठ अशा त्या अर्जुनानें ( पराजिताः देवताः ) पराभूत केलेले इन्द्रादिदेव ( अपराजितं उपेत्य ) श्रीविष्णूजवळ येऊन (अभिष्टुय) त्याची स्तुति करून (ख्यात्याधिकात् ) प्रसिद्ध पुरुषाकडून (तन्मृतिं) अर्जुनाचा नाश व्हावा (कल्पयामासुः) याप्रमाणें सर्व देवांनीं ठरविलें. ॥ ९६ ॥

( ९७ )

**अन्वयार्थः—**(अथ ह किल) विष्णूनें वर दिल्यावर पूर्वीं अशी एक गोष्ट घडली कीं (गाधिभूभृति) गाधि नांवाचा राजा ( वने निवसति सति) वनामध्यें राहत असतां (परिणयार्थी) तूं लग्न कर अशी (भृगुणा-

दिष्टः) भृगु ऋषींनीं आज्ञा केलेला (ऋचीकः) ऋचीक ऋषी (योगप्रभावात्) योगसामर्थ्यानें (वरुणादाहृतश्यामकर्णाश्वसहस्रं) वरुण लोकांतून आणलेले निळ्या कानाचे हजार घोडे (शुल्कत्वेन राज्ञे प्रतिपाद्य) नजराणा म्हणून गाधि राजाला देऊन (स्त्रीमुख्यां) सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ अशा (सत्यवत्यभिख्यां) सत्यवती नांवाच्या (तत्तनयां) त्या गाधीच्या मुलीबरोबर (उपयेमे) ऋचीकांनीं लग्न केलें. ॥ ९७ ॥

( ९८ )

**अन्वयार्थः**—(स्वस्याः) आपणाला (च) व (मातुः) आपल्या आईला (अनुरूपपुत्राप्तये) योग्य मुलगा व्हावा म्हणून (भृगुणा) भृगुऋषीकडून (कारितपुत्रकामेष्टिचरुप्राशनव्यत्ययेन) केलेल्या पुत्रकामेष्टि यज्ञांतील चरुप्राशनाची अदलाबदल झाल्यामुळें (जनिष्यमाणपुत्रव्यत्यासं) होणाऱ्या मुलांचाहि बदल होणार असें पाहून (निवेद्य) ती सर्व हकीगत सुनेला सांगितली. (स्नुषाप्रार्थनया) नंतर सुनेच्या प्रार्थनेनें (तत्पुत्रस्यर्षित्वं) तुझा मुलगा ऋषीच होईल, (पौत्रस्य क्षत्रत्वं) व नातू मात्र क्षत्रिय होईल, (चाकारि) असा तपःसामर्थ्यानें भृगु ऋषीनीं बदल केला. ॥ ९८ ॥

( ९९ )

**अन्वयार्थः**—(गाधिपुत्रः विश्वामित्रः) गाधि राजाचा मुलगा विश्वामित्र (क्षत्रियोऽपि सन्) क्षत्रिय असूनसुद्धां (चरुप्रभावात्तपसा) चरूच्या प्रभावानें व तपश्चर्येच्या योगानें (ब्रह्मर्षित्वं गतः) ब्रह्मर्षि म्हणून प्रसिद्ध झाला व (मतः) सर्वमान्य (मंत्रदृक्) मंत्रद्रष्टा झाला. ॥९९॥

( १०० )

**अन्वयार्थः**—(शम्याः) शमीपासून (अग्निरिव) अग्नीप्रमाणें तेजस्वी (सत्यवत्याः) सत्यवतीपासून (शिवांशः) शंकराच्या अंशरूपानें (जमदग्निः) जमदग्नि ऋषि (अभवत्) झाले. (मंत्रदृक्) कांहीं ऋचा पाहणाऱ्या जम-

दग्नीनें (शिवांशां) पार्वतीची कलारूप असणाऱ्या ( रेणुकां सतीं) सती रेणुकेशीं (वव्रे) विवाह केला. ॥ १०० ॥

( १०१ )

**अन्वयार्थः**—(पंचाग्नय इव) पांच अग्नीप्रमाणें (तत्सुताः)त्या दोघांना (ख्याताः) लोकांमध्यें प्रसिद्ध (अर्चिताः) लोकपूजित (पंच) अशीं पांच मुलें (आसन्) झालीं. (अत्र) त्यांमध्यें (अन्तिमः) शेवटचा मुलगा (धीरः) युद्धामध्यें धैर्यसंपन्न, (अतिवीरः) अत्यंत बलशाली, (शूरजित्) शूरांना जिंकणारा, (रामः) राम नांवाचा (परमः) साक्षाद्विष्णूचाच अवतारभूत असा होता. ॥ १०१ ॥

**भावार्थः**—जमदग्नि व रेणुका यांना पांच मुलें झालीं. जमदग्नि हे अग्निहोत्री होते म्हणून कीं काय दक्षिणाग्नि, गार्हपत्य, आहवनीय, सभ्य व आवसथ्य हे पांच अग्नि पुत्ररूपानें त्यांच्या उदरीं जन्मास आले. तीं पांच मुलें विख्यात होतीं. सर्व लोक त्यांचा सत्कार करीत असत. त्या पांच मुलांपैकीं शेवटचा मुलगा राम या नांवाचा धैर्यशाली, वीर, शत्रूंला जिंकणारा असा होता. साक्षात् विष्णूनेंच अवतार घेतल्यामुळें त्याचें गुणानुवर्णन किती करावें तितकें थोडेंच आहे. ॥ १०१ ॥

( १०२ )

**अन्वयार्थः**—( सस्त्रीकदेवगायकरतिकौतुकदृष्टिदूषिता ) एकदां गंगेमध्यें नावेंत बसलेला आपल्या स्त्रीसहवर्तमान एक गंधर्व कीडा करितांना पाहिल्यामुळें दूषित झालेली (माता) आई रेणुका ( ताताज्ञसेन ) जमदग्नि ऋषींच्या आज्ञेनें (येन) ज्या रामानें (हता) मारली (सः) तो राम (साक्षात्पयोब्धिजामाता) समुद्राचा जांवई साक्षात् विष्णूच होता. ॥ १०२ ॥

( १०३ )

**अन्वयार्थः**—(येन) रामानें ( तातप्रसादतः ) जमदग्नींच्या कृपाप्रसादानें (मृता माता) मेलेली रेणुका (पुनरपि उत्थापिता) पुनः उठविली,

(आयुष्मत्ता जयिता च प्राप्ता) आणि चिरंजीव असा आशीर्वाद व सर्वत्र जय असावा असा आशीर्वाद प्राप्त करून घेतला. (अस्य) या रामाच्या (गुणस्य) गुणाचे (माता) मापन(को भवेत्) कोण करूं शकेल?॥१०३॥

( १०४ )

**अन्वयार्थः**—(शिवाप्तविद्ये) शंकरापासून ज्यानें विद्या प्राप्त करून घेतली आहे असा (शिवतातभक्ते) शिवरूपी जमदग्नींचा भक्त असणारा राम (अटवीं याते) वनामध्यें गेला असतां (आश्रमगः भूपः अपि) जमदग्नींच्या आश्रमांत येऊन अर्जुन हा राजा असूनहि (प्रसह्य) जबरदस्तीनें (मुनिकामधेनुं) मुनींच्या कामधेनूला (जहार) घेऊन गेला. (यः) ज्या राजानें (निजकामधेनुं) भक्त लोकांना कामधेनूप्रमाणें असणाऱ्या दत्तात्रेयाला (वशं निन्ये) वश करून घेतलें त्याला दुसाध्य काय आहे? १०४

( १०५ )

**अन्वयार्थः**—(रामः) राम (स्वाश्रमं) आपल्या आश्रमांत (प्राप्य) परत आला व (हृतां धेनुं) धेनूचें हरण राजानें केलें (ज्ञात्वा) असें पाहून (नृपं हंतुं प्राप) राजाला मारण्याकरितां निघाला. (तं आलोक्य) आपल्यावर चाल करून राम आला आहे असें पाहून ( राजा बलमचोदयत् ) राजानें आपलें सैन्य त्याच्यावर सोडलें. ॥ १०५ ॥

( १०६ )

**अन्वयार्थः**—( एतैः रंहस्विगंधर्वपदोत्क्षितकुपांसुभिः ) वेगवान् घोड्यांच्या टापांनीं जमिनीवरून वर फेंकली जाणारी जी धूळ त्या धुळीच्या योगानें ( पांसुघ्नी अपि ) पापांचा नाश करणारी असूनहि (अमला) व स्वतः निर्मल असूनहि (मंदाकिनी) गंगा (अपापा कृता) पापरहित केली. ॥ १०६ ॥

( १०७ )

**अन्वयार्थः**—(पद्मिभिः) हत्तींनीं (सप्तधोत्सृष्टैः) सात वेळां टाकलेलें ( सुगंधिभिः दानोदकैः ) सुगंधयुक्त जें दानोदक म्ह० गंडस्थळांतून

गळणारें द्रव्य त्यांनीं (गंधवती पृथ्वी) पृथ्वी ही गंधवती आहे, (इति मुनेः उक्तिः) असें नैयायिक गौतम ऋषींचें म्हणणें (स्फुटं सार्था कृता) स्पष्टपणें सार्थ करून दाखविलें. ॥ १०७ ॥

(१०८)

**अन्वयार्थः—**(तयोः) राम आणि अर्जुन यांचें (कलहात्पूर्वं) युद्ध होण्यापूर्वी (अन्योन्यं) परस्पर (विजिगीषतां) विशेष प्रकारानें जिंकण्याची इच्छा करणाऱ्या (स्यंदनानां) रथांचे (इभानां) हत्तींचे (अश्वानां) घोड्यांचे (ध्वनीनां महान् कलहः) मोठमोठे आवाज होऊं लागले. १०८

(१०९)

**अन्वयार्थः—**(मुनेर्बालः) जमदग्नींचा मुलगा राम (गर्जदुद्वेलजलध्युपमितम्) आवाज करणाऱ्या व खवळलेल्या समुद्राप्रमाणें (चलं बलं) इतस्ततः पसरलेलें सैन्य (विलोक्य) पाहून (बलात्) वडिलांनीं दिलेल्या वराच्या जोरावर (अलं) घनघोर (युयुधे) युद्ध करूं लागला. ॥ १०९ ॥

(११०)

**अन्वयार्थः—**(वडवातनयः) हा राम ब्राह्मणस्त्रीचा मुलगा असल्यानें (खंडपिंडाशीः) पोटभर गळ्याला येईपर्यंत साखरेचे लाडू खाणारा आमच्याबरोबर काय युद्ध करणार (इतीर्ष्यया) अशा ईर्षेनें (आगताः) युद्धाला आलेले (वडवातनयाः) घोडे (खंडपिंडाः संतः) युद्धामध्यें तुकडे तुकडे होऊन (मृतं गताः) मरण पावले.॥ ११० ॥

(१११)

**अन्वयार्थः—**(पंचधारतुरगौघं) पांच प्रकारच्या गति ज्या घोड्यांच्या आहेत अशा समुदायाला (ओजसा) एका झटक्यांत (इतस्ततः स्यात्) चोहोंकडून वेगानें आलेल्या घोड्यांना (एकया परशुतिग्मधारया) एकाच कुऱ्हाडीच्या तीक्ष्ण धारेनें (घनगर्जनः रामः) मेघाप्रमाणें गर्जना करणारा राम (अंजसा) वेगानें (संजघान) मारता झाला. ॥ १११ ॥

( ११२ )

**अन्वयार्थः**—(यद्भीत्या) ज्या रामाच्या भयानें (सरथे) रथांनीं सहित असणारे योद्धे (विरथे च कृते) रथरहित केले. (आधोरणे) हत्तीवर बसणारे माहुत, ( रणे अधः कृते ) युद्धामध्यें खालीं पडले असतां (तदायुधं) त्या रामाचें शस्त्र जें परशु त्यानें ( अवशेषबलं जघ्ने ) सर्व सैन्य नाहींसें केलें. (ततः) रणांगणांतून (असृङ्नद्यः) रक्ताच्या नद्या (सुस्त्रुवुः) वाहूं लागल्या. (चर्मावर्तयुताः) त्या नदीमध्यें कातडें ह्याच कुणी लाटा (मृतेभपुलिनाः) मेलेले हत्ती हेंच कुणी वाळवंट (छिन्नांघ्रिहस्ताहयः) वीर पुरुषांचे तुटलेले हात हेच कुणी साप (आमिषकर्दमाः) मांस हेंच जणूं चिखल (हतयहग्राहाः)मेलेले घोडे हे त्या नदींतील मगर (शिरःकच्छपाः) वीरांची मस्तकपंक्ति हींच कासवें (घोराः) म्हणूनच अत्यंत भीषण अशा त्या नद्या वाहूं लागल्या. ॥ ११२ ॥

( ११३ )

**अन्वयार्थः**—(किरीटी) किरीट धारण करणारा, (कुंडली) कुंडलें धारण करणारा, (छत्री) छत्री धारण करणारा,( प्रतापी ) शूर ( दुर्धरः ) अत्यंत बलवान् , ( रथी ) रथावर' बसलेला ( सहस्रकरः ) हजार ज्याला हात आहेत असा (अर्जुनः) राजा अर्जुन ( अत्र ) समरांगणांत (एत्य) येऊन (मित्रवत् ) सूर्याप्रमाणें ( युयुधे ) युद्ध करूं लागला. ॥ ११३ ॥

( ११४ )

**अन्वयार्थः**—(अर्जुनस्येव) अर्जुन वृक्षाप्रमाणें (अर्जुनस्य) राजा अर्जुनाचे ( स्कंदान् इव ) वृक्षांच्या फांदीप्रमाणें (स्कंधान् ) बाहु ( रामः आच्छिनत् ) रामानें तोडले. (भूयो जातानपि तान्) पुनः पुनः उत्पन्न झाले असतांहि ते पुनः तोडले. ( तन्निर्गमं अशोषयत् ) पुनः पुनः उत्पन्न होतात असें पाहून रामानें त्याचें मूळच नाहींसें केलें. ॥ ११४ ॥

( ११५ )

**अन्वयार्थः**—(येन) ज्या अर्जुनानें (अपवर्गस्तु) मोक्ष तर (पुरापि) पूर्वींच (उपात्तः) प्राप्त करून घेतला होता,(तदा) त्या वेळीं (अकुंठचित्तः) ज्याचें चित्त सर्वत्र गमन करतें असा तो अर्जुन ( दत्तं अस्मरत्) श्रीदत्तात्रेयांचें स्मरण करूं लागला. (इहापि) अंतकाळींसुद्धां (स्वाभेदतः) स्वतःशीं अभिन्न रूपानें ( दत्तो ध्यातः ) श्रीदत्तात्रेयांचें ध्यान केल्यामुळें (नृपेण) अर्जुनानें (कृत्तोऽपि मूर्धा) जरी परशुरामानें मस्तक तोडलें तरी (न वित्तः ) आपलें मस्तक तोडलें असें जाणलें नाहीं. ॥ ११५ ॥

( ११६ )

**अन्वयार्थः**—(नृपं हत्वा) राजाला मारून (गां गृहीत्वा) कामधेनूला घेऊन (अश्रमः रामः) ज्याला कांहींच श्रम झाले नाहींत अशा परशुरामानें (आश्रमं एत्य) आपल्या आश्रमांत परत येऊन(ताताय) जमदग्नींना (तत्प्राह) सर्व हकीगत सांगितली. (असहनः सः)तें ऐकून जमदग्नींना अत्यंत वाईट वाटलें व (हा) शोकानें (तं) परशुरामाला (आह) म्हणाले. ॥ ११६ ॥

( ११७ )

**अन्वयार्थः**—( राजा ) पृथ्वीचा पालन करणारा राजा ( दशश्रोत्रियवद्राजा ) दहा वैदिक ब्राह्मणांप्रमाणें श्रेष्ठ असा राजा मानला जातो. ( तद्धन्तुः ते ) तेव्हां त्याला मारणाऱ्या तुझी (तीर्थसेवनात्) तीर्थयात्रा केल्यानें (शुद्धिः) पापशुद्धि होईल. (इति) याप्रमाणें वडिलांनीं सांगितलें असतां (तथेत्युक्त्वा) ठीक आहे असें म्हणून (रामोऽपि) परशुरामहि (तथाचरत्) तीर्थयात्रा करण्याकरितां म्हणून तेथून निघून गेला. ॥ ११७ ॥

( ११८ )

**अन्वयार्थः**—(योऽपि) जो (विधिवज्जमदग्निः) विध्युक्त प्रदीप्ताग्नींची (उपास्य) उपासना करून (रेणुकया सह) स्त्रीशीं सहित (यत्रास्ते) ज्या

ठिकाणीं बसला होता त्या ठिकाणीं (अनयाः ते) अन्यायानें वागणारे ते (अर्जुनस्य तनयाः) अर्जुनाचे पुत्र (प्राप्य) आश्रमांत येऊन (तं) त्या (जमदग्निं) जमदग्नींना (अरिवत्) शत्रूंप्रमाणें (विजघ्नुः) मारते झाले. ११८

( ११९ )

**अन्वयार्थः**—(तदा) ऋषींना मारल्यावर (सा) ती (वियुक्तेश्वरतोक-रेणुका) जिचा पति मृत झाला आहे व पुत्रहि जवळ नाहीं अशी रेणुका ( यथैका विपिने करेणुका) ज्याप्रमाणें निबिड वनामध्यें एकटीच हत्तीण असावी त्याप्रमाणें (आर्ता) अत्यंत पीडित झाली.(ममाधिभागः) ज्याच्या-वर माझें सौभाग्य अवलंबून आहे (यदुपरि) ज्याच्या जीवावर मी आज-पर्यंत (अदेवयत्) आनंदानें दिवस घालविले, (सः मे प्रियः) तो माझा प्रियपति (क्व) कोठें आहे (इति च पर्यदेवयत्) असें म्हणून शोक करूं लागली. ॥ ११९ ॥

( १२० )

**अन्वयार्थः**—(अहहा) हाय हाय (हे दिष्ट) हे भाग्या (हतास्मि) मी ठार झालें. (ध्वटाता) जिचा पति नष्ट झाला आहे अशी (स्मरहा) शंकरहि (मे) माझ्यावर (रुष्टः एव) रागावलाच आहे. (शरणं) माझें रक्षण करणारा (क्वापि) कुठेंहि कोणीहि (न शिष्टं) राहिला नाहीं. (परं कष्टं दृष्टं) अत्यंत कष्ट झाले. (मरणं वरं) आतां यापेक्षां मरण आलेलें बरें. ॥ १२० ॥

( १२१ )

**अन्वयार्थः**—(हा नाथ) हे प्रिय देवा, (शुद्धगाथ) पवित्रकीर्ति (प्रियकथ) हें प्रियचारित्र (शस्त्रादितगात्र) शस्त्रानें ज्याचें शरीर तोडलें असें आपण, (पवित्रपरगात्र) ज्यांनीं दुसऱ्यांचीं शरीरेंहि पवित्र केलीं आहेत असे (रतिपात्रं) रति करण्यास योग्य असे (इदं ते अर्धं गात्रं) हें तुझें अर्ध शरीर (अत्र कथं तिष्ठेत्) तुला सोडून या ठिकाणीं कसें बरें राहील ? ॥ १२१ ॥

( १२२ )

**अन्वयार्थः**—(हतकायातेन समं) ज्याला मारलें आहे व जो आतहि आहे त्याच्याशीं सह (स्वः) स्वर्गाला (अद्यैव) आजच (यास्ये) मी जाईन. (दैवहतकामा) पण मी हतदैवी असल्यामुळें (हतकार्तवीर्यः) ज्यांनीं अर्जुनाला मारलें असा (मे) माझा (अर्भः) परशुरामहि (इह) आज या ठिकाणीं (न) नाहीं. (अतः) जर तो असता तर या रामाकडून (अमी) हे शत्रू (हतकामाः भवन्ति) नष्ट झाले असते. ॥ १२२ ॥

( १२३ )

**अन्वयार्थः**—(इति) याप्रमाणें (सत्यां रुदत्यां) सति रेणुका रडत बसली असतां (तत्पुत्रः रामः) तिचा मुलगा राम (उपेत्य) जवळ आला व (तत्सर्वं श्रुत्वा) ती सर्व हकीगत ऐकून (अनुतप्तः सन्) त्याला पश्चात्ताप झाला व (प्राह) तो म्हणाला, (गुर्वहितः) गुरूचें अहित करणारा (असन् अस्मि) मी दुष्ट पुत्र आहें. ॥ १२३ ॥

( १२४ )

**अन्वयार्थः**—(हन्त हन्त बत) दुःखी असा मी (हे तात) हे बाबा (एषः) हा राम (ते) तुमचा (अहितः) शत्रु (जातः) झाला. (यतः) ज्या कारणांस्तव (त्वं मृतः) आपणांला मरण आलें (सुतः न) तो हा मुलगा कसा? (ततः) म्हणून (खलकुलतिलांजलैः) दुष्ट शत्रूंचीं कुळें हेंच पाणी व तीळ त्यांनीं अंजलीनें म्ह० तर्पणानें (अस्य) या परशुरामाची (निष्कृति) शुद्धि होईल. (पितः) बाबा (ततोऽन्यतः) यापेक्षां निराळ्या मार्गानें (न) होणार नाहीं. ॥ १२४ ॥

( १२५ )

**अन्वयार्थः**—(इति) याप्रमाणें (तेषां वधाय) शत्रंचा नाश करण्याची (प्रतिज्ञाय) प्रतिज्ञा करून (रामः) परशुराम (अचिराय) लवकरच (अशेषां धरां) सर्व पृथ्वी (अनृपां करिष्यन्) निःक्षत्रिय करण्याच्या इच्छेनें

(प्रययौ) तेथून निघाला. (कृपांशमप्यस्पृशन् सन्) मनांत यत्किंचित्हि दया न बाळगतां राजा असा (अर्जुनपुत्रान्) अर्जुनाचीं मुलें जेथें होतीं तेथें (प्राप) येऊन पोंचला. ॥ १२५ ॥

( १२६ )

**अन्वयार्थः**—(निजजठरस्थितान्) परशुराम हा विष्णूचा अवतार असल्यामुळें त्याच्या उदरांत असणारीं (अनंतान्) अनंत (ब्रह्मांडान्) ब्रह्मांडें त्यांना (विस्मृत्य) विसरून (चरन्) वेगानें धांवणारा (तोयस्थां तरीमिव) नदीमधील नावेप्रमाणें (अनंतां) भूमीला (प्रपदभरात्) जोरानें पावलें टाकल्यामुळें (चालयन्) कांपविणारा (महात्मा), ज्याचें भव्य शरीर आहे असा (महारिधामहात्मा) मोठमोठ्या शत्रूंचा पराभव करणारा राम (सपदि) तात्काळ (अरीन्) अर्जुनाच्या मुलांना (जघ्ने) मारता झाला. ॥ १२६ ॥

( १२७ )

**अन्वयार्थः**—(अतितीक्ष्णपरश्वधेन) अत्यंत तीक्ष्ण अशा कुऱ्हाडीनें (द्विधाकृतान्) तोडलेल्या (अनतान्) उद्धट असणाऱ्या (तान्) त्या शत्रूंना (रणे भुवि) त्या रणभूमीवर (भूतगणाय) भूतबली म्हणून (सः) रामानें (आशु अर्पयत्) तात्काळ अर्पण केलें. (यस्य च निनदः) ज्याचा आवाज ऐकून (गां व्यकम्पयत्) पृथ्वी किंवा स्वर्ग थरथर कापूं लागले. ॥ १२७ ॥

( १२८ )

**अन्वयार्थः**—(विद्युद्भास्वत्) दैदीप्यमान् (अस्त्रं) परशु (स्वं परितः) आपल्या चोहों बाजूंनीं (विधुनानं) फिरविणाऱ्या (मेघध्वानं) मेघाप्रमाणें आवाज असणाऱ्या (मेघरुचोऽलं हृतमानं) मेघापेक्षांहि ज्याची कांति उत्तम आहे अशा अत्यंत शामल परशुरामाला (दृष्ट्वा) पाहून (मेघः भुवि अवतीर्णः) हा मेघच भूमीवर आला आहे (किं इहास्ते) कां हा इथेंच

आहे (इत्थं मत्वापि) असें समजूनहि (ते) जे मत्त झाले होते (मत्तमयराः) ते मत्त मोर (ननृतुः) नाचूं लागले. ॥ १२८ ॥

( १२९ )

**अन्वयार्थः**—(सः) राम याप्रमाणें (जयश्रियं) जयरूपी लक्ष्मीशीं (उद्वाह्य) विवाह करून (अंबामेत्य) आईजवळ येऊन (प्राह) म्हणाला, (त्रिःसप्तकृत्वा) एकवीस वेळां (अस्त्रैः) या परशूनें (भूभृतः) राजे लोकांना (हत्वा) मारून (पितृमुक्तये) वडिलांना मुक्ति मिळावी म्हणून (तर्पये) मी तर्पण करतों. ॥ १२९ ॥

( १३० )

**अन्वयार्थः**—(इति) याप्रमाणें (प्रतिज्ञां) प्रतिज्ञा (कुर्वंतं) करणाऱ्या (सुतं) परशुरामाला (प्रसूः) रेणुकामाता (प्राह) म्हणाली, (पुरा) अगोदर (नौ) आम्हा दोघांची (और्ध्वदेहिकं) उत्तरक्रिया (कृत्वा) करून (प्रतिज्ञातं) जी प्रतिज्ञा केलीस ती (त्वं) तूं (ऋतं कुरु) खरी कर. ॥ १३० ॥

( १३१ )

**अन्वयार्थः**—(तुलायां) कावडींत (एकतः) एका बाजूला (मृतं तातं) मेलेल्या तुझ्या वडिलांना (तथा) त्याचप्रमाणें (मां) मला (एकतः) एका बाजूला (धृत्वा) वाहून ( अवाचीं दिशं ) दक्षिणेकडे (याहि) जा. (यत्र) ज्या ठिकाणीं (खाद्वचः) आकाशवाणी (श्रोष्यसि) ऐकशील (तत्र) त्या ठिकाणीं ( विमात्सर्यं आचार्यं ) द्वेषरहित स्वकर्मानुष्ठान करणारा आचार्य (लब्ध्वा) तुला मिळेल, (मया अनुगमनं कार्यं ) व त्या ठिकाणीं माझा या अनुगमनाचा सती जाणेचा विधि यथासांग होईल. ( ते नौ कर्म कार्यं ) त्या ठिकाणीं तूं आमचें और्ध्वदेहिक कर्म कर. (ततः) नंतर (तव) तुझें (कार्यं) निःक्षत्रिय पृथ्वी करण्याचें कार्य (सिध्येत) सिद्धीस जाईल. ॥ १३१ ॥

( १३३ )

**अन्वयार्थः**—(गुणीशः) गुणिश्रेष्ठ (रामोऽपि) परशुराम असूनहि (तथेति) ठीक आहे असें म्हणून (तथैव) रेणुकेनें सांगितल्याप्रमाणें (गत्वा) दक्षिणेकडे जाऊन (रमणीं) रम्य अशी (खवाणीं) आकाशवाणी (श्रुत्वा) ऐकून (मातृगिरा) या आश्रमांत जा असें रेणुकेच्या सांगण्यावरून (आश्रमं गत्वा) सहज त्या आश्रमांत जाऊन ( पवित्रं आश्रमं दृष्ट्वा ) पवित्र आश्रन पाहून (तत्र) त्या आश्रमांत (विचित्रगात्रं) विचित्र ज्याचें शरीर आहे अशा (शतपत्रनेत्रम् ) कमलाप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत अशा ( वृत्रघ्नमित्रम् ) इन्द्राचा मित्र असणाऱ्या (करुणैकपात्रं) करुणासागर असणाऱ्या (अंके चित्रं कलत्रं परिगृह्य क्रीडंतं) मांडीवर विचित्र स्त्री घेऊन तिच्याशीं क्रीडा करणाऱ्या, (सत्त्रम्) साधु लोकांचें रक्षण करणाऱ्या (एतं अत्रिपुत्रं) त्या दत्तात्रेयांना (सः) राम (मुदा) आनंदानें (ददर्श) पाहूं लागला. ॥ १३३ ॥ १३४ ॥

( १३५ व १३६ )

**अन्वयार्थः**—(भगवान् ) षड्गुणैश्वर्यसंपन्न आपण आहांत; (भर्त्रा सह गमे) पतीशीं सह सती जाण्याकरितां (मात्रा प्रार्थितः) आईनें आपली आचार्य म्हणून प्रार्थना केली आहे. (तत्र कर्मणि) तेव्हां त्या कर्मामध्यें (च) आणि (और्ध्वदेहिकेऽपि) उत्तरक्रियेमध्येंहि (भवान्) आपण (आचार्यो भवतु) पुरोहित व्हावें (इति) याप्रमाणें (रामेण) परशु-रामानें (अयं) त्या श्रीदत्ताची (अर्थितोऽपि) प्रार्थना केली असतांहि (क्रमेण सन्निष्ठां) क्रमाक्रमानें सज्जनांचे ठिकाणीं निष्ठा असावी (ख्याप-यन् ) असें सांगून (असन्निष्ठां) दुर्जनांचे ठिकाणीं निष्ठा असणारा (यातः इव) तूं झालास (तं) याप्रमाणें परशुरामाला (मतः) मान्य असणारे श्री दत्तात्रेय (अवदत्) म्हणाले, ॥ १३५ ॥ १३६ ॥

( १३७ )

**अन्वयार्थः**—(यः) जो मनुष्य ( शास्त्रार्थं आचिनोति ) शास्त्राचें अध्ययन करतो, (यः) जो (स्वतः) आपण (तथाचरति) त्याप्रमाणें म्ह० शास्त्राप्रमाणें वागतो, ( आचारे स्थापयत्यन्यान् ) आणि दुसऱ्याकडून शास्त्रविहित आचरण जो करवून घेतो ( स एव आचार्यः ) त्यालाच आचार्य म्हणावें. ( इतरः न च ) असें जो करीत नाहीं त्याला आचार्यः म्हणूं नये. ॥ १३७ ॥

( १३८ )

**अन्वयार्थः**—(अहं) मीं तर (परिग्रहं) पत्नीला (त्यक्त्वा) टाकून दिलें आहे आणि (आत्मरतिं) संभोगसाधनोपयोगी स्त्रीचा (वृत्वा) स्वीकार करून (अक्रियः) नित्य जें संध्याकर्म त्यांनीं रहित असा मी (स्वच्छंदे आनंदे) मला वाटेल तसा आनंदोपभोग घेत (वर्ते) वर्तन करीत आहें. (मम) तेव्हां मला (आचार्यत्वं) आचार्य म्हणून घेण्याची योग्यता (कथं) कोठून येणार ? ॥ १३८ ॥

( १३९ )

**अन्वयार्थः**—(नग्नः) विवस्त्र होऊन (उन्मत्तवत् ) उन्मत्ताप्रमाणें (धर्माधर्मविवर्जितः) ज्याला धर्म व अधर्म दोनीहि माहीत नाहींत असा (वर्ते) मीं वागतों. (वनचरप्रियः) वनामध्यें फिरणाऱ्या लोकांना मी प्रिय आहें म्हणून (वने तिष्ठे)मी वनामध्यें राहातों (इत् ) म्हणूनच (अस्पृश्यः) मी स्पर्श करण्यालाहि अयोग्य व (अवाच्यः) बोलण्यालाहि अयोग्य (अस्मि) आहें. ॥ १३९ ॥

( १४० )

**अन्वयार्थः**—(सुपेशा) सुस्वरूप स्त्री (वयुनं) मनुष्याचें ज्ञान (वस्ते) नाहींसें करतें. (प्राग्घृतास्या) आरंभीं सुवदना असणारी (नित्यं नूत्ना इयं युवतिः) नेहमीं तरुण दिसणारी ही स्त्री ( ममांकगा ) माझ्या मांडीवर आहे; (अहं तु) आणि मी तर (पुराणपुरुषः) म्हातारा आहें. ॥ १४० ॥

**भावार्थः**—सुस्वरूप स्त्रीला पाहिलें कीं ज्ञानी मनुष्याचेंहि ज्ञान नाहींसें होतें, त्याला भान राहात नाहीं तेव्हां मी ज्या वेळेस या स्त्रीचा स्वीकार केला त्यावेळेस ही सुमुखी होती व नेहमीं तरुण दिसणारी ही स्त्री माझ्या मांडीवर बसवून घेतली;इला पाहतांच माझें ज्ञान नष्ट झालें व मी तर म्हातारा आहें मग मीं ही गोष्ट कशी काय केली हें माझें मलाहि समजेना. दुसरा अर्थः—अघटितघटनापटीयसी माया असें जिचें वर्णन आहे अशी ही मायारूपी स्त्री, तिचें स्वरूप अवर्णनीय आहे म्हणजे अनिर्वचनीय आहे; ही ज्ञानी लोकांची बुद्धि भ्रष्ट करते म्हणजे त्यांच्या ज्ञानावर आवरण करते. इचें मुख गोड आहे, ती नेहमींच तरुण अशी दिसते व माझ्या एकदेशांत ती आहे त्यामुळें तिची बाधा मला कांहीं नाहीं; कारण मीं पुराणपुरुषोत्तम आहें. म्ह० निर्विकार असल्यामुळें ही माया मला बाधा करूं शकत नाहीं. ॥ १४० ॥

( १४१ )

**अन्वयार्थः**—(हे प्राज्ञ ) बुद्धिमान् रामा (अपूज्यः) अश्रेष्ठ मनुष्य (कर्मणि) कर्मामध्यें (न योज्यः) नियुक्त करूं नये (इति) याप्रमाणें (तद्वचः) श्रीदत्तात्रेयांचें वाक्य (श्रुत्वा) ऐकून (रामः) परशुराम (मौनी अभवत्) मौन स्वीकारून बसला. (तदा) त्या वेळीं (मानिनी माता) रेणुका माता (आह) म्हणाली, ॥१४१॥

( १४२ )

**अन्वयार्थः**—( भेदिनां वादिनां ) भेदवादी माध्वादि लोकांचा (मतभेदव्यतिगेन) जो मतभेद आहे कीं ब्रह्म अद्वितीय आहे का सद्वितीय आहे, या दोन्हींपेक्षां विलक्षण अशा (भवता) आपल्याकडून (सदवादि) योग्यच सांगितलें गेलें. ( हे वृषाकपे), हे इच्छित देणाऱ्या व पापांचा नाश करणाऱ्या श्रीदत्ता, ( भवता उदितवत् ) तुम्हीं पूर्वी म्हटल्याप्रमाणें ( भवतः अन्यः) आपल्याशिवाय दुसरा (इह त्रिविष्टपे कः) या त्रिभुवनांत कोण आहे? ॥ १४२ ॥

**भावार्थः**—द्वैतवादी माध्वादि लोकांनीं जें आपलें स्वरूप वर्णन केलें आहे; द्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत वगैरे या सर्व मतांपेक्षां विलक्षण असें आपलें स्वरूप आहे तें अवर्णनीय आहे; तेव्हां आपण जें पूर्वी सांगितलें ' नग्नः उन्मत्तः ' वगैरे तें सर्व सत्यच आहे. कारण आपलें स्वरूपच तसें आहे. सर्व काम पूरण करणारे व सर्व पापांचा नाश करणारे आपण पूर्वी बोलल्याप्रमाणें ' मी परिग्रह टाकून स्त्रीरत आहें वगैरे ' तें सर्व खरेंच आहे. या त्रिभुवनांत तरी आपल्यासारखा दुसरा कोणीहि नाहीं. ॥ १४२ ॥

( १४३ )

**अन्वयार्थः**—(इति) याप्रमाणें (तन्मातृवचो निशम्य) राममातेचें रेणुकेचें वचन ऐकून (मतिमान्) कुशाग्र बुद्धि असणारे श्रीदत्तात्रेय (तन्मुखतः) तिच्या मुखांतून (निखिलं तन्निशम्य) सर्व वृत्तांत ऐकून ( सादरं तं उवाच ) आदरानें परशुरामाला म्हणाले (अदरं) निर्भय होऊन (सकलं क्षत्रकुलं) सर्व क्षत्रियांचें कूळ (हर) नाहींसें कर. ॥ १४३ ॥

( १४४ व १४५ )

**अन्वयार्थः**—(इति प्रगल्भं) याप्रमाणें प्रशस्त असें (तद्वचः) श्रीदत्तात्रेयांचें भाषण (अवधार्य) ऐकून ( अतिप्रतापः पुरुषः सः ) अत्यंत पराक्रमी पुरुष तो राम त्यानें (देवाज्ञया) श्रीदत्तांच्या आज्ञेनें ( अस्त्रादेव तीर्थमानीय ) आपल्या अस्त्रानेंच पाताळगंगातीर्थ त्या ठिकाणीं आणून ( अजस्य आज्ञया ) श्रीदत्तांच्या आज्ञेनें (सवस्त्रा सती) वस्त्रांशीं सहित ती रेणुका (अत्र स्नात्वा) गंगेमध्यें स्नान करून (सुभूषितांगानि कृत्वापि) सर्व शरीर अलंकारानें सुभूषित करून (आचार्याय) आर्चायाला (सुभूषितां गां दत्वापि ) वस्त्रालंकारविभूषित अशी गायहि देऊन ( सौभाग्यदानानि च ) आणि सौभाग्यवायनदान करून ( स्वयं सौभाग्यदापि ) स्वतःला सौभाग्य देण्याची योग्यता असूनहि (सा) ती रेणुका (ईशा अग्निं विवेश) पतीबरोबर अग्नींत सती गेली. ॥ १४४॥१४५ ॥

( १४६ )

**अन्वयार्थः**——(दिवि) स्वर्गामध्यें (सयोषितां मरुतां) आपापल्या स्त्रियेशीं सहित सर्व देव (ईक्षतां सतां) पाहत असतां (सधवा रेणुभवा) आपल्या पतीशीं सहित रेणु राजाची मुलगी रेणुका (अधिरुह्य) विमाना-मध्यें बसून (सती दिवि स्थिता) साध्वी रेणुका स्वर्गांत गेली (सुतायापि) रामालाहि आठवणीकरितां म्हणून (स्वमुखं) आपलें मुख (भुवि) पृथ्वीवर (ददौ) ठेवून गेली. ॥ १४६ ॥

( १४७ )

**अन्वयार्थः**——(या) जी (रेणुनृपस्य) रेणु नांवाच्या राजाची (कन्या) मुलगी (त्रिकुलजानां) तिन्ही कुलांमध्यें उत्पन्न होणाऱ्यांना (सम्यगुन्नाय-का मान्या) उत्तम प्रकारची गति देणारी व मान्य अशी (या साक्षात्स्वय-मंबिका ) जी साक्षात्पार्वतीच असणारी (सुभाविका) कुशल असणारी ( असौ रेणुका धन्या खलु) ती रेणुका खरोखर धन्य आहे. ( या प्रत्यंघ्रि ) जिनें पावलोपावलीं ( हयेष्टिकोटिसुफलं ) कोटी अश्वमेधांचें निर्मळ सुफळ (अवाप) प्राप्त करून घेतलें. ( ईदृक् तु का अन्या) अशी दुसरी स्त्री कोणती आहे! (इह) या लोकांत (अग्नये) अग्नीला (अलं वर्ष्म) आपलें प्रिय शरीर (अर्पयत्) तिनें अर्पण केलें, अर्थात् सती गेली (मंगलं अलभत्) आपलें कल्याण करून घेतलें. ॥ १४७ ॥

( १४८ )

**अन्वयार्थः**——(इति दिवि देवैः) याप्रमाणें स्वर्गामध्यें देवांनीं (च) आणि (भुवि मानवैः) पृथ्वीवर मनुष्यांनीं (स्तुतायाः) स्तुति केलेल्या (अतिधृतिं) अत्यंत धैर्य करून (सुगतिं च प्राप्य) चांगली गति प्राप्त करून घेऊन (नाकं गतायाः) स्वर्गाला गेलेल्या रेणुकेचें ( इह प्रौढं यशः ) या ठिकाणीं चिरकाल टिकणारें यश (समंतादातं) सर्वत्र पसरलें (तत् अमित-त्वात्) तें यश पुष्कळच असल्यामुळें (शतमुखमुखाः) शेषादि प्रमुख लोक ( वक्तुं न ईशाः ) सुद्धां वर्णन करूं शकले नाहींत. ॥ १४८ ॥

( १४९ )

**अन्वयार्थः**—(सुभाविकानां) भाविक लोकांना (निजार्चकानां) आपली पूजा करणाऱ्यांना (अभीष्टदा नाम) इच्छित देण्याकरितां (सा अद्यापि धरावरे ) ती हल्लींसुद्धां सह्याद्रीश्वर (मातृपुरे) माहर नांवाच्या गांवांत (जागर्ति) जागृत आहे. (तान् परेतान् ) येथें गेलेल्या लोकांना व नरकांत गेलेल्यांनाहि (श्राद्धात्) त्या ठिकाणीं श्राद्ध केलें असतां (ऊर्ध्वं नयति) स्वर्ग लोकाला घेऊन जाते. ॥ १४९ ॥

( १५० )

**अन्वयार्थः**—(दत्ताचार्येण) आचार्यरूपी श्रीदत्तात्रेयांनीं (दत्ताचारः रामोऽपि) ज्याला आचारहि सांगितला आहे अशा रामानें (पित्रोः समं) दोघांचा एकाच वेळीं (विधेः सांपरायं) और्ध्वदेहिक विधि (अकरोत्) केला आणि (क्षत्रकुलं) क्षत्रियांचें कुळ (क्षयं निन्ये) समूळ नाहींसें केलें. ॥ १५० ॥

( १५१ )

**अन्वयार्थः**—(यदागमः) ज्या रामाच्या आगमनानें ( क्षत्रिया-गर्भस्त्रावी) क्षत्रियांच्या स्त्रियांचे गर्भस्त्राव होत असत, (यदीक्षणं) ज्याच्या पाहण्यानें (क्षत्रियप्राणहरणं) क्षत्रियांचे प्राण नाहींसे होत (तेन रामेण) त्या रामानें (यत्प्रभावतः ) ज्या दत्तात्रेयांच्या प्रभावानें ( त्रिःसप्तकृत्वः ) एकवीस वेळां ( उरुधारपरशुना ) तीक्ष्ण धारेच्या कुऱ्हाडीनें (निःक्षत्रां गोत्रां विधाय) निःक्षत्रिय पृथ्वी करून ( क्षत्रवधदोषहृतये ) क्षत्रियांच्या वधानिमित्त झालेल्या दोषांच्या शांतीकरितां (तमेव दत्ताचार्यं वृत्वा) श्रीदत्तात्रेयांना गुरू करून (चातुर्होत्रादिना इष्ट्वा) चातुर्होत्रादि यज्ञयाग करून ( आचार्याज्ञया ) गुरूंच्या आज्ञेनें (सागरांबरां कश्यपाय प्रदाय) कश्यपाला भूमिदान देऊन (सर्वस्वं विप्रेभ्यः प्रदाय) ब्राह्मणांना सर्वस्व देऊन (स्वनिवासाय) आपणांला राहण्याकरितां (असायासं) जास्त त्रास न करितां (समुद्रादभिनवामवनिं उपलभ्य) समुद्रांतून नवीनच एक भूमि

उत्पन्न करून (अवस्थाय) तिथें राहून (श्रीदत्तप्रसादात्) श्रीदत्तात्रेयांच्या प्रसादानें (सावर्णिकेऽन्तरे) सावर्णिक मन्वंतरांत (महर्षित्वं) महर्षित्व (अंते ब्रह्मभूयं) शेवटीं ब्रह्मरूपता (उपलब्धम्) मिळविली. ॥ १९१ ॥

( १९२ )

**अन्वयार्थः**—(बाल:) मुलानें (यत्कीर्तिं ऊचे) ज्याची कीर्ति आपल्या बापाला सांगितली. (सुरवरवरत:) इंद्रादि देवांच्या वरानें (य: अनसूयात्रिपुत्र: जज्ञे) जो अनसूया आणि अत्रिऋषि यांचा मुलगा झाला, (अमरवरकरत:) इंद्रादि देवांकडून (य: जंभासुरं मारयामास) ज्यानें जंभासुराला मारविलें, (भर्गा:) बृहस्पति व इंद्र यांच्या संवाद रूपानें (योऽपि) ज्यानें स्वत: (सप्तभि: गाथाभि:) सात गोष्टी सांगून (यद्भजनरसे इनं भूपं योजयत्) ज्याच्या भक्तिरसांत अर्जुन राजाला गुंगवून टाकलें, (तस्य ऋषेश्च) त्या अर्जुनाचा व रामाचा (इष्टद:) हितकारी जो श्रीदत्तात्रेय (तत्पदे) त्याच्या चरणांवर (इति) आतांपर्यंत सांगितलेल्या (स्रग्धरांतां) स्रग्धरा जिच्या शेवटीं आहे अशी (कवितां) कविता (प्रार्पये) मी अर्पण करतों. ॥ १९२ ॥

**भावार्थः**—स्तबकसमाप्ति या श्लोकांत वर्णन करतात, ज्या श्रीदत्ताची लीला लहान मुलानें आपल्या बापाला सांगितली व इन्द्रादि देवांनीं अनसूयेला वर देऊन श्रीदत्तात्रेयांचा अवतार अत्रि व अनसूया यांचे घरीं करविला, ज्या श्रीदत्तात्रेयांनीं इन्द्रादि देवांकडून जंभासुराला मारविलें आणि बृहस्पति व इन्द्र यांच्या संवादांत आपण स्वत: सात गोष्टी सांगून अर्जुन राजाला ज्या श्रीदत्तात्रेयांच्या भजनामृतांत गर्क करून सोडलें व अर्जुनाला आणि रामाला इच्छित देणारे जे श्रीदत्तात्रेय त्यांच्या चरणांवर ही कविता अर्पण करतों. त्या योगानें श्रीदत्तात्रेय संतुष्ट होवोत. ॥ १९२ ॥

प्रथम स्तबक समाप्त.

---

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः ॥

# श्रीदत्तचम्पूचें भाषांतर

---

## द्वितीय स्तवक

भाषांतरकार—वे. शा. सं. वामनशास्त्री आत्मारामशास्त्री जेरे

नरसोबावाडी

॥ श्री गु रु दे व द त्त ॥

# श्रीदत्तचम्पू

## [ द्वितीय स्तबक ]

श्रीपादश्रीवल्लभश्रीनृसिंहसरस्वतीदत्तात्रेयचरणारविंदाभ्यां नमः ॥

श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीचरणकमलेभ्यो नमः ॥

श्रीमद्गुरुचरणसरोरुहेभ्यो नमः ॥ ॐ ॥

**दत्तात्रेयं नमस्कृत्य वासुदेवं गुरुं सदा ।**
**धीशुद्धयर्थमहं कुर्वे टीकां मातृगिरा मुदा ॥ १ ॥**

श्रीमद्वासुदेवग्रंथ प्रचंड । तेथें न चाले मतीचा पाड । म्हणोनि सद्गुरूंचे चरण दृढ । धरोनि कार्या प्रवर्तलों ॥ १ ॥ सद्गुरूसारिखा । असता पाठिराखा । तरीच या लेखा । धैर्य झालें ॥ २ ॥ सद्गुरू वासुदेवानंद यती । ग्रंथरूपें श्रुतिसार वर्णिती । त्यांचे तेच जाणोत युक्ती । मतिमंदाचा तेथ न ठाव ॥ ३ ॥ परी सद्गुरूकृपा होतांचि । दत्तचंपूद्वितीयस्तबकाची । भाषांतररूपी सेवा दासाची । मानून घेवोत दत्तगुरु ॥ ४ ॥ श्रीगुरूंचे गुण माझे दोष । हा मानूनी येथ विशेष । वाचकें ग्रंथ न करावा उदास । प्रार्थुनी ग्रंथा आरंभितों ॥ ५ ॥

( १ )

**अन्वयार्थः**—(सर्वात्मनः) सर्वात्म स्वरूप असणाऱ्या (सकलेशितुः) सर्वांचें नियमन करणाऱ्या (हृत्स्थस्य) हृदयामध्यें वास करणाऱ्या (भवारेः) संसाराचा शत्रु असलेल्या (अस्य) दत्तात्रेयाचा (विधुतान्यभावः) दुसरेपणा टाकलेला, (उत्स्वभावः) उत्तम स्वभावाचा, (प्रियतमः) अत्यंत आवडता, (अस्तयमः) यमाचा त्याग करणारा, (भजकः) भक्त (तु) तर (कस्यापि) कोणाचाहि (ऋणी न) ऋणी नाहीं, (स च) असा तो दत्तात्रेय

(त्वमेव) तूंच (मे) माझ्या (कुहृदः) दुष्टांतःकरणरूप (अरेः) शत्रूचा (जिता) शासक (भव) हो. ॥ १ ॥

( २ )

**अन्वयार्थः**—(शत्रुजितः) शत्रुजित राजाचा (सुतः) पुत्र (शत्रुजित्) शत्रूला जिंकणारा (ऋतध्वज इति ख्यातः) ऋतध्वज अशा नांवानें प्रसिद्ध (जातः) झाला. (यः) जो ऋतध्वज (गालवयज्ञभंक्तारं) गालव ऋषींच्या यज्ञाचा विध्वंस करणाऱ्या (क्रोडांगं) डुकराचें शरीर असणाऱ्या (दनुजं) दैत्याला (उर्वीतले) पाताळांत (अहन्) मारता झाला. (ततश्च) आणि नंतर (तेन) दैत्यानें (प्रसह्य) बलात्कारानें (हृतां) हरण केलेल्या (सन्मतां) सज्जनांना मान्य असलेल्या (दैवेनोपगतां) दैवानें प्राप्त झालेल्या (विश्वावसोः सुतां) विश्वावसु गंधर्वाच्या मुलीला (वव्रे) वरता झाला. (ततः) नंतर (अन्यार्पिताम्) पितरादिकांनीं दिलेल्या (कुवलयाश्वाख्यां) कुवलयाश्व अशा प्रसिद्धीस (गतः) प्राप्त झाला.॥ २ ॥

( ३ )

**अन्वयार्थः**—(मदालसाख्या) मदालसा नांवाची (गंधर्वपुत्री तु) गंधर्वाची मुलगी तर (सख्याः) कुंडला मैत्रिणीच्या (प्रयत्नेन) प्रयत्नानें (नृपाय) राजाला (दत्ता) दिली. (या) जी मदालसा (परमोद्भवस्य) उत्कृष्ट सोहाळ्यास (पात्रभूता) योग्य झाली, (सा) ती मदालसा (धवस्य) पतीच्या (चित्तानुसारिणी) मनोनुकूल (अभवत्) झाली.॥ ३ ॥

( ४ )

**अन्वयार्थः**—(निहतासुरस्य) मारलेल्या दैत्याचा (पातालकेतोः) पातालकेतूचा (सहजः) बंधु (सः) तो (तालकेतुः) तालकेतु नांवाचा (नृपवंचनार्थं) कुवलयाश्वाला फसविण्याकरतां (वने) वनामध्यें (चिरस्य) चिरकाल (मुनिः सन्) मुनिवेष धारण करणारा असा (यज्ञार्थं) यज्ञाकरतां उर्वीशं राजाला (अर्थं) पैसे (अयाचत) मागता झाला.॥ ४ ॥

( ५ )

**अन्वयार्थः**—( कुवलयाश्वः ) ऋतध्वज ( यज्ञसंपत्तये ) यज्ञाच्या दक्षिणेकरितां (मुदा) आनंदानें (मृषा) कपटानें ( वेषांतरजुषे ) मुनिवेष धारण करणाऱ्या (तस्मै) त्या तालकेतूला (हिरण्मयीं) सोन्याची ( कंठ-भूषां) गळ्यांतील कंठी (अदात्) देता झाला. ॥ ५ ॥

( ६ )

**अन्वयार्थः**—(ताम्) त्या (भूषां) अलंकाराला (आदाय) घेऊन (सः) तो (मायिकः) मायावी (तद्राष्ट्रं) त्या राजाच्या देशांत (आगत्य) येऊन (तत्र) त्या ठिकाणीं (सर्वेषां) सर्व लोक (शृण्वतां) ऐकत असतां ( भूषां दत्त्वा) ती कंठी देऊन (मृषा) खोटें ( अवदत्) बोलता झाला.॥६॥

( ७ )

**अन्वयार्थः**—(वैरं) वैर (स्मरन्) स्मरणारा (द्विषन्) शत्रु (दैत्यः) पातालकेतू (वने) वनामध्यें (एकलं) एकट्या (नृपं) कुवलयाश्वाला (अहन्) मारता झाला. ( ततः ) नंतर (आरण्यकैः ) वनांतील भिल्लांनीं (दग्धः) त्याला जाळलें. (एषा) ही (तद्भूषा) त्याची कंठमाला (मे) माझें (वचः) वचन (अमृषा) खोटें नाहीं. ॥ ७ ॥

( ८ )

**अन्वयार्थः**—(इत्युक्त्वा) असें बोलून (सः) तो दैत्य ( अगात् ) गेला. (योषा) स्त्री (मदालसा) कुवलयाश्वपत्नी ( तद्भुषां ) राक्षसानें दिलेली ती कंठी (आदाय) घेऊन ( अग्नौ ) अग्नीमध्यें ( विवेश ) प्रवेश करती झाली. (ततः) अग्निप्रवेशानंतर (भूपः) कुवलयाश्व ( एत्य ) येऊन (तदद्भुतम्) राक्षसाच्या भाषणापासून मदालसेचा मृत्यु वगैरे विचित्र हकीकत (अश्रौषीत्) ऐकता झाला. ॥ ८ ॥

( ९ )

**अन्वयार्थः**—(प्रियानृण्याय) पत्नीच्या ऋणांतून मुक्त होण्यासाठीं (राट्) कुवलयाश्व (भोगं) राजविलास (त्यक्त्वा) टाकून (असंगं) एकटा

(वने) वनांत (वसन्) राहणारा होत्साता (विनयैः) विशेष नीतिमान् असलेल्या (कंबलाश्वाहितनयैः) कंबल आणि अश्वतर या दोन नागपुत्रांशीं (संगतोऽभवत्) संगती करता झाला. ॥ ९ ॥

( १० )

**अन्वयार्थः**—(अश्वतरकाद्रवेश्वरः) अश्वतर नांवाचा नाग (पुत्रमित्रसुकलत्रलब्धये) आपल्या पुत्राच्या मित्राची कुवलयाश्वाची सुंदर मदालसा मिळण्यासाठीं (वाक्प्रसादवशतः) सरस्वतीला प्रसन्न करून नंतर (कृपाब्धये) कृपासागर शंकरास प्रसन्न करण्याकरतां (रम्यं) सुस्वर (जगौ) गायन करता झाला. (तदा) त्या वेळीं (ईश्वरः) शंकर (प्रमुदितः) प्रसन्न झाला. ॥ १० ॥

( ११ )

**अन्वयार्थः**—(वयोवर्णाकृतिगतिध्वानैः) वय, वर्ण, शरीररचना, चालणें बोलणें यांनीं (तुल्यां) सारख्या (मदालसाम्) मदालसेला (प्राग्वद्वव्रे) पूर्वीप्रमाणें असलेली मागितली. (ईशः) शंकर (तथेति) त्याप्रमाणें होईल असें (आभाष्य) बोलून (पुरः) समोरच (अंतरधात्) अंतर्धान पावले. ॥ ११ ॥

( १२ )

**अन्वयार्थः**—(शिवप्रसादात्) शंकराच्या वरामुळें (श्राद्धीयमध्यपिंडाशनात्) श्राद्धांतील मधला पिंड खाल्ल्यामुळें (अहेः) नागाच्या (पत्न्याः) पत्नीच्या (निश्वासतो) श्वासाबरोबर (सा मदालसा) ती मदालसा (पूर्ववत्) पूर्वीं जशी होती तशी (जज्ञे) उत्पन्न झाली. ॥ १२ ॥

( १३ )

**अन्वयार्थः**—(सा) ती मदालसा (स्वप्नोत्थितवद्बुध्वा) स्वप्नांतूनच जागे झालें असें समजून (हा नाथ) हे कांता (अनन्यशरणां), त्वदेक शरण असणाऱ्या अशा (मां) मला (हित्वा) टाकून (क्व यास्यसि) कोठें

जातोस (इति) असें (दीनवत्) दीनासारखी (पर्यदेवयत्) विलाप करती झाली. ॥ १३ ॥

( १४ )

**अन्वयार्थः**—(अहिः) अश्वतरनाग (इति) याप्रमाणें (विलपंतीं) विलाप करणाऱ्या (तां) त्या मदालसेला (आश्वास्य) आश्वासन देऊन (तत्पतिम्) तिच्या नवऱ्याला (आनाय्य) आणवून (तस्मै कुवलयाश्वाय) त्या कुवलयाश्वाला (विधिना) विधिपूर्वक (मदालसाम्) मदालसा (अदात्) देता झाला. ॥ १४ ॥

( १५ )

**अन्वयार्थः**—(नृपः) तो कुवलयाश्व (सपारिबर्हां) नजराण्यासहित असलेल्या (हृष्टां) आनंदित असलेल्या (तां) त्या मदालसेला (आदाय) घेऊन (हृष्टः) आनंदित (सन्) होत्साता (पुरमेत्य) आपल्या नगराला येऊन (तातं) बापाला (धूर्जटेर्वशात्) शंकराच्या प्रसादानें (यज्जातं) जें घडलें (तत्) तें (अवदत्) सांगता झाला. ॥ १५ ॥

( १६ )

**अन्वयार्थः**—(शत्रुजित्) कुलवयाश्वपिता (आद्यां सृष्टिं) नवीन झालेल्या स्नुषेला (दृष्ट्वा) पाहून (प्रीतः) प्रसन्न झाला. (सुतन्यस्तधराभारः) आपल्या मुलावर पृथ्वीचा भार टाकलेला असा तो (वनं) सेवन करण्यास योग्य अशा (वनं) वनांत (यातः) गेला. (तत्र च) आणि तेथें (भागवतीं गतिं) मुक्तीला (भेजे) प्राप्त झाला. ॥ १६ ॥

( १७ )

**अन्वयार्थः**—(पित्र्ये) बापाकडून मिळालेल्या (राज्ये) राज्यावर (स्थितः) बसलेला (ख्यातः) प्रख्यात असलेला (शस्तः) प्रशस्त असलेला (शत्रुजितः सुतः) शत्रुजिताचा मुलगा (युक्तदंडधरः सन्) योग्य दंड करणारा (समानदृक्) साम्यदृष्टी ठेवणारा होत्साता (प्रजा इव)

मुलाप्रमाणें (प्रजाः) राज्यांतील लोकांना (अरक्षत्) रक्षण करता झाला. ॥ १७ ॥

( १८ )

**अन्वयार्थः**—(ततः) नंतर (सा) ती (पत्नी) मदालसा (अंतर्वत्नी) गरोदर (संजाता) झाली. (ततः) नंतर (गंगा देवव्रतमिव) गंगानदी भीष्माला जशी प्रसवली तशी (सती मदालसा) पतिव्रता मदालसा (सुतं) मुलाला (असूत) प्रसवती झाली. ॥ १८ ॥

( १९ )

**अन्वयार्थः**—(जातमात्रं) उपजलेल्याच (सुतं) मुलाला (वीक्ष्य) पाहून (सा) ती मदालसा ( उल्लापनमिषेण ) गाण्याच्या निमित्तानें (बोधदुग्धं) ज्ञानरूपी दूध (अपाययत्) पाजती झाली. (स्तन्यं तु) स्तनांतील दूध तर (प्राणभृतये) प्राणाचें रक्षण होण्याकरितां (अपाययत्) पाजती झाली. ॥ १९ ॥

( २० )

**अन्वयार्थः**—(रे) अरे मुला (त्वं) तूं (कस्मात्) कशासाठीं (रोदिषि) रडतोस? (यस्मात्) ज्याअर्थी (त्वं) तूं (इतः) येथून (पूर्वं) पूर्वजन्मीं (भ्रष्टपथः) मार्ग चुकलेला (अभूः) झालास (तस्मात्) त्याअर्थी (कष्टं) दुःख (अकस्मात्) एकाएकीं (अवाप्तम्) प्राप्त झालें. ॥ २० ॥

( २१ )

**अन्वयार्थः**—(ते) तुझी (वनितासुताः) बायका मुलें (अद्य) आज (क्व) कोठें आहेत? (जनिता माता च अद्य क्व) पिता व जन्म देणारी आई हीं आज कोठें आहेत ? ( जनता च अद्य क्व याता ) ते तुझे आप्तेष्ट वगैरे लोक आज कोठें गेले? ( ते ) तुझे ( अंते) शेवटीं (कोऽपि) कोणीहि (न अविता ) रक्षण करणारा नाहीं. ॥ २१ ॥

( २२ )

**अन्वयार्थः**—(पूर्वनिकेतार्थरथाः) पूर्वीच्या जन्मांतील गृह धन व रथादि (अद्य क्व) आज कोठें आहेत? (तस्य कथापि न) त्या सर्वांची आज वार्तासुद्धां नाहीं (च) आणि (यथा) जसें ( प्राक् ) पूर्वी ( तथा ) तसें (अद्यापि) आज सुद्धां (भविष्यति) होईल. (तादृश चिंता) तशाची स्मृती (वृथा) व्यर्थ आहे. ।। २२ ।।

( २३ )

**अन्वयार्थः**—(हे कुमते) अरे व्यावहारिक बुद्धीच्या मुला, (यदि) जर (ते) तुला (रूपविमोहः न) लावण्याचा मोह झाला नसता (तर्हि) तर (अक्षिविभंगो न) यमाकडून नेत्रभंगहि झाला नसता (च) आणि (यदि) जर (भैक्ष्ययशोत्तं) भिक्षा मागून संपादन केलेलें अन्न खाशील तर (ते) तुला (नारकभुक्तिर्न) नरक तोंडांत घातला जाणार नाहीं. ।।२३।।

( २४ )

**अन्वयार्थः**—(इट्परिरंभे तु ) ईश्वरास आलिंगन दिलें तर (अयसः) लोखंडाच्या ( स्त्रीपरिरंभः न ) स्त्रीचें आलिंगन होणार नाहीं; (पुनः) वारंवार (मातुः उ पयसः पानं न) मातेचें दुग्ध प्राशन करावें लागणार नाहीं. (अतः) म्हणून (स्वमनः) स्वतःचें चित्त (सदा) नेहमीं (पाहि) वश ठेव. ।। २४ ।।

( २५ )

**अन्वयार्थः**—(रे) अरे मुला (मा स्वप मा स्वप) निजूं नको, ऊठ, निजूं नको. (भूप) ज्ञान व योगभूमिकेचें पालन करणाऱ्या राजा ( निजरूप एव ) स्वात्मसुखाचे ठिकाणींच (जागृहि जागृहि) जागा राहा, जागा रहा. ।।२५।।

( २६ )

**अन्वयार्थः**—(रे भूप) अरे राजा ( हे स्वेक्षक ) बा स्वरूपनिष्ठा (अगुणमय्यां) त्रिगुणरहित असलेल्या ( सकलनिशायां ) सर्व लोकांना

रात्रीप्रमाणें असणाऱ्या चैतन्यस्वरूपांत (शय्यां) झोप (मा भज) घेऊं नको. ॥ २६ ॥

( २७ )

**अन्वयार्थः**—(रे भूप) हे भूपा ( यस्यां ) ज्या विषयनिष्ठेंत ( सर्वे जाग्रति ) सर्व लोक जागतात, ( गुणमय्यां तस्यां ) गुणयुक्त त्या विषय निष्ठेंत (त्वं) तूं (स्वापमेहि) झोपी जा. ॥ २७ ॥

( २८ )

**अन्वयार्थः**—(सुमते आत्मज) अरे बुद्धिवान् मुला (काकोलूक-रनिड्वद्व्यवहरतस्ते) कावळ्याच्या व घुबडांच्या रात्रीप्रमाणें व्यवहार करणाऱ्या तुला (क्वापि) कोठेंहि (दिग्भ्रमः न) दिशाभूल होणार नाहीं. ॥ २८ ॥

( २९ )

**अन्वयार्थः**—(अकास्पदात्) दुःखांचें स्थानभूत असलेल्या (कनक-सुकमनीयकामिनीप्रथितमहानरकात्) सुवर्ण व सुंदर स्त्रीरूपी प्रसिद्ध भयंकर नरकापासून (द्राक्) तावडतोब (दूरं अपसर) दूर सरक, (तथा) त्याचप्रमाणें ( विषयविषधराद्विषय्यहींद्रात् ) विषयरूप विष धारण करणाऱ्या इंद्रियरूप सर्पांचा राजा जें मन त्यापासून (दूरं अपसर) दूर हो; (इतः) याच्यापासून (प्रमादमृत्युः ) भ्रमरूपी मृत्यु येतो. ॥२९॥

( ३० )

**अन्वयार्थः**—(यदि) जर (त्वं) तूं (जातिमृतित्रासाद्रोदिषि) जन्म-मरणाच्या त्रासानें रडत असशील तर (तेऽपि) जन्ममरणसुद्धां (ते न) तुझे नाहींत; (भावषट्कयुतो देहः) उत्पन्न होतो, असतो, वाढतो, परि-णामास पावतो, क्षीण होतो व मरतो या सहा भावांनीं युक्त असलेलें शरीर ( भावाभावविकारभाक् ) जन्म व मरण या विकारांनीं युक्त आहे. ॥ ३० ॥

( ३१ )

**अन्वयार्थः**—(क्षुतृडुभे असुजाते) क्षुधा व तृषा हे दोन्ही प्राणापासून उत्पन्न झाले आहेत, (मोहशुचौ ते न) मोह व शोक हे तुझे नाहींत (हि ते मनोजाते) कारण ते दोन्ही मनापासून झाले आहेत. (बंधमुक्ती न जाते) बंध व मोक्ष हे दोन्ही उत्पन्न झाले नाहींत (ते अपि) बंध व मोक्षसुद्धां (कर्तृसंजाते) कर्त्यापासून झाले आहेत. ॥३१॥

( ३२ )

**अन्वयार्थः**—(हे देहाद्यतीत) देहेंद्रियादिकांहून पलीकडे असणाऱ्या, (तत्साक्षिन्) देहादिकांचा साक्षीस्वरूप असणाऱ्या, (ते) तुझें (साक्षित्वबोध्दृत्वे) साक्षित्व आणि बोध्दृत्व हे (स्वतः) उपाधीशिवाय (निर्विकारत्वतः) व विकार न होतां आहेत (विद्धि) असें जाण. ॥ ३२ ॥

( ३३ )

**अन्वयार्थः**—(देशाद्यतीत) देशकालाहून पलीकडचा असणाऱ्या, (अनंत) अंतरहित असणाऱ्या, (गमागमविवर्जित) जन्ममरणरहित असणाऱ्या, (केवलानुभवात्मनः) केवल अनुभवस्वरूप असणाऱ्या (ते) तुला (कर्तृत्वं न) कर्तृत्व नाहीं, (भोक्तृत्वं न) भोक्तृत्वहि नाहीं. ॥३३॥

( ३४ )

**अन्वयार्थः**—(परात्पर) सर्व कारणांच्या कारणस्वरूपा (एकमेवाद्वितीयं सत्) द्वैतरहित एकच असलेलें जें सद्ब्रह्म (तद्ब्रह्म त्वं असि) तें ब्रह्म तूं आहेस. (एवं शश्वत्स्वरूपानुसंधानं कुरु) याप्रमाणें सतत ब्रह्मस्वरूपाचें अनुसंधान कर; (ते शमस्तु) तुझें कल्याण असो.॥३४॥

( ३५ )

**अन्वयार्थः**—(एवं) याप्रमाणें (उल्लापनमिषेणैव) गाण्याच्या निमित्तानेंच (तं सुतं) त्या मुलाला (बोधयामास) बोध करती झाली. (यथा यथा स ववृधे) जसा जसा तो मुलगा वाढला (बोधोऽप्यस्य तथा तथा) तसा तसा त्या मुलाचा बोधसुद्धां वाढला. ॥ ३५ ॥

( ३६ )

**अन्वयार्थः**—(सा) ती मदालसा (भूयोऽपि जातं) पुनः झालेल्या (सुतं) मुलाला (नयं जगौ) नीतिधर्म गाण्याच्या रूपानें शिकविती झाली. ( तथा तृतीयं ) त्याचप्रमाणें तिसऱ्या मुलालाहि बोध करती झाली. (स्वरामं तनयं) स्वरूपसुखांत रममाण असणाऱ्या त्या मुलांना (कामक्रुड्लोभदावालपशिखा) कामक्रोध लोभरूपी दावाग्नीची ज्वाळा (सर्वत्र ततापि) सगळीकडे व्यापून असली तरीसुद्धां (न पस्पर्श) स्पर्श करिती झाली नाहीं. ॥ ३६ ॥

( ३७ )

**अन्वयार्थः**—( तेषामपि त्रयाणां पुत्राणां ) त्या तीनहि मुलांचीं (स्त्र्यननुमताः) मदालसेला संमत नसलेलीं ( विक्रांतसुबाहुशत्रुजित्संज्ञाः ) विक्रांतवर्मा, सुबाहु व शत्रुजित् हीं नांवें (अनुक्रमेणैव) यथाक्रमच ( राज्ञा योजिताः ) राजानें ठेविलीं. ॥ ३७ ॥

( ३८ )

**अन्वयार्थः**—(क्षमैकभद्रासनानां) क्षमा हेंच एक सिंहासन आहे ज्यांचें अशा किंवा राजाचें विशेषण लावतांना—पृथ्वीवर एकच सिंहासन आहे ज्याचें—अशा (अनाहताग्र्यतूर्यस्वनानां) अनाहत नांवाचा योग प्रक्रियेंतील ध्वनी हेंच श्रेष्ठ मंगलवाद्य आहे ज्यांचें अशा किंवा—कारागिरांच्या कुशलतेनें न वाजवितां होणारा आहे मंगलनाद ज्याचा अशीं वाद्यें आहेत ज्याचीं, असा (समानानां) शत्रु व मित्रांचे ठिकाणीं सारखें वर्तन आहे ज्याचें, अशा किंवा सर्वत्र मानसन्मानानें सहित असणाऱ्या ( हरिन्नारीधृतयशःप्रकीर्णानां ) दिशारूपी स्त्रियांनीं यशरूपी चवऱ्या धारण केलेल्या आहेत ज्यांच्या अशा किंवा मनोहर स्त्रियांनीं धरल्या आहेत यशाप्रमाणें शुभ्र चवऱ्या ज्याच्या अशा, ( पुष्करछत्राणां ) आकाश आहे छत्र ज्याचें अशा किंवा श्वेत कमलाप्रमाणें आहे छत्र ज्याचें अशा (पुत्राणां) तीन मुलांचें (तथाविधादपि भर्तुराधिक्यं) असल्या

प्रकारचें वैभव असणाऱ्या पतीपेक्षांहि श्रेष्ठ असणारें असें (सदाऽप्राकृतं वैभवं पश्यंती) नेहमीं स्वत:सिद्ध असणारें वैभव पाहणारी (सती) साध्वी मदालसा (सुतरां जहर्ष) अत्यंत आनंदित झाली. ॥ ३८ ॥

( ३९ )

**अन्वयार्थ:**—(बाह्यांतरावरणहीनान्) बाहेरील वस्त्रादि व आंतील अज्ञान या पांघरुणांनीं रहित असलेल्या (अदीनान्) प्रसन्न असलेल्या (परतरलीनान्) परब्रह्मांत लीन असलेल्या (बहिर्मलीनान्) बाहेरील अंगास मळ वगैरे लागलेल्या (जडोन्मत्तपिशाचवत्स्थितान्) जडाप्रमाणें, उन्मत्ताप्रमाणें व पिशाचाप्रमाणें असलेल्या (तान्) त्या (सुतानपि वीक्ष्य) मुलांनासुद्धां पाहून (प्राकृतलोचन: पिता) व्यावहारिक दृष्टि असलेला पिता कुवलयाश्व (इदं वचनमुवाच) हें वचन बोलला. ॥ ३९ ॥

( ४० )

**अन्वयार्थ:**—(स्वधर्मे स्थितौ) आपल्या धर्माचे ठिकाणीं निष्ठा असणारे, (सदाचाररतौ) नेहमीं सदाचरणामध्यें रत असणारे, (मतौ) लोकांमध्यें मान्य असणारे, (पूतौ) पवित्र असणारे, (आवां दंपती) आम्ही पति-पत्नी दोघेहि असून (अथापि) तरी सुद्धां (इदं) हें (कुपुत्रफलदं कर्म कुत:) वाईट मुलें प्राप्त होणारें कर्म कोठून आलें ? ॥ ४० ॥

( ४१ )

**अन्वयार्थ:**—(अत्र कुपुत्र: तज्जन्म धिक्) ज्यामध्यें कुपुत्र असतो त्या जन्मास धिक्कार असो ! (यत् पुत्रसुज्योति:) जी पुत्ररूपी चांगली ज्योती (कुलं हि ऊर्ध्वं नयति) कुलास उत्कर्षास पोंचविते.(तत्) ती पुत्ररूपी ज्योती (यत्र न) ज्या घरांत नाहीं (तत् वनोपमं सद्म धिक्) त्या वनासारख्या घराला धिक्कार असो ! ॥ ४१ ॥

( ४२ )

**अन्वयार्थ:**—(लोकजित्यै मत: पुत्र:) परलोकास साधन म्हणून पुत्र हा प्रशस्त आहे. (लोकपोऽपि) ब्रह्मदेवसुद्धां (तपोऽतपत्) पुत्राकारितां

तपश्चर्या करता झाला. (प्रजाकाम: प्रजापाश्च) पुत्रांची इच्छा करणारे दक्षादिकसुद्धां (तपोऽतपत्) तपश्चर्या करते झाले. (प्रजा विना कुतो लोक:) पुत्राशिवाय कोठून स्वर्गादि लोक मिळणार? ॥ ४२ ॥

( ४३ )

**अन्वयार्थ:**—(एवं असौ अज्ञ:) याप्रमाणें विचाराच्या योगानें अज्ञानी असलेला राजा (विपरीतभावनया) विरुद्ध कल्पनेनें (दीनोऽभूत्) दीन झाला. (अथ) कांहीं कालानंतर (जाया) मदालसा (भूयो गुर्विणी भूत्वा) पुन: गरोदर होऊन (मतं सुतमसूत) योग्य मुलाला प्रसविली. ॥४३॥

( ४४ )

**अन्वयार्थ:**—(अथ) नंतर (एषा योषा) ही स्त्री मदालसा (पंचसु तुंगगेषु) पांच ग्रह उच्च स्थानांत गेले असतां (खगेषु अखगगेषु) कोणतेहि ग्रह अस्ताला गेले नसतां (त्रिशक्तिजं) प्रभाव, उत्साह व संधी या तीन शक्तींपासून उत्पन्न झालेल्या (अक्षयं स्वमिव) नाश न पावणाऱ्या धनाप्रमाणें (जातं) झालेल्या (वीक्ष्य) पाहून (शंकितापि) साशंक असूनसुद्धां (विदोषा उपदिदेश) अज्ञानरहित होत्साती मदालसा उपदेश करती झाली. ॥ ४४ ॥

( ४५ )

**अन्वयार्थ:**—(ज्योतिषकै: प्रोत्साहित:) ज्योतिषांनीं उत्तेजन दिला गेलेला (स भूपति:) तो राजा (आत्मजातं) आपल्या मुलाचा (जातकर्माकरोत्) उत्पन्न झाल्यावर करणेचा संस्कार करता झाला. (अथ) जातकर्मानंतर (नाम्ना संस्कर्तुं) नामकरण करण्याकरितां (अर्भकाय) मुलाला (किंनाम देयं) काय नांव ठेवावें (मे वद) मला सांग (इति) असें (भार्यामुवाच) मदालसेला विचारता झाला. ॥ ४५ ॥

( ४६ )

**अन्वयार्थ:**—(अयि) हे प्रिये (प्राक्पुत्रनामानि) पूर्वींच्या मुलांचीं नांवें (ते कुत: अमतानि) तुला कां संमत नव्हतीं, (तानि निरर्थान्यपि

किं नु वद) तींसुद्धां निरर्थक कां आहेत तें सांग. (मानिन्युवाच) मदालसा म्हणाली, (अंग) बा प्राणप्रिया, ( यस्य अजस्य गतिर्न ) ज्या नित्य आत्म्याला गति नाहीं (तस्य विक्रांतसंज्ञा साधु न हि) त्या नित्य आत्म्याला विक्रांत म्हणजे गमन करणारा अशी संज्ञा योग्य होणार नाहीं. ॥ ४६ ॥

( ४७ )

**अन्वयार्थः**—( नाथ ) हे प्राणनाथ, (अस्य अंगवार्ता न) या आत्म्याला निरवयव असल्यामुळें अंग असणें ही वार्तासुद्धां नाहीं; (तस्य) त्या आत्म्याला (सुबाहुसंज्ञा सार्था किं) सुंदर हाताचा हें नांव योग्य होईल काय ? (अतो निरर्था) म्हणून सुबाहु हें नांव निरर्थक आहे. (एकस्य कः शत्रुः) एकच असणाऱ्या आत्म्याला शत्रु कोण असणार ? (अतः) म्हणून (अस्य) या आत्मस्वरूपी तिसऱ्या मुलाला (शत्रुजित्-संज्ञा सार्था किं) शत्रूला जिंकणारा हें नांव सार्थक होईल काय? (अतो निरर्था) म्हणून ती संज्ञा निरर्थक आहे. ॥ ४७ ॥

( ४८ )

**अन्वयार्थः**—(एवं) याप्रमाणें ( पारमार्थिकदृशा ) पारमार्थिक दृष्टीनें ( ईदृशी सार्थता न ) याप्रमाणें सार्थकता नाहीं. ( व्यावहारिक-दृशापि तादृशी सार्थता न ) व्यावहारिक दृष्टीनें सुद्धां तसली सार्थकता नाहीं. (इह) आमच्या घरांत (जडमूढडिंभवद्वर्तितां ) जडाप्रमाणें, मूर्खा-प्रमाणें व पोरकटाप्रमाणें वागणाऱ्या मुलांना ( निरर्थताभवत् ) त्या नांवाची निरर्थकताच झाली. ॥ ४८ )

( ४९ )

**अन्वयार्थः**—(व्यवहारिन् ) व्यवहारांत निष्णात असणाऱ्या,(यदा) जर ( व्यवहारसुसिद्धये ) लौकिक व्यवहार करण्याकरितां ( आव्हयः ) नांव (मतं) मान्य असेल ( तदा ) तर (नाथ) अहो पतिराज (यदि मे मतं ते सुमतं ) जर मला मान्य असलेलें तुम्हाला संमत असेल तर ( जातं ) मुलांला ( अलर्कसांज्ञितं कुरु ) अलर्क असें नांव ठेवा. ॥ ४९ ॥

( ५० )

**अन्वयार्थः**—(सः) तो कुवलयाश्व (तथा इति) तुझ्या सांगण्याप्रमाणेंच ठेवूं या असें म्हणून (सुताय) मुलास (आख्यां अदात्) अलर्क हें नांव ठेवता झाला. (तनयाभ्युदयार्थी) मुलाच्या उत्कर्षाची इच्छा करणारा होत्साता (विनयात्) नम्रतेनें (द्विजादिभ्यः अपि) ब्राह्मणांनासुद्धां (यथेष्टं धनादि अदात्) इच्छेप्रमाणें धन, वस्त्रें, धान्य वगैरे देता झाला. ॥ ५० ॥

( ५१ )

**अन्वयार्थः**—(मुदान्वितोऽपि) आनंदित असूनसुद्धां (नलिनाक्ष अयं) कमलनेत्र राजा (कदाचित्) एकदा ( मलिनं द्वितीयं तनयं स्वयं वीक्ष्य) घाणेरडा झालेल्या दुसऱ्या मुलाला स्वतः पाहून (सदयं अब्रवीत्) दयायुक्त होत्साता बोलला. ॥ ५१ ॥

( ५२ )

**अन्वयार्थः**—(दंडनीत्यादि विज्ञाय) दंड, नीति वगैरे जाणून (सदृशीं स्त्रियं विवाह्य) अनुरूप स्त्रीबरोबर विवाह करून (नीत्या स्वराज्यं कृत्वा ) नीतीनें स्वतःचें राज्य करून (पूज्यं इष्ट्वा) देव, पितर, वृद्ध वगैरे लोकांची सेवा करून (अनृणी व्रज) सर्व ऋणांतून मुक्त होत्साता मग वैराग्यानें वनांत जा. ॥ ५२ ॥

( ५३ )

**अन्वयार्थः**—(आतमौढ्यं त्यज ) हा खुळेपणा धारण केलास तो टाक.(तनुज)बा मुला (गेही एधि) गृहस्थाश्रमी हो.(अध्वरैर्यज) यज्ञ करून देवांना तृप्त कर. (यैः) ज्या यज्ञांच्या योगानें (इह देही कृती) या लोकांत मनुष्य कृतकृत्य होतो. (अत्रैव हि) या गृहस्थाश्रमांतच (अग्रतो) वानप्रस्थाश्रम स्वीकारण्यापूर्वी (सांपरायं भज) पारलौकिक साधन कर. (ततः अटवीं व्रज) नंतर अरण्यांत जा. (अंतरायं न प्राप्स्यसि) असें केलेंस तर विघ्न येणार नाहीं. ॥ ५३ ॥

( ५४ )

**अन्वयार्थः**—(स ज्ञाता) तो ज्ञानी सुबाहु (प्रहस्य)हंसून (तं आह) त्या राजाला म्हणाला, (सद्विद्या मातृतोर्जिता) मीं ब्रह्मज्ञान आईकडून संपादन केलें आहे.(स्वानुभूतिः कांता वृता) स्वानुभूती हीच स्त्री मीं वरली आहे. ( स्वाराज्यस्थिरतागता ) स्वयंप्रकाश आत्म्यामध्यें मला स्थिरता आली आहे. ।। ५४ ।।

( ५५ )

**अन्वयार्थः**—(आर्या ते भार्या न आचार्या) पूज्य असलेली तुझी पत्नी आमची उपदेष्ट्री आहे. (वयं त्रयः सोदर्याः) आम्ही तिघे भाऊ (आर्याः) ईश्वरभक्त आहोंत. (तुर्यः) चौथा भाऊ (भविता) भक्त होणार आहे. (आर्य) श्रेष्ठ असणारा (त्वं) तूं ही (अतः कृती भव) म्हणूनच कृती हो ! किंवा (त्वं आर्यातः कृती भव) तूं आईपासून ज्ञान मिळवून कृत-कृत्य हो ।। ५५ ।।

( ५६ )

**अन्वयार्थः**—(आत्मविद्यया) ब्रह्मविद्येनें (द्वयतः) संसारापासून (पृथक्कृतं) वेगळें केलेलें (अद्वयं) शुद्ध आत्मतत्व (पुनः) परत (ऐक्यं न भजेत् ) संसाराशीं एकतापन्न होत नाहीं. (मथनेन) घुसळण्यानें (पृथक्कृतं) ताकापासून वेगळें केलेलें (नवनीतं) लोणी (पुनः) वेगळें केल्यानंतर (तत्रं) ताकांत (न हि ऐक्यभाक् ) एकरूप होत नाहीं. ।। ५६ ।।

( ५७ )

**अन्वयार्थः**—(इत्थं) या प्रकारचें, (सतां मतं) सज्जनांना मान्य असलेलें, (ऋत) खरें, (अमृतस्पर्धि भाषितम् ) अमृताशीं स्पर्धा करणारें भाषण, (तातः) बाप जो कुवलयाश्व,(यथा ज्वरितोऽन्नं) ज्याप्रमाणें तापकरी मनुष्य अन्नास मानतो, (तथा) तसें (तत्) तें भाषण (कर्णशूलवत् मेने) कानांत सूळ घातल्याप्रमाणें मानता झाला. ।। ५७ ।।

( ५८ )

**अन्वयार्थ:**—(प्राहववित्पतिः) भांडण जाणणारा राजा, (सतीं एत्य) मदालसेजवळ येऊन (असतीमुक्तिं प्राह) वाईट वचन बोलला; (मूढे) मूर्खे, (अश्राव्यं) ऐकण्यास अयोग्य, (वंशनाशनं वचः) वंशाचा नाश करणारें भाषण, (सुतान्) मुलांना (किं ब्रूषे) कां ऐकवितेस ? ॥५८॥

( ५९ )

**अन्वयार्थ:**—(अनेन कूपदेशेन) या वाईट उपदेशानें (नौ) आमचें व पुत्रांचें (शं) कल्याण (न) होणार नाहीं. (इतः का गतिः) या मुलांच्या नंतर आमची काय गती होईल ? (नः) आमच्या (स्वर्गादिस्थपितृणां) स्वर्ग, पितृलोक व प्रेतयोनींत असलेल्या पितरांना (कः) कोण (निवापप्रदः वद) तिलोदक तर्पण वगैरे करणारा कोण आहे, सांग. ॥५९॥

( ६० )

**अन्वयार्थ:**—(विधिना) ब्रह्मदेवानें (कृत्तिवासः) ईश्वराला (सुतुष्टिदा) अत्यंत तुष्टी देणारी (इयं) ही (वृत्तिः) श्राद्धादिकवृत्ति (कृता) केली आहे. (नृणां च पुष्टिदा) ही वृत्ति श्राद्ध करणाऱ्या मानवांसहि सुख देणारी आहे. (गेही) गृहस्थाश्रमी, (सर्वोपजीवनं न हि किम्) सर्वांना उपकारक नाहीं काय ? ॥ ६० ॥

( ६१ )

**अन्वयार्थ:**—(यः) जो, (गेही) गृहस्थाश्रमी, (कुमतिः) क्षुद्रबुद्धि होत्साता (मतां) सर्वमान्य असलेल्या (देवदत्तां) देवानें दिलेल्या (तां) त्या (गोहस्तिवीतिसंपत्तिं) गायी, हत्ती, घोडे व धनधान्यादि संपत्तीला (जहाति) टाकून देतो, (देवद्रोही सः) देवाचा द्वेष करणारा असा तो (अधः पतेत्) अवनतीस जाईल. ॥ ६१ ॥

( ६२ )

**अन्वयार्थ:**—(नः) आमचा (सर्वोपकरणक्षमः) सर्वांना उपकार करण्यास योग्य असा (प्रवृत्तिमार्गः) कर्ममार्ग (मान्यः) मान्य आहे.

(कुमतीनां) क्षुद्रबुद्धी लोकांचा (अन्यः) दुसरा निवृत्तिमार्ग (तथा न) तसा सर्वांना उपकारक नाहीं. (तद्गतिः हि नोऽपि द्वारं) कारण निवृत्तिमार्गी लोकांना तर आमच्या गृहस्थांच्या दारांतच वाव आहे. ॥ ६२ ॥

( ६३ )

**अन्वयार्थः**—( दुर्दैवस्य ) दुर्दैवी निवृत्तिमार्गरत असणाऱ्याचा (अन्यो मार्गस्तु) दुसरा निवृत्तिमार्ग तर ( उभयक्लेशदो न किम् ) दोन्ही लोकांत कष्टप्रद नाहीं काय ? (अपुत्रस्य) निपुत्रिकाला (लोकः नास्ति) स्वर्गादि परलोक मिळत नाहीं. (इत्येषा) अशी ही (भाषा) वाणी (श्रुतेर्न किम् ) श्रुतीची नाहीं काय ? ॥ ६३ ॥

( ६४ )

**अन्वयार्थः**—(तस्मात् ) म्हणून (आर्यः) श्रेष्ठ असलेला (तुर्यः) चौथा (अर्भकः) लहान मुलगा अलर्क (अन्यवत् ) तीन मुलांप्रमाणें (भ्रष्टः) कर्मभ्रष्ट (न भवतु) होऊं नये (इति) असें (पतिवचः श्रुत्वा) पतीचें भाषण ऐकून (प्राज्ञी) ज्ञानी असलेली (राज्ञी) मदालसा राणी (तम्) त्या राजाला (अब्रवीत् ) म्हणाली, ॥ ६४ ॥

( ६५ )

**अन्वयार्थः**—(सतः) स्वप्रकाश व स्वतः प्रमाण वेदाला (मतः) मान्य असलेला (निवृत्तिमार्गः) मोक्षमार्ग (परमः) श्रेष्ठ आहे. (यतः) ज्या निवृत्तिमार्गामुळें (अमृतं) अविनाशित्व प्राप्त होतें. (इह) या मनुष्य-जन्मांत (प्रबोधपुत्रेण) ज्ञानरूप पुत्रानें (आत्मलोकः) परब्रह्म (जय्यः इत् ) प्राप्त करून घेणें शक्य आहेच. (परेण न) प्रवृत्तिमार्गानें नाहीं. (पते) हे नाथा (अशेषविन्मतम्) सर्वज्ञ लोकांना मान्य असलेला ( श्रुतेःशीर्षम्) वेदांत आहे. ॥ ६५ ॥

( ६६ )

**अन्वयार्थः**—(श्रुतदृक्नाथ) लौकिकशास्त्रदृष्टि असणाऱ्या नाथा (अथापि) वेदांत श्रेष्ठ असूनसुद्धां (भवत्प्रियार्थं) तुम्हांला आवडण्याकरतां (अस्मै) या अलर्काला (अद्य) आज (यथार्थं नयार्थं) योग्य प्रकारचें नीतिशास्त्र वगैरे (साधूपदेक्ष्ये) चांगलें शिकवीन. (एवमुक्त्वा) असें बोलून (अत्र) उपदेश न करण्याबद्दलचा (स्वाग्रहं मुक्त्वा) स्वतःचा निश्चय सोडून (सा) ती मदालसा ( अखिलमेव ) सर्वच विद्या ( तम् अपाठयत् ) त्याला पढविती झाली. ॥ ६६ ॥

( ६७ )

**अन्वयार्थः**—(अंबया शिक्षितः) आईनें शिकविलेला (स अलर्कः) तो अलर्क (सर्वविद्याः आददे) सर्व विद्या ग्रहण करता झाला. (नयादिनिपुणायास्मै) नीति वगैरेमध्यें निपुण असणाऱ्या अलर्काला (भूधुरम्) राज्याचा जू (दापयामास) देवविती झाली. ॥ ६७ ॥

( ६८ )

**अन्वयार्थः**—(वनं जिगमिषुं) वनांत जाण्याची इच्छा करणाऱ्या (कांतं अनुयास्यंती) पतीच्या मागोमाग जाणारी (सा) ती मदालसा (तदा) जाते वेळीं (पुत्राय) अलर्काला ( भाविरिष्टहरं ) पुढें येणाऱ्या संकटाचें निवारण करणारें (गुप्तं) पेटींत झाकलेलें (पत्रं) पत्र (मुदा) आनंदानें (अदात्) देती झाली. ॥ ६८ ॥

( ६९–७० )

**अन्वयार्थः**—(तरुणारुणदीप्त ) प्रखर सूर्याप्रमाणें दीप्तिमान् असणाऱ्या (गुप्तचित्) बुद्धीचें रक्षण करणाऱ्या (करुणाब्धे) कृपासागरा (द्युमन्महिमन्) प्रकाशशाली महिमा असणाऱ्या (महन्) पूज्य असणाऱ्या (अत्रिभूः) अत्रिपुत्रा (नुः) मनुष्याचें (भवतः विना कश्चन कश्चित् तारकः न हि) तुमच्याशिवाय कोणीहि व कोठेंहि रक्षण करणारा नाहीं. (एष

बालकः) हा मुलगा (भवतेऽर्पितः) आपणांस अर्पण केला आहे. (इह अस्य पालकः) येथें याचा रक्षण करणारा (भवतोऽन्यः कः) आपल्याशिवाय दुसरा कोण आहे ? (इति) याप्रमाणें (योगिनी सा) तापसी असणारी ती मदालसा (प्रतिपाद्य) मुलास दत्तात्रेयाला अर्पण करून (भोगिनीव) भोगिनी स्त्रीप्रमाणें (आर्या पतिं अनुगता) साध्वी मदालसा पतीच्या मागोमाग गेली. ॥ ६९ ॥ ७० ॥

( ७१ )

**अन्वयार्थः**—(अथ ह) वनांत गेल्यानंतर (तातयोः निर्वाणं गतयोः सतोः) आईबाप मुक्तीला गेले असतां (पित्र्यभद्रासनासीनं) बापाकडून आलेल्या सिंहासनावर बसलेल्या (सुधर्माश्रितं) निष्कपट धर्म करणाऱ्या (विबुधगणपरीतं) सुबुद्धिमान् लोकांनीं परिवेष्टित असलेल्या (गुर्वभिमतं) मान्य लोकांना अभिमत असलेल्या (मघवंतं) बलवान् असणाऱ्या (अपरं जिष्णुमिव संतं) दुसरा इंद्रच जणूं असणाऱ्या (चोदनाधिया) विधीपूर्वक स्वीकारण्याच्या बुद्धीनें (रतामिषसुरासक्तं) मैथुन, मांस व सुरा यांचे ठिकाणीं आसक्त असणाऱ्या (तमलर्कं) त्या अलर्काला (बुबोधयिषुः) बोध करण्याची इच्छा करणारा (सुबाहुः) वडील बंधु सुबाहु (उत्सृष्टात्तमौढ्यः) स्वीकारलेला मूढपणा टाकणारा होत्साता (एत्य) तेथें येऊन (पित्र्यराज्यभागं) बापाच्या राज्याच्या भाग (याचयित्वा) मागून (तेन प्रत्याख्यातः) त्या अलर्कानें नाकारलेला होत्साता (प्रयत्नतः) प्रयत्नानें (काशिराजसाहाय्येन) काशिराजाच्या साहाय्यानें (कांश्चित्सामंतामात्यादीन्साम्ना) कांहीं मांडलिकांच्या प्रधान वगैरे लोकांना सामोपचारानें (कांश्चिद्दानेन भेदेन च) कांहींना पैसे देऊन व कांहींना फितवून (वशीकृत्य) आपल्या वश करून (अग्रजः) वडील बंधु सुबाहु (अनुजं जिगाय) धाकट्या भावाला पराभूत करता झाला. ॥ ७१ ॥

( ७२ )

**अन्वयार्थः**—(विजितः अलर्कः) जिंकला गेलेला अलर्क (रात्रौ) रात्रीं (अलर्कवत्) त्रास दिलेल्या कुत्र्याप्रमाणें (वनं अगात्) वनांत गेला.

(तत्र) वनामध्यें (मातृवचः स्मृत्वा) आईचें वचन आठवून (पत्रं दृष्ट्वा) आईनें दिलेलें पत्र पाहून (सुविस्मितः) अतिशय आश्चर्यचकित झाला. ॥ ७२ ॥

( ७३ )

**अन्वयार्थः**—(विरुद्धानां) दुसऱ्या लोकांचा (स्वेषां) आपल्या लोकांचा (संगं) सहवास (त्यक्त्वा) टाकून (सत्संगमाचरेत्) सत्संग करावा, (इति मातृहार्दं ज्ञात्वा) असें आईचें हृद्गत जाणून (श्रीदत्तं शरणं ययौ) श्रीदत्तात्रेयाला शरण गेला. ॥ ७३ ॥

( ७४ )

**अन्वयार्थः**—(स नृपतिः) तो राजा (सह्यधामानं) सह्यपर्वत स्थान असणाऱ्या (अपेतमानं) प्रमाणातीत असणाऱ्या (असह्यधामानं) सहन करण्यास अशक्य असें तेज ज्याचें आहे अशा (अमानमानं) प्रमाणातीत पदार्थांच्यापेक्षां श्रेष्ठ असणाऱ्या(आत्मने) आपले(श्रेष्ठं मानं ददतं) चांगल्या प्रकारचें स्वागत करणाऱ्या (तं आनंदकंदं) त्या आनंदाचा सांठा असलेल्या दत्तात्रेयाला (ददर्श) पाहता झाला. ॥ ७४ ॥

( ७५ )

**अन्वयार्थः**—(खलमोहनाय) दुष्टांना भ्रम वाटण्याकरितां (तडिन्निभां) विजेप्रमाणें कांती असणाऱ्या (मायामयभीरुं) मायारूपी स्त्रीला (विधाय) करून (तां) त्या मायारूपी स्त्रीला(अंके निधाय) मांडीवर ठेवून (अस्तमारः) कामाचा ज्यानें जय केला आहे असा (आर्यः) श्रेष्ठ असलेला (नीलनिभः) नील मण्याप्रमाणें कांती असलेला (धरगः) पर्वतावर बसलेला (यः) जो अत्रिनंदन (सः) तो (तडित्वदाभां जहार) वीज असलेल्या मेघाची शोभा हरण करता झाला. ॥ ७५ ॥

( ७६ )

**अन्वयार्थः**—(अशेषदोषक्षपणक्षमाभिः) सर्व पापांचा नाश करण्यास समर्थ असलेल्या ( निःशेषसत्तीर्थसमाहृताद्भिः ) संपूर्ण चांगल्या

तीर्थांतून आणलेल्या पाण्यांनीं ( पूर्ण ) भरलेला ( कमंडलुं ) कमंडलु (दधानः) धारण करणारा (अमरदत्तमानः ) देवांनीं ज्याला मान दिला आहे असा (असौ) हा दत्तात्रेय (स्त्रष्टेव रेजे) ब्रह्मदेवाप्रमाणें शोभला. ॥ ७६ ॥

( ७७ )

**अन्वयार्थः**—(शरदभ्रनिभाच्छभस्मना) शरद् ऋतूंतील पांढऱ्या ढगाप्रमाणें स्वच्छ भस्म जें (परिलिप्ताखिलकोमलात्मना) लेपन केलें आहे कोमल शरीर ज्यानें अशा (अतिपिंगजटाकिरीटिना) अतिशय पिंगट जटांचें किरीट असणाऱ्या (पिनाकिना) शंकराशीं (यः समतां गतवान्) जो दत्तात्रेय सारखेपणास प्राप्त झाला. ॥ ७७ ॥

( ७८ )

**अन्वयार्थः**—(यः) जो (सह्यगः) सह्याद्रीवर असलेला (अत्रिपुत्रः) दत्तात्रेय ( सजलजलदमित्रांगद्युतिः ) पाण्यानें युक्त काळ्या मेघाप्रमाणें अंगकांति असणाऱ्या ( विमलकमलनेत्रः ) स्वच्छ कमलाप्रमाणें नेत्र असणाऱ्या ( मंजुलाशेषगात्रः ) मनोहर शरीर असणाऱ्या ( अमलसकलचंद्रस्पर्धिवक्त्रः ) कलंकरहित संपूर्ण चंद्राची स्पर्धा करणारें मुख असणाऱ्या (पवित्रः) पवित्र अशा (विपत्रः) गरुडवाहन असणाऱ्या (श्रीकलत्र इव) लक्ष्मीपति विष्णूप्रमाणें (शुशुभे) शोभता झाला. ॥ ७८ ॥

( ७९ )

**अन्वयार्थः**—(अग्रतः एव) श्रीदत्ताच्या पुढेंच (दंडनिपातवत्) काठी पडल्याप्रमाणें (वर्ष्म निपात्य) शरीर लांब टाकून साष्टांग नमस्कार करून (आत्तपीडः) दुःख प्राप्त झालेला अलर्क (तम्) त्या दत्तात्रेयाला (प्राह) म्हणाला, (यतीश) अहो दत्तात्रेया (मम हि) मला तर (अतीव दुःखं उपपन्नं) फारच दुःख प्राप्त झालें आहे. (तस्मात्) म्हणून (प्रपन्नं मां) शरण आलेल्या मला (अव) प्रसन्न हो. ॥ ७९ ॥

( ८० )

**अन्वयार्थः**—(श्रीदत्तः) श्रीदत्तात्रेय (प्राह) म्हणाले, (तव वपुषि) तुझ्या शरीरांत (दुःखं क तद्दर्शय) दुःख कोठें आहे तें दाखीव (च) तसेंच (त्वं वा कः ब्रूहि) तूं कोण आहेस तें सांग. (इत्युक्तः सः) असें विचारला गेलेला तो अलर्क सांगतो, (देहो घटवत्) देह हा घटाप्रमाणें जड आहे. (तथा) त्याचप्रमाणें (इह)या शरीरांतील (एष प्राणः) हा प्राण (अचेतनः) अचेतन आहे. (क्षुत्तृड्वान्) व क्षुधा आणि तृषा हे धर्म प्राणाचे आहेत; (इंद्रियाणि) सर्व इंद्रियें (चित्संनिधानात्) चैतन्याच्या सांनिध्यामुळें (स्वविषयग्रहणार्हाणि) आपापले विषय ग्रहण करण्यास समर्थ असतात; (हृद्धी च) मन आणि बुद्धी तर (अकादिहेतू अपि) सुखदुःखाचें स्थान असून सुखदुःखाला कारणीभूतहि आहेत. (निखिलमिदं) सर्व हें (योऽहं वेद्मि) जो मी जाणतों (स साक्षी) तो साक्षीरूप मी आहें. ॥ ८० ॥

( ८१ )

**अन्वयार्थः**—(अहं आत्मा) मी ब्रह्म आहें. (दुःखसौख्ये मम न) सुखदुःख हे माझे नाहींत (ते) सुख व दुःख (कुमनसः) कुत्सित मनाचे आहेत. (अध्यासतः मे मते) अध्यासामुळें ते माझे आहेत असें वाटलें. (अद्य श्रीगुरोः संप्रसादात्) आज सद्गुरूच्या प्रसादामुळें (ते) सुख व दुःख (अंजः) झटकन् (मयि विलयमिते) माझ्या ठिकाणीं सर्व नाश पावले. (नाहं दुःखी सुखी वा) म्हणून मी दुःखी किंवा सुखी नाहीं. (मे अंगस्य संबंधो न) मला शरीराचा संबंध नाहीं (ततः) म्हणून (स्त्र्यनुगसुतधरादेरपेक्षा कुतः) बायको-मुलें-राज्य वगैरेची इच्छा कोठून असणार? (इह तु) या अवस्थेंत तर (स्वात्मनः मे) स्वरूपानिष्ठ असलेल्या मला (शत्रुमित्रे कुतः) शत्रु व मित्र कोठून असणार? ॥ ८१ ॥

( ८२ )

**अन्वयार्थः**—(गुरुः) गुरुदत्तात्रेय (जगौ) म्हणाले (संवित् साध्वपि) तत्त्वज्ञान चांगलें असलें तरीसुद्धां (अस्याः स्थेम्ने) हिच्या स्थैर्याकरतां (अद्य मितभैक्ष्यभुक् स्याः) आज प्रमाणयुक्त अन्न खाणारा हो, (तथा जितासनश्वासहृषीकचित्तः) त्याचप्रमाणें आसन, प्राण, मन व इंद्रियें हीं ताब्यांत ठेवणारा होत्साता (अंतः) अंतःकरणांत (अभेदतः) भेदरहित अशा (आत्मानं संचिंतय) आत्म्याचें चिंतन कर. ॥ ८२ ॥

( ८३ )

**अन्वयार्थः**—(पीयूषविषदृष्ट्यात्तौ) अमृत व विषबुद्धीनें स्वीकारलेले (मानामानौ) मान व अपमान (सुबंधदौ) अतिशय बंधांत टाकणारे आहेत; (विषपीयूषदृष्ट्यात्तौ) विष व अमृत दृष्टीनें स्वीकारलेले (मानामानौ) मान व अपमान (सुमुक्तिदौ)चांगली मुक्ति देणारे आहेत.॥८३॥

( ८४ )

**अन्वयार्थः**—(यत्र ममता) ज्या ठिकाणीं आपलेपणा असतो (तत्र दुःखं) त्या ठिकाणीं दुःख असतें; (यद्वत्) ज्याप्रमाणें (मार्जारभक्षिते स्वशुके दुःखं) मांजरानें खाल्लेल्या आपल्या पोपटाबद्दल दुःख असतें (न वृके) मांजरानें खाल्लेल्या उंदराबद्दल असत नाहीं (तद्वत्) त्याप्रमाणें (अहंयोः) ज्याला अहंकार आहे त्याला (सदैव) नेहमींच (सुखदुःखे) सुखदुःख असतें. ॥ ८४ ॥

( ८५ )

**अन्वयार्थः**—(येन ममताहंता त्यक्ता) ज्यानें ममत्व व अहंकार टाकले आहेत (अस्य मुक्तता) त्याला मुक्ति मिळते, (ततः सुमते) म्हणून शहाण्या अलर्का, (ते त्यज) ममता अहंता टाकून दे. (सारसदृक् ते) ब्रह्मनिष्ठ असणाऱ्या तुला (सुमदलनादपि सुकरः) फूल चुरगाळण्यापेक्षांहि ममतादि टाकणें सोपें आहे. ॥ ८५ ॥

( ८६ )

**अन्वयार्थ:**—(अत्र) या योगमार्गात (यद्यप्युपस्थिता:) जरी सिद्धि प्राप्त झाल्या तरी (अंतरायस्ता:) विघ्नरूप त्या आहेत म्हणून (जहि) टाकून दे. (तत:) नंतर (ते समाधिसिद्धि:) तुला समाधि सिद्ध होईल. (तत:) नंतर (ते भूय: भ्रमो न) तुला पुन: भ्रम होणार नाहीं. ॥ ८६ ॥

( ८७ )

**अन्वयार्थ:**—(प्रत्यगभिन्नपरमात्मतत्त्वविज्ञानात्) प्रत्यक्ष स्वरूप असणारें जें परब्रह्मतत्त्व त्यास जाणल्यामुळें (सुतरां मनोविनाशात्) चांगल्या प्रकारच्या मनोभंगामुळें (त्रिविधवासनाहानात्) देह, शास्त्र व लोक या तीन वासनांच्या नाशामुळें (अत्रैव जीवन्मुक्ति:) या जन्मांतच जीवन्मुक्ति मिळते. ॥ ८७ ॥

( ८८ )

**अन्वयार्थ:**—(एवं) याप्रमाणें (श्रीगुरुणा) दत्तात्रेयानें (यथावच्छिक्षितस्य) योग्य प्रकारानें शिकविलेल्या अलर्काला (देहाद्युपाधिकमात्मनो नानात्वं) देहोपाधीमुळें आत्मा अनेक भासतो हें, (कर्तृत्वं भोक्तृत्वं च) त्याचप्रमाणें आत्म्याला कर्तृत्व भोक्तृत्वहि देहोपाधीमुळेंच भासतें हें, (लोककालागमानित्यत्वं च) आणि स्वर्गादिलोक भोगकाल व श्रुति यांची अनित्यता (भोग्यभावानां भगवन्मायामयत्वं) तसेंच भोग्य स्रक्-चंदनादि पदार्थ हे ईश्वराच्याच मायेमुळें उत्पन्न झाले आहेत हे, (सर्वं गुरुप्रसादाद्विजानत:) सर्व गुरूंच्या कृपेमुळें जाणणाऱ्या (विरतस्य) वैराग्यशील असणाऱ्या (प्रशांतस्य तस्य) चित्तांत शांत असणाऱ्या त्या अलर्काला (युगपत्त्रिकाभ्यासवशात्) एका कालांतच तत्त्वज्ञान, मनोभंग आणि वासनाक्षय या तिघांच्या अभ्यासामुळें (अपरोक्षसाक्षात्कारदार्ढ्यमभवत्)प्रत्यक्ष साक्षात्कार होऊन ज्ञानाची दृढता प्राप्त झाली. ॥८८॥

( ८९ )

**अन्वयार्थः**—(गुणरचितनृदेहसंसृतिघ्नीं) मायारूप गुणानें केलेल्या नरदेहरूप संसाराला नाश करणारे असें (परमात्मविदं) श्रेष्ठ अशा परमात्मविषयक ज्ञान (द्रुतं) फार लौकर (स्वशिष्यलब्धां) आपल्या शिष्याला मिळालें असें पाहून (सावकाशांडचयभृतः) मोकळे-पणानें अनंत ब्रह्मांडें धारण करणाऱ्या (अस्य विदुषः) या ज्ञानी दत्तात्रेयाच्या (जठरे) उदरांत (मुदः) आनंद (न ममुः) मावला नाहीं. ॥ ८९ ॥

( ९० )

**अन्वयार्थः**—(गुर्वाज्ञया) गुरूंच्या आज्ञेनें (सः) तो अलर्क (अग्रजं) वडील बंधु सुबाहूकडे (उपेत्य) येऊन (आह) म्हणाला, (अस्तसमस्त-सुदुःखसिंधो) सर्व दुःखरूप समुद्राचा नाश करणाऱ्या (बन्धो) बा अग्रजा, (इदं) हें (गुर्वात्तराज्यं) पित्याकडून मिळालेल्या राज्याचा(त्वं स्वीकुरुष्व) तूं स्वीकार कर (वा) किंवा (तव सुहृदे) तुझ्या मित्राला काशीराजाला (यच्छ) दे. (स्वीकृतं स्वत्वं) पूर्वीं स्वीकारलेली मालकी (परिहृतं) टाकली. (प्रभुता-मुपास्व) तूं आतां मालकीचा स्वीकार कर. ॥ ९० ॥

( ९१ )

**अन्वयार्थः**—( सुबाहुः ) सुबाहु ( तं आलिंग्य आह ) अलर्काला आलिंगन देऊन म्हणाला ( अस्तबंधो ) मायेचा नाश करणाऱ्या ( बंधो ) भावा ( कारुण्यसिंधोः कृपया ) करुणासागर दत्ताच्या कृपेनें (ते कृतार्थता जाता) तुला कृतार्थता आली. ( अद्य दैवेन नः समता कृता ) आज दैवानें आम्हां चौघा भावंडांचा सारखेपणा झाला आहे. ( एकतानः भव ) एकाग्र चित्त हो. ॥ ९१ ॥

( ९२ )

**अन्वयार्थः**—( काशिप ) अरे काशिराजा ( ते स्वस्त्यस्तु ) तुझें कल्याण असो. ( गच्छ ) तूं आतां जा. ( कृतार्थो वनं यामि ) कृतार्थ

असा मी आतां वनांत जातों. ( कामकामी न ) मला कोणतीहि इच्छा नाहीं. ( काशिराजोऽपि तं अवदत् ) काशिराजसुद्धां सुबाहूला म्हणाला ( त्वया किमातं तन्नैव जाने ) तूं काय मिळविलेंस तें मी कांहीं जाणतच नाहीं ( तवातं मां वद ) तुला काय इष्ट होतें तें मला सांग. ॥ ९२ ॥

( ९३ )

**अन्वयार्थः**—(योगी जगौ) सुबाहु म्हणाला (वयं मान्यसतीसुताः) आम्ही सर्वमान्य पतिव्रता मदालसेचीं मुलें आहोंत. (अयं) हा अलर्क (क्षितौ) पृथ्वीवर (ऋषभवत्) बैलाप्रमाणें (भोगी जज्ञान) भोग भोगणारा होत्साता जन्मला होता. (भवत्सहायात्) तुझ्या साहाय्यानें (अत्रिजेक्षया) श्रीदत्ताच्या कृपाकटाक्षानें (सगर्भ्यस्य) या आमच्या भावाला (अक्षया-शांतिः) नाश न पावणारी शांती (च समता अभवत्) आणि आमच्या तिघांशीं साम्य झालें. ॥ ९३ ॥

( ९४ )

**अन्वयार्थः**—(अथ) सुबाहुभापणानंतर (सः तं जगौ) काशिराजा सुबाहूला म्हणालाः (सद्‌गुणशेवधे कृपानिधे) सद्‌गुणांचा सांठा असणाऱ्या कृपासागरा, (ते स्वत्वान्यत्वे न) तुला आपलेपरकेपणा नाहीं. (निरुपम-दयाक्लिन्नस्वांतोऽसि) उपमारहित अशा दयेनें भिजलेल्या अंतःकरणाचा तूं आहेस. (अधुना) आतां (दैवात्) सुदैवानें (ते सुसातपदीनभाक्) तुझी सत्संगति करण्यास मी पात्र (अभवं) झालों. (ततः कथमपि मां शाधि) म्हणून कसेंहि करून मला ज्ञान दे; (येन पुनः भ्रमो न) ज्या ज्ञानामुळें पुनः मला भ्रम होणार नाहीं. ॥ ९४ ॥

( ९५ )

**अन्वयार्थः**—(अथ) काशिराजानें प्रार्थना केल्यानंतर(एवं दीनं प्रणतं) याप्रमाणें दीन होऊन नमस्कार करणाऱ्या (नितांतं खिन्नचित्तं तं) व अत्यंत खिन्नचित्त असणाऱ्या त्या काशिराजाला (प्रोचे) सुबाहु म्हणालाः

(नरवर) अरे नरश्रेष्ठा, (इह) या मोक्षमार्गांत (आर्याः तत्त्वज्ञाः) श्रेष्ठ तत्त्वज्ञानी लोक (परमहितदां साधनाख्यां) अतिशय सुख देणारी साधना नांवाची (महासंपत् आहुः) मोठी संपत्ति आहे असें म्हणतात. (सा नो चेत्) ती संपत्ती जर नसेल तर (तां ऋते बोधातिर्न भवति) तिच्यावांचून ज्ञान होत नाहीं. (भवतः असौ नास्ति) तुला ही साधना नाहीं (अतः एतां आश्रय) म्हणून तिचा तूं आश्रय कर. ॥ ९५ ॥

( ९६ )

**अन्वयार्थः**—( तदनु ) साधनसंपति मिळविल्यानंतर ( महानुभावसेवया ) सद्गुरूंच्या सेवेनें ( षड्लिंगैस्तात्पर्यावधारणलक्षणेन श्रवणेन ) उपक्रमादि सहा प्रकारच्या लिंगांनीं ज्यांतील तात्पर्य जाणलें आहे अशा श्रवणानें ( युक्त्या संभावितत्त्वानुसंधानलक्षणेन मननेन ) व जीवशिवांच्या एकतेनें उत्पन्न झाली आहे ध्येयाकारता ज्यामध्यें अशा मननानें ( ताभ्यां निःसंशयेऽर्थे स्थापितचित्तस्य ) श्रवणमननाच्या योगानें अखंडैकरस ब्रह्माचे ठिकाणीं लावलेल्या अंतःकरणाच्या ( विजातीयानात्मप्रत्ययांतरित ) देहादि विरुद्ध ज्ञानानें रहित ( सजातीयप्रत्ययप्रवाहीकरणलक्षणेन निदिध्यासनेन ) नित्य शुद्ध, बुद्ध, अद्वय अशा ज्ञानस्वरूप निदिध्यासानें ( ध्यातृध्यानभावरहित ) ध्याता, ध्यान व ध्येय या त्रिपुटीनें रहित ( सुस्थिरध्येयाकारांतरस्थितिलक्षणेन ) दृढ च ध्येयाकार मनाची स्थिति ज्यामध्यें अशा ( समाधिना कृती भव ) समाधिसुखानें कृतकृत्य हो. ॥ ९६ ॥

( ९७ )

**अन्वयार्थः**—( यद्यप्यलर्कः विषयात्तचित्तः ) जरी अलर्क विषयामध्यें निमग्न असा होता ( तथापि ) तरी ( स्वांबाप्रसादेन ) आपल्या आईच्या कृपाप्रसादानें ( येन ) ज्या अलर्कानें (गुरूणां गुरुः) सर्व श्रेष्ठ लोकांचा गुरु (भगवानुपास्तः) जो भगवान् दत्तात्रेय त्याची

उपासना केली ( ततः ) म्हणून त्या दत्तप्रसादामुळें ( अस्तसमस्तवित्तः स मुक्तः ) सर्व दैवी व मानुषी वित्ताचा त्याग करून मुक्त झाला. ॥ ॥ ९७ ॥

( ९८ )

**अन्वयार्थः**—( कोटिजन्मसुकृतादपि ) कोटि जन्मांमध्यें केलेल्या पुण्यानें सुद्धां (यस्य दुर्लभो लाभः) ज्याचा लाभ दुर्लभ आहे तरीहि ( अस्य )या अलर्काला ( इह लाभः समभूत् ) या जन्मांतच लाभ झाला. ( अयमलर्कः ) हा अलर्क ( तद्दृशा ) त्या दत्तात्रेयाच्या कृपादृष्टीनें ( वितिमिरः ) हृदयांधकार गेलेला असा आहे. (उदितः अर्कः अंधं शेषयेत्किं) उगवलेला सूर्य अंधकार शिल्लक ठेवील काय ? ॥ ९८ ॥

( ९९ )

**अन्वयार्थः**—(इत्युक्त्वा अनुजमाह) असें काशिराजाबरोबर बोलून अलर्काला म्हणाला (विपिनं याहि) वनांत जा (अथवा) किंवा (राज्यं कुरुष्व) राज्य कर (अहं तु यास्ये) मी तर वनांत जातों (इति स अगमत्) असें बोलून तो सुबाहु वनांत गेला. (पुत्रन्यस्तभरः काश्योऽपि) पुत्रावर राज्यभार टाकलेला काशिराजासुद्धां (तदनुगः) सुबाहूच्या मागोमाग जाणारा होत्साता (गतिमगात्) मुक्तीला गेला. (उदरामत्रः) उदर हेंच ज्याचें भोजनपात्र आहे असा (पुत्रन्यस्तभरः स अलर्कोऽपि) पुत्रावर भूमीचा भार टाकणारा तो अलर्क पण (आत्यंतिकबुद्धिलब्धपरमानंदः) बुद्धीनें अतिशय आनंद प्राप्त करून घेणारा होत्साता (पावनं वनं गत्वा) पवित्र अशा वनांत जाऊन (पावनं जगौ) प्रेमगद्गद रमणीय असें गायन करता झाला. ॥ ९९ ।

**अन्वयार्थः**—(अहह) काय आश्चर्य आहे ! (मे) माझ्याकडून (अभेदेन) अभेदभक्तीनें (अयं) हा ( निर्मायं भवहा) मायारहित असा संसार घालविणारा दत्तात्रेय गुरु (आप्तः) मिळविला. (भक्त्यर्थं) स्वतःची भक्ती सिद्ध होण्याकरतां (यस्य तु अत्यर्थं मृदुलं हृदयं) ज्याचें हृदय तर

अतिशय कोमल आहे, (युक्त्यर्थं) योगाभ्यास सिद्ध होण्यासाठीं (भाविकहृद् अयम्) भाविकांच्या हृदयामध्यें वास करणारा आहे, (मुक्त्यर्थं) मुक्ति मिळण्याकरितां (संसृतिहृत् अयं) संसाराचा नाश करणारा हा आहे, (तं अमेयं) त्या प्रमाणागोचर भासणाऱ्या (श्रुतिगणगेयं अमायं) अनेक श्रुतिद्वारा ज्याचें गायन केलें जातें अशा व मायारहित अशा (मुनिविज्ञेयं अद्वयं) मुनींनीं जाणलेल्या व द्वैतरहित असणाऱ्या अशा (अत्रेस्तनयं दत्तात्रेयं भावये) अत्रिनंदन दत्तात्रेयाला नमस्कार करतों ॥ १ ॥ (तृष्णायां सत्यां) इच्छा असेल तर (लोके) लोकांमध्यें (स्त्र्याद्यं यत्) स्त्री वगैरे जे विषय आहेत (तन्नैकस्य तृप्तिदं) ते विषय एकाला सुद्धां तृप्ती देणारे होऊं शकत नाहींत (अत्र तु) या संसारांत तर (विषयसुभोगः) विषयाचा चांगल्या प्रकारें भोग (कस्य तृप्तये) कोणाच्या तृप्तीला कारण झाला आहे ? (मे तृष्णायां नष्टायां) म्हणून माझी भोगतृषाच जर नष्ट झाली तर (मे भोगेच्छा का शिष्टा) मला कोणती भोगांची इच्छा राहील ? (आत्मारामे श्रीदत्ते) फक्त आत्मसुखांत रममाण होणाऱ्या श्रीदत्ताचे ठिकाणीं च (मे हृदयं सुतरां तस्थौ) माझें चित्त अत्यंत स्थिर झालें आहे ॥ २ ॥ (आगमापायि) उत्पत्ति व नाशशील (इंद्रियजं) इंद्रियापासून उत्पन्न झालेलें (सोपाधिकमसंभिन्नं) उपाधीहून वेगळें असणारें (आगमान्यदृशा दृष्टं) वेदापेक्षां दुसऱ्या लौकिक दृष्टीनें पाहिलेलें (यत्सुखं तत्स्वस्माद्भिन्नं) जें सुख आहे तें आपल्यापेक्षां वेगळें आहे (तन्मौर्ख्यं) असें इंद्रियापासून सुख मिळविणें मूर्खपणा होईल. (सत्त्विदम्) खरें जें सुख आहे तें नष्ट तृष्णेमुळें झालेलें तेंच आहे. (एवं) याप्रमाणें गाऊन (योगेन कुभावं दग्ध्वा) योगसामर्थ्यानें अग्नि धारणा करून त्या अग्नीनें देहादि कुत्सित वासना जाळून (अमायं) मायारहित असें (वासुदेवेन दत्तेन) सर्व भूतें ज्यामध्यें वास्तव्य करतात असा जो दत्तात्रेय देव त्याच्याशीं (एकीभावं प्राप) एकरूप झाला ॥ ३ ॥

द्वितीय स्तबक समाप्तः

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

श्रीदत्तचंपूचें भाषान्तर

# तृतीय स्तबक

भाषांतरकारः—वे. शा. सं. बापूशास्त्री

कोडणीकर, नरसोबावाडी

# अथ दत्तचम्पूः—[ तृतीयस्तवकः ]

**अन्वयः**—मधुकृदजगराभ्यां वैराग्यतोषौ प्रल्हादं यः प्राह । (तथा) सशेषे (आत्मनि) स्वसौख्यं स्वजपिहितजलाभं मृगजलविषयात् विरक्तं प्रल्हादं ऊचे । च तं स्वभक्तं अनुपाधि निजगतिं निन्ये ।

**अर्थः**—यानंतर संक्षेपानें प्रल्हाद भक्तावर केलेला अनुग्रह मालिनी-वृत्तानें वर्णन करतात.

मधमाशी व अजगर यांच्यापासून आपणांला प्राप्त झालेलें वैराग्य व संतोष ज्यांनीं आपल्या प्रल्हाद नामक भक्ताला सांगितले, स्रक्चन्दन-वनितादि उपकरणांनीं युक्त असलेल्या आत्म्याचे ठिकाणीं असणारें जें स्वरूपसुख, जलापासून निर्माण झालेल्या शैवालानें आच्छादित असलेल्या जलाप्रमाणें अज्ञानानें आच्छादित झाल्यासारखें दिसतें तें, स्वरूपसुख मृगजलाप्रमाणें असणाऱ्या विषयापासून विरक्त झालेल्या प्रल्हादाला ज्यांनीं सांगितलें व देहत्रयातीत असणाऱ्या आपल्या वैष्णव-पदाप्रत प्रल्हादाला ज्यांनीं पोंचविलें तेच हे श्रीदत्त होत. ॥ १ ॥

**भावार्थः**—कोणा एके वेळीं, लोकपरिस्थिति जाणण्याकरतां सह्य पर्वतावर फिरत असतां प्रल्हादानें कावेरी तीरावर भोगसाधनरहित असून ज्याचा देह पुष्ट आहे व जो आनंदांत आहे, अशा अवधूतांना पाहिलें व भोगसाधनें नसतांहि आपला देह पुष्ट कसा, व एवढा मोठा आनंद तुम्हांला कसा मिळाला, असें त्यानें त्या अवधूतांना विचारलें असतां अवधूत सांगतातः—मधमाशी व अजगर या दोघांपासून मीं वैराग्य व संतोष हे दोन गुण घेतले. ते असेः—मधमाशी दिवसभर खपून मध सांठ-विते पण स्वतः उपभोग घेत नाहीं व दुसऱ्याला घेऊं देत नाहीं. अखेर तो साठा मधमाशांना मारून तिसराच घेऊन जातो. यावरून विषय-संचय करणें दुःखाला कारण आहे. म्हणून विषय हे दुःखदायक अस-

त्यानें त्याज्य आहेत असा मधमाशीपासून वैराग्य हा गुण घेतला. दुसरा जो अजगर, हा अन्नावांचून पुष्कळ दिवस काढतो. त्याकरतां कांहींसुद्धां श्रम करीत नाहीं. यदृच्छेनें केव्हां कांहीं मिळेल तितकेंच खाऊन आनंदांत असतो. त्यापासून संतोष हा गुण घेतला. त्याचप्रमाणें स्रक्-चंदन-वनितादि उपकरणांनीं युक्त असलेल्या आत्म्याचे ठिकाणीं असणारें स्वरूपसौख्य अज्ञानानें आच्छादित आहे. ज्याप्रमाणें शैवालानें जल आच्छादिलेलें असतें, त्या जलाचा त्याग करून तृषार्त झालेला मनुष्य मृगजलाच्यामागें धांवूं लागतो व त्याला एक पाण्याचा थेंबसुद्धां मिळत नाहीं; पण जेव्हां त्याला विचार उत्पन्न होईल तेव्हां तो परत येऊन शैवाल दूर करून जलपान करतो व सुखी होतो. त्याचप्रमाणें जीव आपल्या अज्ञानानें झाकून गेलेलें स्वसौख्य सोडून देऊन सुख मिळण्याच्या आशेनें सुखाभासरूप असणाऱ्या विषयांकडे धांव घेतो. अर्थात् त्याला तेथें दुःखाचाच अनुभव येतो, आणि जेव्हां त्याला विषयदोष पाहून वैराग्य उत्पन्न होतें, तेव्हां तो गुरूपदेशानें परत फिरून परमसुखाला मिळवितो.

याप्रमाणें प्रल्हादाला अवधूतानें ज्ञानाचा उपदेश करून पुनरावृत्तिरहित अशा आपल्या वैष्णवपदाला नेलें. ॥ १ ॥

( २ )

**अन्वयः**—पञ्चविंशतिभूम्यादिगुरुप्राप्तं हेयोपादेयलक्षणं अन्वीक्षणं स्वशिक्षणं यः यदुं प्रोचे ।

**अर्थः**—पृथ्वीआदींकरून पंचवीस पदार्थरूप गुरूपासून मिळविलेलें दोषत्याग व गुणग्रहण असें अन्तर्मुख वृत्ति उत्पन्न करणारें तत्त्वज्ञान ज्या भगवान् दत्तात्रेयानें यदु नामक राजाला सांगितलें, तेंच हे श्रीदत्त महाराज आहेत. ॥ २ ॥

( ३ )

**अन्वयः**—धृतिसत्यशमादिसाधनैः सकुसंगोत्स्मृतिभिः मरुद्गनैः अहिपिंगलसाध्यदेवताः ( प्रति ) इह आनतावितता यः गतिं ऊचे।

**अर्थः**—सात्त्विक धैर्य, यथार्थ भाषण, व अन्तरिन्द्रियनिग्रह इत्यादि अंतरंगसाधनांनीं दुष्ट संगाचा त्याग करून दैवी संपत्तीनें मिळणारें ज्ञान या भूलोकीं शरणागतरक्षक अशा ज्या श्रीभगवान् दत्तात्रेयानें पिंगल नाग व साध्यदेव यांना सांगितलें, तेच हे दत्तात्रेय होत. ॥ ३ ॥

( ४ )

**अन्वयः**—यः विधिविष्ण्वजात्मा आत्रेयदत्तः मे गुरुदेवतात्मा परात्मा सः अनुसूयात्रिसुतः सुरतः महात्मा इह नः अधिपुण्यात् उपलब्धः ( अस्ति )।

**अर्थः**—जो ब्रह्मा, विष्णु व महेश्वर असा त्रिगुणात्मक अत्रिकुमार दत्तात्रेय माझा गुरु देवतारूप जो परमात्मा तो दयाळु व आत्मदानामुळें उदार असा या लोकीं आमच्या अत्यन्त पुण्योत्कर्षानें प्राप्त झाला. ॥ ४ ॥

( ५ )

**अन्वयः**—इह अनन्यगतिचातकं ( अभिलक्ष्य ) घनः अलं जलं वर्षति। तथापि ( तत् ) सकलाऽसुधारिपरितृप्तये अलं ( भवति एवं यथा ) तथा अत्र अवतीर्णः यः अनुसूयासुतः महर्षिवरदः अपि सद्गतिः सः नः परदः अभवत्! ॥ ५ ॥

**अर्थः**—या भूलोकीं मेघाच्या पाण्याशिवाय ज्यांना पाणी नाहीं, अशा चातकपक्ष्यांना उद्देशून मेघ भरपूर पाण्याचा वर्षाव करतो. तरी पण तें पाणी सर्व जीवांच्या संतोषाला पुरेसें होतें. हें जसें आहे तसें या लोकीं अवतारित जे अनुसूयासुत श्रीदत्त अत्रि ऋषींना वर देणारे असूनहि भक्तकामकल्पद्रुम जे दत्तात्रेय ते आम्हां सर्वांना मोक्ष देणारे असे झाले आहेत. ॥ ५ ॥

( ६ )

**अन्वयः**—चातकस्य तृट् कियती ( अत्यल्पजलापेक्षैव ) यः(मेघः) अस्मै अपः ववर्ष। ताः परस्मै ( इतरजीवाय ) अलं न किम्। ( अपि तु पर्याप्तमेव ) तथापि ( ताः ) चिरस्थितयः न भवन्ति। अयं वरदः भगवान् (श्रीदत्तात्रेयः ) नित्य एव ( भवति ) ॥ ६ ॥

**अर्थः**—चातकपक्ष्यांची तहान किती ! अतिशय थोडी, पण मेघ त्यांच्याकरतां वर्षाव करतो. तें पाणी सर्व प्राण्यांची तहान भागवीत नाहीं काय ? तर सर्वांची तहान भागवून पुष्कळ आनंद देतें. परंतु तें पाणी फार वेळ राहत नाहीं. हे वर देणारे श्रीभगवान् दत्तात्रेय निश्चयानें त्रिकालाबाधित म्हणजे अविनाशी आहेत म्हणून मेघाचा दृष्टान्त देणें योग्य होत नाहीं. ॥ ६ ॥

( ७ )

**अन्वयः**—भगीरथः स्वमुक्त्यै गङ्गां गां आनयत्। सा इह नः अपि मुक्त्यै अभूत्। तथैवाऽपि अयम्। सा च ( गङ्गा ) एकदेशे ( विद्यते ) अयं स्मर्तृगामी ( अत एव ) सकलप्रदेशे ( उपलभ्यते )।

**अर्थः**—राजा भगीरथानें आपिल्या पूर्वजांच्या उद्धाराकरितां तपश्चर्यारूप प्रयत्न करून गंगा या भूमितलावर आणली. ती गंगा आम्हा सर्वांच्या उद्धाराकरितां उपयोगीं पडली. त्याप्रमाणेंच हे श्रीभगवान् दत्तात्रेय अत्रिमुनीच्या मोठ्या तपश्चर्यारूप प्रयत्नांनीं या भूलोकीं अवतीर्ण झाले व आम्हां सर्वांच्या उद्धाराकरितां उपयोगीं पडले. म्हणून भगीरथीची उपमा देणें योग्य आहे, असें कोणी म्हणेल तर ही उपमा बरोबर जुळत नाहीं. कारण ती गंगा एका उत्तर प्रदेशांतच आहे. पण श्रीमद्दत्तात्रेय हे स्मर्तृगामी असल्यामुळें जिथें स्मरण होईल तिथें ते येतात. म्हणजे सर्वच ठिकाणीं त्यांची प्राप्ति होते. उपमान व उपमेय यांच्यांत वैशिष्ट्य दाखविल्यामुळें इथें व्यतिरेक नामक अलंकार होतो. ७

(८)

**अन्वयः**—क्वचित् आगतः घनः तोयैकदानः (एव भवति) (या पूर्वोक्ता गङ्गा) अवभङ्गा (एव भवति) स्थिरकल्पपादपः (संनिहितेभ्य एव) सङ्कल्पितं (एव) राति। यः (श्रीदत्तात्रेयः) (सः) अवतापपापहा चरकल्प-पादपः (सन्) असङ्कल्पितं (राति)॥ ८॥

**अर्थः**—कुठून तरी आलेला मेघ केवळ पाणीच देतो, आणखी कांहींच देऊं शकत नाहीं. पूर्वी वर्णिलेली गङ्गा नुसतें पापच नष्ट करते. कल्पवृक्षाची उपमा द्यावी तर तो स्थावर कल्पवृक्ष जवळ येणाऱ्यालाच व मागेल तितकेंच देतो. पण जो भगवान् श्रीदत्तात्रेय तो सर्वत्र सञ्चार करणारा कल्पवृक्ष पापताप दैन्य नाहींसें करतो. इतकेंच नव्हे तर आपला भक्त कुठेंहि असो, त्याच्या मनांतील कामना न मागतांहि पूर्ण करतो. या श्लोकांतहि पूर्वीच्या श्लोकासारखा व्यतिरेक आहे.॥ ८॥

**अन्वयः**—अस्य निद्रा मातृपुरे सह्यशिखरे पीठं काश्याख्ये पुरे अस्य मिमंक्षा करहाटके पुरे अर्ध्यम्। अवरे कोल्हापुरे भिक्षा (अस्ति) पाञ्चाले पुरे भुजिः (भवति)। विठ्ठलपुरे अस्य विचित्रं पत्रम्। गांधर्वे पुरे युजिः। कुरुपुरे आचमः। (एवं पर्यटनशीलोऽपि भक्तैः) स्मृतः (यः) दूरे न (वर्तते किन्तु) अन्तरे (प्रादुर्भवति)॥ ९॥

(९)

**अर्थः**—या श्रीदत्तमहाराजांची निद्रा म्हणजे निद्रास्थान सह्य पर्वताच्या पायथ्याशीं रेणुकानगरांत आहे. त्यालाच हल्लीं मातापूर असें म्हणतात. सह्यनामक पर्वताचे शिखरावर राहाण्याचें स्थान आहे. या श्रीदत्तात्रेयांचें काशीनामक महाक्षेत्रांत गङ्गास्नान होतें. कऱ्हाडनामक क्षेत्रांत अर्ध्यदान म्हणजे प्रातःसंध्यावंदन असतें. श्रीमहालक्ष्मीचें राहाण्याचें ठिकाण दक्षिण काशी, या दोन कारणांमुळें श्रेष्ठ अशा कोल्हापुरांत भिक्षा-म्हणजे माधुकरी मागणें असतें. पांचालेश्वर क्षेत्रामध्यें

त्या माधुकरीचें भोजन होतें. कोल्हापुरांतून भिक्षा आणावयाची आणि पांचालेश्वरीं भोजन करावयाचें. भू-वैकुंठ श्रीपंढरीक्षेत्रांत या श्रीदत्तप्रभूचें चंद्रभागातीरावर तिलकधारण म्हणजे गंध लावणें होतें. प्रसिद्ध अशा श्रीगाणगापुरांत श्रीदत्तात्रेयांचें ध्यान होतें आणि कुरुक्षेत्रांत आचमन असतें. याप्रमाणें सर्वत्र संचार करणारा जरी हा प्रभू आहे, तरी भक्तांनीं स्मरण करतांच तो दूर राहात नाहीं, तर त्याच्या हृदयांत प्रकट होतो. ९

( १० )

**अन्वयः**—श्रुतिजातगीतं वदान्यवित्तं हि प्रथितं शरण्यं सह्याचले (वर्तमानं) अत्रिजातं तं दत्तं चन्द्रकुलोत्थः आयुः राजा (पुत्रकामः सन्) शरणं जगाम ।

**अर्थः**—वेदत्रयीनें वर्णन केलेला, दानशूरांमध्यें श्रेष्ठ म्हणून सर्वप्रसिद्ध, शरण आलेल्यांचें रक्षण करणारा, सह्यनामक पर्वतावर असणारा, असा जो अत्रिऋषि-कुमार त्या श्रीदत्तप्रभूला चंद्रकुलांत जन्मलेला आयु नांवाचा राजा पुत्राची इच्छा असणारा शरण गेला. ॥ १० ॥

( ११ )

**अन्वयः**—स्वच्छाम्बुपूर्णसरसीसरसीरुहान्तः कलहंसजातं अत्र केलिकलहं चक्रे । रुडाद्युपरमे तस्मिन् परमे (पर्वते) निविष्टं वरदण्डहस्तं वरदं देवं (श्रीदत्तं) ददर्श (आयुः)

**अर्थः**—निर्मळ पाण्यांनीं तुडुंब भरलेल्या सरोवरामध्यें हंस पक्षी ज्या पर्वतावर क्रीडा करतात, त्या राग, द्वेष व मत्सररहित, श्रेष्ठ सह्य पर्वतावर दण्ड धारण करणारे, वर देणारे, व तेजःपुंज असे जे श्रीदत्तगुरु त्यांना आयुराजानें पाहिलें. ॥ ११ ॥

( १२ )

**अन्वयः**—चिरोपोषिताक्षीष्टसत्पारणा इव (किं च) चिरभ्रान्तचित्तभ्रमावारणा इव तस्य अजस्य मूर्तिः कृपेक्षेच्छुना (नृपेण) मुदेव मूर्ता मुदा इव ईक्षिता ॥

**अर्थः**—दर्शनाच्या इच्छेनें पुष्कळ वेळ उपोषित असलेल्या नेत्रांना इच्छाभोजनच कीं काय, किंवा फार दिवसांचा मोहच निरास करणारी काय, अशी त्या जन्मादिविकाररहित श्रीदत्तप्रभूची मनोहर मूर्ति कृपाकटाक्षाची इच्छा करणाऱ्या त्या आयुराजानें आनंदानें मूर्तिमंत देहधारी आनंदच काय अशी पाहिली ! ॥ १२ ॥

( १३ )

**अन्वयः**—आत्मतुष्ट्ये धुतमानं आत्मदृष्ट्ये नतं आगतं (तं भूपं) सततं निजगौरवभृत् सुमर्षणः (ईदृगपि बहिः) मत्तः स्वमर्षण इव (श्री-दत्तात्रेयः) निजगौ।

**अर्थः**—पुत्रलाभरूप मिळणाऱ्या आपल्या आनंदासाठीं अभिमान टाकलेल्या आणि आपल्या दर्शनाकरितां नम्र होऊन आलेल्या त्या आयुराजाला नेहमीं स्वभक्ताचा अभिमान बाळगणारे म्हणूनच भक्त-वत्सल, भक्ताभिमानी, असें बिरुद धारणारे श्रीदत्तप्रभु आंत शांत जरी होते, तथापि बाहेरून उन्मत्त असून अतिशय राग आल्यासारखे बोलूं लागले. ॥ १३ ॥

( १४ )

**अन्वयः**—रे मूढ ! रे विरूढदर्प ! हे कुपथारूढ ! (अस्मिन्) अतिगूढाश्रमे कस्मात् त्वं भ्रमसि। इतः आशु यदा न यास्यसि (चेत्तर्हि) अश्रमं ते निःशेषभ्रममूलकृन्तनं इह द्राक् अरं कारयिष्ये। (यतः) अधुना स्त्रीवक्त्रात् गलता मधुना समेन सीधुना अहं अशुद्धः अस्मि।

**अर्थः**—अरे हे विवेकशून्या ! गर्विष्ठा ! कुमार्गगा ! या अगदीं एकांतांत असलेल्या आश्रमांत तूं कां फिरतो आहेस ! एथून आतांच्या आतां जर गेला नाहींस तर विना आयास तुझा माझ्याबद्दल असलेला सर्व भ्रम या क्षणींच समूळ नष्ट करून टाकीन. कारण या वेळीं मी या

स्त्रीच्या मुखांतील अतिमधुर व उच्छिष्ट मद्य प्राशन केल्यामुळें अशुद्ध आहें. १४ असा हा तात्काळ लक्षांत येणारा उत्तानार्थ झाला. पण भक्तवत्सल श्रीदत्तगुरु यांच्या बोलण्याचा गूढ अभिप्राय वेगळाच आहे. तो असाः—

**अन्वयः**—हे अमूढ ! विरूढदर्प कुपथारूढ ! (अस्मिन्) अतिगूढाश्रमे कस्मात् त्वं भ्रमसि । इतः आशु यदा न यास्यसि (चेत्तर्हि अश्रमं ते निःशेषभ्रममूलकृन्तनं द्राक् अरं कारयिष्ये । (यतः) अधुना स्त्रीवक्त्रात गलता मधुना समेन सीधुना अहं शुद्धः अस्मि !

**अर्थः**—हे विचारशीला ! गर्विष्ठ व दुराचारी लोकांपेक्षां विशेष म्हणजे सूज्ञपुरुषा राजा ! अत्यंत एकान्तांत असलेल्या या आश्रमांत येऊन येथें कां फिरूं लागला आहेस ? येथून तात्काळ जर गेला नाहींस तर योगाभ्यासादि श्रम पडूं न देतां तुझें सर्व अज्ञान नष्ट करतों. कारण मी या वेळीं सुषुम्ना या नांवाची अमृतस्रावी नाडी हीच कोणी स्त्री तिच्या मुखांतून येणारें मद्यासारखें गोड व उन्मत्त करणारें अमृत प्राशन करीत असल्यामुळें मी अत्यंत शुद्ध आहें. १४ श्रीदत्तात्रेयाचे षोडश अवतार आहेत. त्यांत "मायायुक्ताऽवधूत" या नांवाचा एक अवतार आहे. तो असा आहे.

( १५ )

**अन्वयः**—एवं भर्त्सितः ताडितः अपि अग्रे पतितः नीतिमान् भक्तिमान् सः (आयुः) दयाळो ! उपेक्षां मा कुरु मां पाहि इति आह ।

**अर्थः**—याप्रमाणें तिरस्कार केलेला व दगडादिकांनीं मार खाल्लेला असा जरी तो आयुराजा होता, तरीहि साष्टांग नमस्कार घालणारा, आचारसंपन्न व प्रेमळ असा तो राजा आयु, हे दयाळा ! माझा तिरस्कार करूं नका, माझें रक्षण करा असें म्हणाला. ॥ १५ ॥

( १६ )

**अन्वयः**—प्रणतं (राजानं) भगवान् प्राह। (राजन्) त्वं मयि भक्तिमान् असि (अतः मह्यम्) सास्रामिषं हृद्यं मद्यं देहि। हि अन्यथा (मम) तोषः न (स्यात्)।

**अर्थः**—नम्र अशा आयु राजाला श्रीदत्तात्रेय म्हणाले, राजा तूं माझ्यावर अत्यंत प्रेम करणारा आहेस, म्हणून मला रक्त व मांस यांसह गोड मद्य दे. कारण त्यावांचून मला आनंद होणार नाहीं. ॥ १६ ॥

( १७ )

**अन्वयः**—तथा इति (उक्त्वा सः) अण्डयोनये (च) शास्त्रयोनये (श्रीदत्तात्रेयाय) साक्षात् पशुसोमबुध्या यथेष्टं संस्कृतं रुच्यं मांसं च मद्यं अदात्।

**अर्थः**—बरें आहे, आपण म्हणतां त्याप्रमाणें देतों. असें म्हणून त्या आयुराजानें या ब्रह्मांडाला व वेदत्रयीला मूळ कारण अशा श्रीदत्तात्रेयांना प्रत्यक्ष मांसदानानें पशुयागसिद्धि व मद्यदानानें सोमसिद्धि होईल, अशा बुद्धीनें पुरे होईपर्यंत व मिष्ट जसें होईल तसें उत्तम रीतीनें तयार करून त्यांच्या इच्छेप्रमाणेंच मांस व मद्य दिलें. ॥ १७ ॥

( १८ )

**अन्वयः**—मतीश्वरः इति क्षितिपतिना (राज्ञा) प्रसादितः ईश्वरः (श्रीदत्तात्रेयः) प्रमोदतः रुचिरां गिरं जगौ। (हे राजन्) मदर्चकः इह पुनः इतरं वरं याचितुं क्षमः न (भवति)।

**अर्थः**—बुद्धिप्रेरक व निष्कपट सेवेनीं आयु राजानें प्रसन्न केलेले सर्व शक्तिमान् श्रीदत्तगुरु अति आनंदित होऊन मधुर वाणीनें म्हणाले, हे राजा! माझी सेवा करणारा भजक या लोकीं मी प्रसन्न जाहलों असतां दुसऱ्याजवळ कसलीहि याचना करीत नाहीं. कारण मीच सर्व इच्छा पूर्ण करण्यास समर्थ आहें, हें लक्षांत आणून जो वर मागावयाचा असेल तो माग. ॥ १८ ॥

( १९ )

**अन्वय:**—भूप: तं ईशं (श्रीदत्तात्रेयम्) नत्वा आह। हे सुरवर! असुरसुरनरजेतारं शूरं दातारं उत्तारं (ईदृशं) सुतं देहि। आयु: विधिहतमति: एव (अभूत् हि) जगति रंकाय एक: ऊर्णायु: (अपि) अलं भवति।

**अर्थ:**—राजा आयु त्या सर्वसमर्थ श्रीदत्तात्रेयांना वंदन करून बोलला, हे देवश्रेष्ठा! दत्तात्रेया! दैत्य, देव व मनुष्य यांना जिंकणारा, पराक्रमी, दाता, कुलाचा उद्धार करणारा असा सुपुत्र द्या. कोणी म्हणेल अहो मोक्ष न मागतां आयुराजानें श्रीदत्तमहाराजाजवळ नश्वर पुत्रच कां मागितला, तर दुर्दैवानें त्याच्या बुद्धीला मोह झाला. कारण एकाद्या श्रेष्ठ दात्यानें एकाद्या दरिद्र्याला हा भाताचा कोंडा न मागतां जन्मभर तुझा चरितार्थ चालण्यासारखें एकादें गांव माग म्हणून पुन: पुन: सांगितलें तरी तो कोंडाच मागून घेतो. तसें मोक्ष देणाऱ्या श्रीदत्तप्रभूजवळ राजाला पुत्रच मागण्याची बुद्धि झाली. लोकांमध्यें दुर्दैवानें पछाडलेल्या दरिद्र्याला श्रेष्ठ दात्यापासून एक बोकड जरी मिळाला तरी तो त्या एका बोकडानेंच संतुष्ट होतो. १९. येथें अर्थान्तरन्यासनामक अलंकार आहे.

( २० )

**अन्वय:**—प्रभु: स: अपि तथाविधात्मजलब्धये च स्वविभूतये इनपतये (तस्य) सकलं भावि शं हृदि निधाय फलं ददौ। हि नृप: (अपि) मृद्गिभै: बालिशं मृडयति।

**अर्थ:**—सर्वसमर्थ श्रीदत्तप्रभूनेंहि वर मागितल्याप्रमाणें पुत्रप्राप्तिस्तव च विभूतिभूत जो नराधिपति आयुराजा त्याला त्याचें पुढील कल्याण लक्षांत आणून एक फळ दिलें. कोणी म्हणेल हें अयोग्य केलें. तर तसें नाहीं. या लोकींहि प्रत्यक्ष हत्ती, घोडे इत्यादि वैभव असणारा राजा देखील मातीच्या हत्तींनेंच आपल्या अज्ञ बालकाची समजूत करितो. ॥२०॥

( २१ )

**अन्वयः**—सः निजपुरं अगात्। अथ इदं फलं स्त्रियै अदात्। इयं अपि प्रभुफलबलतः (च) निजपतिरतितः जलधिजं दिक् इव दिगधिपलवजं वरं गर्भं अधात्।

**अर्थः**—तो आयुराजा आपल्या नगराला आला; आणि त्यानें श्रीदत्तानें दिलेलें प्रसादरूप फळ राणी इंदुमतीला दिलें. तिनें श्रीदत्त-प्रसादभूतफलप्रभावानें व पतिसंभोगानें पूर्व दिशा जशी चंद्राला धारण करते त्याप्रमाणें इन्द्रादि लोकपालांचा अंशभूत असा गर्भ धारण केला. ॥ २१ ॥

( २२ )

**अर्थः**—नंतर सजळ मेघाप्रमाणें सुंदर व तेजस्वी अशा परमश्रेष्ठ पुरुषानें शंखोदकानें आपल्याला अभिषेक करून एक मुक्ताफल दिलें असें आपल्याला झालेलें अति उत्तम स्वप्न इन्दुमतीनें राजाला कळविलें. आयुराजानें प्रातःकाळीं शौनकांना तें स्वप्न सांगितलें. शौनकांनीं श्रीदत्त-प्रसादानें हुण्डासुराचा नाश करणारा व पराक्रमी असा सुपुत्र इन्दुमतीला होईल, याप्रमाणें त्या स्वप्नाचा अर्थ राजाला सांगितला. हुण्डासुरकन्या आपल्या सखीसह बागेंत क्रीडा करीत असतां तिनें आयुराजाचा पुत्र हुण्डासुराचा अंतक जन्माला येणार, असें चारणांच्या संवादामध्यें ऐकिलें व तें वर्तमान तिनें हुण्डासुराला कळविलें. ॥ २२ ॥

( २३ )

**अन्वयः**—यदि नृपः तपः तप्तुं इतः गतः। तर्हि जितसुरः शूरः हुण्डासुरः अत्र धरोपरि ईशः जातः। सः देवगदितं स्वमृतं सुतातः श्रुत्वा (विलीय राजगृहं) एत्य च तथा (तां) वीक्ष्य हि विमनाः जातः।

**अर्थः**—ज्या वेळीं तपश्चर्या करण्याकरतां आयुराजा आपल्या नगरांतून सह्यपर्वतावर गेला त्या वेळीं सर्व देवांना जिंकणारा म्हणूनच

पराक्रमी असा हुण्डासुर या पृथ्वीचा राजा झाला. त्याच्या कन्येनें चारण-देवांच्या बोलण्यांत ऐकलेला आपला मृत्यु, तिच्यापासून ऐकून त्या बातमीचा खरेपणा समजून घेण्याकरतां लपून तो हुंडासुर राजवाड्यांत गेला व गरोदर अशा इंदुमति राणीला पाहून अतिशय खिन्न झाला. ॥ २३ ॥

( २४ )

**अन्वयः**—राज्ञ्याः अन्योन्यगौरवस्पर्धिकुचाऽस्ये गर्भेण केवलं नीलता न अर्पिता। ( किन्तु) असुरास्ये अपि सा (नीलता) अर्पिता।

**अर्थः**—पोटांत असलेला सूक्ष्म गर्भ त्या हुण्डासुरानें कसा पाहिला तें अनुष्टुप् वृत्तानें सांगतात.

राणी इन्दुमतीचें आपल्या मोठेपणाबद्दल एकमेकांचा हेवा करणारे जे स्तन त्यांचें अग्र गरोदरपणामुळें काळे झाले एवढेंच नव्हे तर मृत्युभयानें हुण्डासुराचेंहि तोंड काळें ठिक्कर पडलें. गरोदर स्त्रियांच्या स्तनाचीं मुखें काळीं असतात असें गर्भलक्षण वाग्भट नांवाच्या वैद्यक ग्रंथांत दिलें आहे. ॥ २४ ॥

( २५ )

**अन्वयः**—तद्गर्भं हन्तुं आसुर्या मायया सः गुप्तः एत्य दष्टदशनः (सन्) तत्र ज्वलत् सुदर्शनं ददर्श।

**अर्थः**—राणी इन्दुमतीचा गर्भ नष्ट करण्याकरतां आसुरी मायेचा स्वीकार करून तो गुप्त म्ह. छपून त्या राजवाड्यांत आला व अतिशय रागानें त्यानें तेथें तेजस्वी असें गर्भरक्षक श्रीदत्तप्रभूचें सुदर्शनचक्र पाहिलें. ॥ २५ ॥

( २६ )

**अन्वयः**—दुष्प्रधर्षात् (सुदर्शनात्) भीतः सः अस्यै दुःस्वप्नानि व्यदर्शयत्। सा त्रयीतनुं (सूर्यम्) अनुष्ठाय तद्भयं अनाशयत्।

**अर्थः**—फार प्रयत्न करूनहि जवळ जावयास कठीण अशा त्या तेजस्वी सुदर्शनामुळें भ्यालेल्या हुण्डासुरानें इन्दुमतीला पुष्कळ वाईट स्वप्नें पाडलीं. तेव्हां इन्दुमतीनें सूर्यनारायणाची प्रार्थनारूप उपासना करून ती स्वप्नभयापासून मुक्त झाली. ॥ २६ ॥

(२७)

**अन्वयः**—ततः काले तुङ्गगषड्ग्रहे असौ सुतं असूत। (कथंभूतः) महेशः दैत्यनिग्रहे नृपगृहे अवतीर्णः किम्।

**अर्थः**—श्रीमद्दत्तात्रेयांनीं आपल्या सुदर्शन चक्रानें रक्षण केल्यानंतर दहाव्या महिन्यांत सूर्यादि सहा ग्रह उच्चीचे असतांना इन्दुमतीला पुत्र झाला. तेव्हां राजगृहांत जणूं काय दैत्य-नाशाकरतां श्रीशंकरच अवतीर्ण झाले कीं काय असें वाटलें. पांच ग्रह उच्चीचे असतां तो चक्रवर्ती होतो, व सहा ग्रह उचीचे असतील तर स्वर्गाचेंहि आधिपत्य त्याला मिळतें. हा नहुष दैवशाली असल्यानें, याच्या जन्मकालीं सहा ग्रह उच्चीचे होते म्हणून याला याच देहानें इन्द्रपदाचा उपभोग घ्यावयास मिळाला. ॥ २७ ॥

या श्लोकांत श्रीशंकरच अवतीर्ण झाले काय हा उत्प्रेक्षा अलंकार होतो.

(२८)

**अन्वयः**—पुत्रसद्रत्नवीक्षणात् आनंदः भूपतेः अंतः स्थातुं न समर्थः अभूत्। (कस्य इव) अब्जवीक्षणात् अब्धेः पुर इव।

**अर्थः**—ज्याप्रमाणें चंद्राला पाहून समुद्राचा आनंद पूररूपानें बाहेर पडतो तसा आपल्या सर्वोत्कृष्ट मुलाला पाहून झालेला आनंद आयु-राजाच्या अंतःकरणांत मावला नाहीं, तर तो बाहेर पडला. ॥ २८ ॥

(२९)

**अन्वयः**—मुदा प्लुतः महाधनः सः जातकृत्ये देवान् (च) पितॄन् अभ्यर्च्य मुक्तबंधनः (सन्) द्विजातिभ्यः धनादि अदात्॥

**अर्थः**—आनंदाश्रूंनीं स्नान झालेला, श्रीमान् असा जो आयुराजा त्यानें जातकर्म संस्कारांत करावयास लागणारे देवपितृगणार्चन व नांदीश्राद्ध पुण्याहवाचनपूर्वक करून व वृद्धिश्राद्ध करून पितृऋणांतून मुक्त झालेल्या त्यानें ब्राह्मणांना द्रव्य, भूमि, इत्यादि दानें दिलीं. ॥२९॥

( ३० )

**अन्वयः**—मायावी सः (तामसीम्) मायां आराध्य (दास्याः अंगं प्रविष्टः सन्) अरिष्टं गत्वा (तत्र प्रस्वापिन्याख्याम्) दानवीं मायां उद्भाव्य सुतेभ्यः (मात्रादिभ्यः सकाशात्) अद्भुतं तं पोतं अहरत्।

**अर्थः**—त्या मायावी हुण्डासुरानें तमोगुणात्मक मायेची उपासना करून तिच्या प्रभावामुळें व त्याच्या सुदैवानें, बाहेर आलेल्या एका दासीच्या अंगांत प्रवेश करून तो सूतिकागृहांत गेला; आणि तेथें सर्वांना निद्रा येणाऱ्या प्रस्वापिनी नांवाच्या दैत्यमायेचा मंत्रप्रयोग करून इन्दुमति वगैरे तेथील सर्व लोक झोंपले असतां तिथून त्या लोकविलक्षण मुलाला घेऊन घरीं गेला. ॥ ३० ॥

( ३१ )

**अन्वयः**—शक्तः अपि दत्तः मन्त्रशक्त्यै मानं अदात्। सः दानवः नवपाकं स्त्रियै दत्वा तत्पाकं कर्तुं आदिशत्॥

**अर्थः**—मग काय श्रीदत्तात्रेयांना सुद्धां दैत्यमायेची भीति वाटली? तेच अनुष्टुप् वृत्तानें पुढील श्लोकांत सांगतात. माया निवारण करण्यास समर्थ जरी दत्तमहाराज होते तरीहि त्यांनीं मंत्रशक्तीला मान दिला. त्या दानवानें नुकताच जन्मलेला तो कोमल बालक आपल्या स्त्रियेच्या स्वाधीन करून त्या मुलाचें मांस शिजवून दे असें तिला सांगितलें. ॥ ३१ ॥

( ३२ )

**अन्वयः**—सा सनालं (तं) बालं प्रेक्ष्य अपि सास्राक्षी प्राह। हे प्राज्ञ एषः (बालः) न वध्यः। (यतः सद्योजातः) अयं अमेध्यः (अस्ति)।

**अर्थः**—त्या मुलाला पाहून आश्चर्यचकित होऊन ती दैत्यस्त्री बोलली तें असें:—ती हुण्डासुरपत्नी नाळेसह असलेल्या त्या मुलाला पाहून दयेनें तिच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले व म्हणाली, हे सूज्ञ पतिदेवा! हा बालक मारणें योग्य नव्हे. कारण आपण विद्वान् आहां तरी नुकताच जन्मलेला बालक मनुष्यभक्षक अशा आम्हांलासुद्धां भक्षण करण्यास अपवित्र आहे. ।। ३२ ।।

( ३३ )

**अन्वयः**—सः अपि असुरः प्राह (हे मूढे !) अयं बालः मम कालः। (अस्ति मया) प्राप्तः (अतः) अद्य दुरात्मा भक्ष्यः। (यतः) इह (अयं देहरूपः) आत्मा रक्ष्यः।

तें आपल्या स्त्रियेचें भाषण ऐकून हुण्डासुर तिला म्हणाला,

**अर्थः**—तो हुण्डासुर बोलला. हे मूर्ख स्त्रिये! हा बालक देवांनीं योजलेला माझा मृत्यु आहे. याला मीं महत्प्रयासानें मिळविलें आहे. म्हणून आज दुष्ट मृत्युरूप अशा या बालकाला भक्षण करणेंच उचित आहे. कारण हा देहरूपी आत्मा वाटेल तें करून रक्षण करणेंच योग्य आहे. रोचन नामक आपल्या गुरूंच्या मतांत देह हाच आत्मा आहे म्हणून वाटेल तीं वाईट कृत्यें करूनहि देहाचें रक्षण केलें पाहिजे. शत्रु निर्बल आहे म्हणून त्याची उपेक्षा करणें बरें नव्हे. उपेक्षा केली तर सूक्ष्म रोग जसा उपेक्षा करणाऱ्याला बळवान् होऊन नष्ट करतो, तसाच शत्रूहि समूळ नाश करतो. द्रव्य, पुत्र, स्त्री इत्यादि पुनः पुनः मिळविणें शक्य आहे. पण देह मिळणें दुर्लभ आहे. म्हणून मृत्युरूप या मुलावर दया करणें म्हणजे आपणच आपला नाश करून घेतल्यासारखें होईल. तरी मी म्हणतों तेंच योग्य आहे. तरी सत्वर मांसपाक कर व मला दे. ।। ३३ ।।

( ३४ )

**अन्वयः**—दुष्टधीः सा (तं) तथा इति (उक्त्वा तस्मात् बालं) आदात्। (च) स्वयं तं (हन्तुं) सैरन्ध्र्यै अदात्। सा च (तं) बल्लवकरे (अदात्) सः हि (तं हन्तुं) करे अस्त्रं दधौ ॥

**अर्थः**—पतीच्या उपदेशानें निर्दय बनलेली ती हुण्डासुर स्त्री ' बरें आहे आपण म्हणतां तसें करितें ' असें बोलून तिनें त्याच्यापासून त्या मुलाला आपल्याजवळ घेतलें व मारण्याकरतां स्वतः एका दासीच्या स्वाधीन केलें. त्या दासीनें तो मुलगा स्वयंपाक्याजवळ दिला. त्यांनींहि मुलाला मारण्याकरितां हातांत शस्त्र घेतलें. ॥ ३४ ॥

( ३५ )

**अन्वयः**—सुगुप्तचक्रोपरि प्रहृतं तत् शितास्त्रं भग्नम्। तथा अन्यत् (प्रहृतं) शितास्त्रं अपि ग्राव्णि खड्गं इव तथा भग्नम्। परभक्तिसारविप्रे प्रयुक्तः अभिचारः यथा (निष्फलः) (तथा बाले प्रहृतं शिताऽस्त्रं निष्फलं बभूव इति अपरः दृष्टान्तः)।

**अर्थः**—श्रीदत्तसुदर्शनानें सुरक्षित त्या मुलावर मारलेलें तें तीक्ष्ण शस्त्र मोडून पडलें. नंतर बल्लवानें दुसरें तीक्ष्ण शस्त्र घेऊन पुनः प्रहार केला. पण तेंहि शस्त्र दगडावर मारलेल्या तरवारीप्रमाणें पूर्वीसारखेंच मोडून गेलें. याला दुसरा दृष्टान्तः—ज्ञानोत्तरकालीन परभक्ति हेंच बल असलेल्या ब्राह्मणावर योजलेला मारक प्रयोग जसा निष्फळ होतो, तसें तें शस्त्र निष्फळ झालें. रक्ताचा एकही थेंब तेथें दिसला नाहीं. परमात्म्यानें रक्षिलेल्या भक्तास कोणीहि कांहींसुद्धां करूं शकत नाहीं. यावरून श्रीदत्तमहाराजांचें भक्तवात्सल्य किती आहे हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. ॥ ३५ ॥

( ३६ )

**अन्वयः**—तदा क्रूरा अपि (सा) सैरन्ध्री द्रुतचित्ता (सती) बल्लवं आह। (हे बल्लव!) एतं (बालम्) न जहि। हि देवः अस्य शिरसि कर-पल्लवं अधात्।

**अर्थः**—त्या वेळीं निर्दय असूनहि ती दासी दयार्द्र होऊन त्या बल्लवाला म्हणाली, हे बल्लवा, आतां या मुलावर तूं शस्त्रप्रहार करूं नको. कारण देवांनीं याच्या मस्तकावर वरदहस्त ठेविला आहे. हा कोणाकडूनहि मारला जाणार नाहीं. ॥ ३६ ॥

( ३७ )

**अन्वयः**—तथा इति (उक्त्वा) सः धूर्तः (बल्लवः तं) पोतं वसिष्ट-द्वारे निधाय एकं कुरङ्गपोतं अचिराय हत्वा च (पक्त्वा) तत्पलं कुधिये असुराय ददौ।

**अर्थः**—त्या दासीचें भाषण ऐकून बरें आहे, याला मी मुळींच मारीत नाहीं असें सांगून लबाड बल्लवानें त्या बालकाला वसिष्ठ ऋषींच्या आश्रमद्वारांत नेऊन ठेविलें; आणि एका हरिणाच्या पाडसाला तात्काळ मारून व शिजवून तें मांस त्या दुष्ट हुण्डासुराला दिलें. हें काम त्या बल्लवानें इतक्या त्वरेनें केलें कीं त्याचें कपट त्या हुण्डासुराला समजलें तर नाहींच, उलट आपल्या मृत्युरूप शत्रूला आपण खाऊन टाकलें, म्हणून त्याला अतिशय आनंद झाला. ॥ ३७ ॥

( ३८ )

**अन्वयः**—ततः प्रभाते विदुषां वरिष्ठः वसिष्ठः (तं) सुतं (प्रथमं प्राकृतया) दृष्ट्या दृष्ट्वा च दिव्यदृशा दत्तप्रसादं आयुषः सुतं विज्ञाय (दयया कराभ्यां) तं आदाय पत्न्यं निनाय।

**अर्थः**—त्यानंतर इकडे प्रातःकाळीं ज्ञानी जनांत श्रेष्ठ अशा वसिष्ठांनीं त्या मुलाला प्रथम सामान्य दृष्टीनें पाहिलें. आणि नंतर ज्ञानदृष्टीनें श्रीदत्त-कृपेनें मिळालेला आयुराजाचा हा पुत्र आहे, असें जाणून दयाळू होऊन आपल्या हातांनीं त्याला उचलून आपल्या आश्रमांत नेलें. ॥ ३८ ॥

( ३९ )

**अन्वयः**—(हे पत्नि) अयं दत्तप्रसादः आयुषः अर्भः इह विधिना दत्तः प्रसादः इति सः पत्न्यै अदात् । सा अपि महापूरुषलक्षणं कमलेक्षणं तं प्रेम्णा अपात् ।

**अर्थः**—आणि वसिष्ठ बोलले, हे स्त्रिये ! हा बालक श्रीदत्तकृपेनें झालेला आयुराजाचा पुत्र आहे. येथें आपल्या सुदैवानें आणून दिलेला हा प्रसाद आहे. हें आपलें महद्भाग्य होय. असें बोलून वसिष्ठ मुनीनें त्या मुलाला सती अरुंधतीच्या स्वाधीन केलें. तिनेंही रेखांकित महापुरुष चिन्हांनीं युक्त अशा त्या मनोहर बालकाचें मोठ्या प्रेमानें पालन केलें.॥३९॥

( ४० )

**अन्वयः**—हि अत्यर्थं अरिबंधनं करिष्यति (अयं बालः) इति अर्थ-ज्ञर्षिमारिषः (वसिष्ठः तस्मै) डिम्भाय नहुष इति अभिधानं ददौ ।

**अर्थः**—निश्चयानें हा शत्रुबंधन-शत्रुपराजय करणार म्हणून शब्दार्थ जाणणारे जे वसिष्ठमुनि त्यांनीं त्या मुलाचें नांव नहुष असें ठेविलें. ॥ ४० ॥

( ४१ )

**अन्वयः**—शशिवंशजः सः (नहुषः) तपनर्षिकरस्पर्शात् (च) परेशाऽनुग्रहात् अपि दिने दिने शशिवत् ववृधे ।

**अर्थः**—चन्द्रवंशांत जन्मलेला तो नहुष तपस्वी वसिष्ठमुनीच्या लालनपालनानें व श्रीदत्तकृपेनेंच शुक्लपक्षांतील चन्द्राप्रमाणें वाढूं लागला.

शुक्लपक्षांतील चन्द्राप्रमाणें नहुष वाढूं लागला. याला श्रीमहाराजांनीं दोन हेतु दिले आहेत. एक तपनर्षिकरस्पर्श व दुसरा परेशानुग्रह; यांमध्यें दुसरा हेतु चन्द्र व नहुष या दोहोंमध्यें समान आहे. कारण चन्द्र सर्वांतर्यामी भगवत्कृपेनें कला संपादन करतो, व नहुषहि श्रीदत्तकृपेनेंच वाढत होता. पहिल्या हेतूंत तपस्वी जे वसिष्ट ऋषि नहुषाचें लालनपालन करीत असल्यामुळें कर म्हणजे हस्तस्पर्श असणें साहजिक आहे. करस्पर्शावांचून लालनपालन शक्य नाहीं हें नहुषपक्षीं योग्य झालें. चन्द्रपक्षीं तपनर्षि म्हणजे तापदायक व गति असणारा सूर्य त्याचे कर म्हणजे किरण त्यांचा स्पर्श म्ह. प्रवेश त्यामुळें चन्द्र वृद्धि पावतो असें आहे. जलमय चन्द्रामध्यें सूर्यकिरण संक्रामित होतात व त्यामुळेंच त्याला प्रकाश मिळतो असा वैदिक सिद्धान्त आहे. हा श्लोक द्व्यर्थी असून उपमा अलंकार इतका बरोबर साधला आहे कीं उपमान व उपमेय यांचीं अनुक्रमें लिंग व वचनेंहि बदललेलीं नाहींत. वसिष्टकरस्पर्श व सूर्यकरस्पर्श यांनीं नहुष वाढतो व चंद्रहि वाढतो. अशी अगदीं बरोबर उपमा क्वचितच सांपडते हें विशेष आहे. ॥ ४१ ॥

( ४२ )

**अन्वयः—**अमुना मुनिना (वसिष्टेन) उपनीतः च शिक्षितः विनीतः सः (नहुषः) विद्याकलासु निष्णातः। विशेषतः स्ववेदे (निष्णातः अभवत्)।

**अर्थः—**नंतर त्या मुनि वसिष्टानें त्याचें मौंजीबंधन केलें, व त्याला शिक्षण दिलें. त्यामुळें नम्र असा तो नहुष सर्व विद्येंत व कलेंत पारंगत झाला. विशेषतः धनुर्विद्येंत तरबेज झाला. ॥ ४२ ॥

( ४३ )

**अन्वयः—**अथ सुमतिः प्राज्ञी सती सा राज्ञी इन्दुमतिः बुद्ध्वा अरिष्टे अर्भं अपश्यन्ती (ततः) अधृतिः मूर्छिता (सती भुवि) पतिता ॥

**अर्थ:**—इकडे बुद्धिमति साध्वी ती राणी इन्दुमति जागी झाली व जवळ मूल नाहीं असें पाहून गतधैर्य होऊन भूमीवर मूर्च्छित पडली. ॥४३॥

( ४४ )

**अन्वय:**—सा (इन्दुमति:) बुद्ध्वा च उत्थाय निजबुद्ध्या बालं अन्वेष्य तनुमध्या आर्ता (सती) रुरोद ।

**अर्थ:**—ती इन्दुमति शुद्धीवर येऊन उठून बसली व तिनें आपल्या बुद्धीप्रमाणें इकडे तिकडे मुलाचा शोध केला, परंतु मूल न दिसल्यामुळें ती सौंदर्यवती दु:खानें व्याकुळ होऊन रडूं लागली. ॥ ४४ ॥

**अन्वय:**—(य:) इमां (वन्ध्याम्) अपि मां क्षणं कुमारललितां व्यधात् । स: सकलपाल: विधि: बाल: किं न खलु ।

**अर्थ:**—ज्यानें वंध्या अशासुद्धां मला फार थोडा वेळच पुत्रवती केलें तो सर्वपालक ब्रह्मदेव खरोखर अज्ञानी नव्हे काय ? तर हा त्याचा खेळ अज्ञानी मुलासारखाच आहे. ॥ ४५ ॥

( ४६ )

**अन्वय:**—माणवकाक्रीडितकप्रायविचेष्ट: स: क: (ब्रह्मा) हि । (अथवा) प्राक्तन्तुकर्मवशात् (इयम्) कुदशा प्रादुरभूत् किम् ॥

**अर्थ:**—तो ब्रह्मदेव अल्पबुद्धि मनुष्याप्रमाणें व्यवहार असलेला निश्चित आहे. कारण मी तसा अनुभव घेत आहें. किंवा त्याला तरी बोलून नांवें ठेवून काय उपयोग आहे ? माझ्याच पूर्व जन्मार्जित पापानें पुत्रविरहरूप ही दुर्दशा आली असेल काय ? तर त्यामुळेंच आली हें निःसंशय. ॥ ४६ ॥

( ४७ )

**अन्वय**—चित्रपदार्थसुचौर्यात् इह (इदम्) चित्रं अभूत् किम् ? हे आर्या एहि स्तनपानं कुरु (मह्यम्) सुदर्शनमानं देहि ।

**अर्थः**—किंवा धनरत्नादि चोरल्यामुळें अकस्मात् पुत्रनाशरूपी हें अद्भुत संकट आलें असेल काय? हे सत्कुलप्रसूता! बाळा ये, स्तन प्राशन कर, आणि तुझें सुंदर मुख दाखवून मला आनंदित कर, ज्यायोगें मी कृतार्थ होईन. ॥ ४७ ॥

( ४८ )

**अन्वयः**—यद्यपि स्वानां योगः विद्युन्मालातुल्यः (अस्ति तथापि) अयोगः सोढुं न शक्यः। (अत एव) हे देव अतीव कष्टं प्राप्तम्।

**अर्थः**—जरी हा स्वजनसमागम विद्युल्लतेप्रमाणें क्षणभंगुर आहे, तरी त्याचा विरह अज्ञानामुळें सहन करणें शक्य होत नाहीं म्हणूनच हे दत्तात्रेया! हें अत्यंत दुःख मला प्राप्त झालें आहे. ॥ ४८ ॥

( ४९ )

**अन्वयः**—भुजगशिशुभृताः रोषः कृतः। (अतः) प्रणतिमखत एव इह मयि तत्तोषः अस्तु। अथ सः प्रभुः मुदं यातु।

**अर्थः**—अलंकार म्हणून ज्यांनीं लहान लहान सर्प आपल्या अंगावर धारण केले आहेत ते शिवरूप दत्तात्रेय, ही संकटाचे वेळीं मात्र माझें स्मरण करते व सुखकाळीं मला विसरते, म्हणून माझ्यावर रागावले आहेत. त्यांना माझे नमस्कार असोत. ते अपराधी अशा माझ्या-वर या नमनरूपी यागानें कृपा करून संतुष्ट होवोत. ॥ ४९ ॥

( ५० )

**अन्वयः**—अत्यार्तः आकुलप्राणवायुः आयुः अपि (अरिष्टम्) एत्य मूर्च्छितां तां वनितां वीक्ष्य मूर्च्छितः (सन्) अचेष्टतां अगात्।

**अर्थः**—दुःखानें अतिशय व्याकूळ असा आयुराजाहि त्या सूतिका-गृहांत येऊन मूर्च्छित पडलेल्या त्या इन्दुमतीला पाहून स्वतः मूर्च्छित होऊन निश्चेष्ट झाला. ॥ ५० ॥

( ५१ )

**अन्वयः**—अथ दैव प्रलब्धः सः अवनिपः लब्धसंज्ञः तदा एव प्ररुदन् आह। इह ये रक्षार्थं सदा एव अर्चिताः (ते च) मुदा एव ते अपि अस्मिन् अपाये अप्रभवः (अभवन्)।

**अर्थः**—नंतर प्रारब्धानें फसविलेला तो आयुराजा शुद्धीवर येतांच शोक करूं लागला व म्हणाला, येथें मूल व बाळंतीण यांच्या संरक्षणाकरितां नेहमीं देव व ब्राह्मणादिकांचें अर्चन केलें व नोकरचाकरांचा धनवस्त्रादि देऊन सत्कार केला. हें सर्व आनंदानेंच केलें असतां या संकटकाळीं तें सर्व निरुपयोगी ठरलें. ॥ ५१ ॥

( ५२ )

**अन्वयः**—सपरिखान् प्राकारान् धिक्, च सारान् प्रासादान् धिक्। बलं धिक्, च मंत्रजालं धिक् (च) धर्मं धिक्, कः अपि प्रभुः न।

**अर्थः**—खंदकांनीं युक्त असलेल्या या तटबंदीला धिक्कार असो, व चांगले दरवाजे असलेल्या या राजवाड्यालाहि धिक्कार असो, आणि या चतुरंग सेनेला धिक्कार असो; मंत्रसमूहाला धिक्कार असो व या धर्मालाहि धिक्कार असो. कारण मला या संकटांतून वांचविण्यासाठीं यांपैकीं कोणीहि समर्थ झाला नाहीं. ॥ ५२ ॥

( ५३ )

**अन्वयः**—कृच्छ्रसाध्यं तपः अपि वन्ध्यं अभूत्। च सुयत्नसाध्यं जपाद्यं वन्ध्यं (अभूत्) यदि वामदैवं (तर्हि) एभिः किं साध्यम्। (नकिमपि) अत्र तु सदा एव आर्व्यंचितः अभवम्।

**अर्थः**—कष्टानें साध्य होणारें तपसुद्धां व्यर्थ गेलें, आणि मोठ्या प्रयत्नानें साध्य होणारे जपादिक फुकट गेले. प्रारब्ध प्रतिकूल असतां

काय साध्य होणार ? कांहींहि होणार नाहीं. या जन्मांत पुत्र होण्यापूर्वी पुत्राकरतां तपश्चर्या करून कष्ट भोगिले आणि आतां पुत्रवियोगानें दुःख भोगीत आहें. एकूण सर्व काळ मानासिक दुःखांनीं व्यापून गेलों आहें. ॥ ९३ ॥

( ९४ )

**अन्वयः**—दुर्दर्शः अपि अत्रिजातः ईशः दत्तः मया संपूजितः । येन वरः अपि दत्तः । दत्ताभये तत्पदि मे चित्तं अस्ति । तं दत्ताश्रये दत्तं प्रणमामि ।

**अर्थः**—दुर्दैवी लोकांना ज्याचें दर्शनसुद्धां होणें कठीण अशाहि अत्रिकुमार समर्थ श्रीदत्ताचें मीं चांगलें पूजन केलें, आणि त्यांचेकडून मीं वरहि मिळविला. स्वभक्तांना अभय देणाऱ्या श्रीदत्तचरणीं माझें चित्त स्थिर झालें आहे. त्या आपल्या भजकांना आधार देणाऱ्या श्रीदत्तात्रेयांना मी नमस्कार करतों. ॥ ९४ ॥

( ९५ )

**अन्वयः**—हे भगवन् ! मां (भक्तम्) उपेक्षसे किमु ? हे मघवन्मान्य ! सह (माम्) न ईक्षसे अपि ! (ईदृशम्) दुष्कृतं मया किमु आचरितम् । हे ईश ! वा उत ते आगः मया चरितं (तत्) वद ।

**अर्थः**—हे भगवन् दत्तात्रेया ! आपला भक्त अशा माझेकडे आपण दुर्लक्ष कां करतां ? दुर्लक्ष करणें योग्य नाहीं. हे देवेन्द्रमान्या ! दत्तगुरो ! एकदांसुद्धां माझ्याकडे पाहत नाहीं काय ? असें कोणतें पाप मीं केलें आहे, किंवा हे प्रभो ! असा अपराध तरी कोणता केला आहे तें सांगा, कीं ज्यामुळें आपल्याला माझ्याकडे पाहावेंसेंसुद्धां वाटत नाहीं ? ॥ ९५ ॥

( ९६ )

**अन्वयः**—हे विभो ! (त्वाम्) प्रणमामि । मे प्रसीद । हे ईश (त्वया) प्रगते अपि (मयि) महादमे धृते (सति) हे परेश ! (त्वत्तः) परं नः शरणं क्व (अतः प्रसीद) ।

**अर्थः**—हे सर्वव्यापी दत्तगुरो ! मी तुम्हांला नमस्कार करतों. माझ्यावर प्रसन्न व्हा. हे समर्था देवा ! आपण चरणीं नम्र असलेल्या मला अशी मोठी शिक्षा कराल तर हे सर्वश्रेष्ठा श्रीदत्ता ! आपल्याशिवाय दुसरा आम्हांला रक्षण करणारा कोण आहे ? कोणीहि नाहीं. म्हणून माझ्यावर प्रसन्न व्हा. कारण भयहारक आपले चरणकमल हे आम्हांला खरोखर अनन्यगति आहेत. ॥ ९६ ॥

( ५७ )

**अन्वयः**—हे परेश पुत्रार्थं त्वा आराध्य ते सत्प्रसादात् कान्तं पुत्रार्थं लब्ध्वा अपि अकान्तं न ईक्षे । हे सुरेश ! अद्य नष्टपुत्रः (अत एव) आर्तः (सन्) त्वत्तः अन्याश्रयं न वीक्षे ।

**अर्थः**—हे सर्वश्रेष्ठ श्रीदत्ता ! पुत्राकरितां आपली उपासना करून आपल्या कृपाप्रसादानें मनोहर असें पुत्ररूप फळ मिळूनहि माझ्या दुःखाचा नाश झाला नाहीं. हे प्रभो ! आतां नष्टपुत्र म्हणूनच अतिशय दुःखी अशा मला आपल्यावांचून दुसरा आधार दिसत नाहीं. आपणच आमचे सर्वाधार आहां. ॥ ९७ ॥

( ५८ )

**अन्वयः**—इति तत् विक्लवितं निशम्य मतिवित् क्लिन्नमनाः मनाक् अपि सदकासहनः मनोजवं मुनिं (नारदम्) ईरयितुं वाञ्छति स्म ।

**अर्थः**—याप्रमाणें तें आयुराजाचें दीन भाषण ऐकून आपण भक्ताचें अन्तःकरण जाणणारे व दयाशील, थोडेंहि भक्तदुःख सहन न करणारे जे श्रीदत्त प्रभु त्यांनीं मनाप्रमाणें वेग असलेल्या नारद ऋषींना पाठवावें असें मनांत आणलें. ॥ ९८ ॥

( ५९ )

**अन्वयः**—पूर्वं अर्थार्थी अपि भक्तः (अधुना) आर्तः (अयम्) मे अनुग्राह्यः एव । इति मतिदेवः आत्रेयः देवर्षिं (नारदम्) समीरयत् ।

**अर्थः**—प्रथम अर्थार्थी भक्त असून आतां पुत्र नष्ट झाल्यामुळें आर्त भक्त झाला आहे. म्हणून द्विगुण भक्ति असल्यानें हा राजा अनुग्रहाला पात्र झाला आहे. म्हणून बुद्धि-प्रकाशक अत्रिकुमार श्रीदत्त यांनीं राजाचें दुःख नष्ट करण्याकरितां देवर्षिनारदांना आयुराजाकडे जाण्याविषयीं प्रेरणा केली. ॥ ५९ ॥

( ६० )

**अन्वयः**—विष्वक् प्रसारिधामा अधः पतन् सूर्यः इव रणद्वीणः हरिं गायन् दिव्यदर्शनः नारदः आपतत्।

**अर्थः**—ज्याचें तेज सर्वत्र पसरणारें आहे असा पृथ्वीवर येणारा सूर्यच कीं काय असे, स्वतःच वाजणारी महती वीणा धारण करणारे, श्रीहरीचें गायन करीत, अलौकिक ज्ञानवान् नारदमुनि आकाशमार्गानें खालीं आले. ॥ ६० ॥

( ६१ )

**अन्वयः**—तदा मुदा उत्थितः सः (राजा) ऊर्ध्वं उत्क्रामतः आत्मनः असून् आशु अस्य (नारदस्य) अभिवादनेन भूयः यथावत् प्रतिपाद्य पाद्यपूर्वैः (उपचारैः) आद्यं सुरर्षिं (नारदम्) आनर्च।

**अर्थः**—नारदमुनि आले असतां आनंदानें उठणाऱ्या त्या आयुराजानें ऊर्ध्व गति होणाऱ्या आपल्या प्राणांना तात्काळ नारदमुनींना अभिवादन करून स्थिरता आणली आणि पाद्यादि उपचारांनीं श्रेष्ठ अशा देवर्षि नारदाचें पूजन केलें. ॥ ६१ ॥

( ६२ )

**अन्वयः**—भक्त्या प्रणतीः विधाय उदन्तं च दुःखं विज्ञाप्य पुरतः रुदन्तं तं (राजानम्) आश्वास्य अत्रिजं स्मरन् हसन् ऋषिः (नारदः) इति चारुवाचं उवाच।

**अर्थ:**—आाण भक्तीनें नमस्कार करून पुत्र नष्ट झालेलें वर्तमान च विरहामुळें झालेलें दुःख सांगून पुढें शोक करूं लागला. त्या आयु-राजाला शांत व्हावयास सांगून श्रीदत्ताचें स्मरण करून देवभक्त असूनहि दुःखित झालेल्या त्याला पाहून हंसणारे देवर्षि नारद पुढील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें मधुर बोलले. ॥ ६२ ॥

( ६३ )

**अन्वय:**—कथंचन अपि यस्य स्मरणेन सद्यः भवान्तः भवति। इह चिदानंदमयात्मलोकं पदं चिरात् भजन् अपि शोकं न जहासि (इति चित्रम्)

**अर्थ:**—पुत्रादि फलप्राप्तीच्या इच्छेनेंहि ज्याचें स्मरण केलें तरीसुद्धां भक्त संसारापासून मुक्त होतो. या लोकीं त्या सच्चिदानंदरूप पदाचें पुष्कळ काल सेवन करूनहि तूं दुःखाचा त्याग करीत नाहींस हें आश्चर्य आहे. ॥ ६३ ॥

( ६४ )

**अन्वय:**—विधूतरागपङ्कं श्रेयोयनं उपेयुषः तस्य असौ (श्रीदत्तात्रेयः) निरपायाश्रया अनन्ता प्राप्या मता वसुधा (अस्ति)।

**अर्थ:**—संपूर्ण विषयाभिलाषरूप दोषरहित जो मोक्षमार्ग त्याला प्राप्त झालेल्या मुक्त भगवद्भक्तांना श्रीभगवान् दत्तात्रेय हे सर्व दुःखरहित, विशाल व उपनिषदांना मान्य असें विश्रांतिस्थान आहे. ॥ ६४ ॥

( ६५ )

**अन्वय:**—महर्षिः (कपिलः) अध्यात्मदृष्ट्या उदासीनं (अतः) बहिर्विकारं प्रकृतेः परस्तात् (सन्तम्) अनाद्यनन्तं यं (पुरुषम्) शशंस। सः (पुरुषः) अस्मात् (श्रीदत्तात्) अपरः इह कः अपि न।

**अर्थ:—**प्रकृति व पुरुष यांच्या विवेकानें मोक्ष मिळतो अशी शंका घेऊन सांगतात.

महर्षि कपिल यांनीं अध्यात्मदृष्टीनें निर्लेप म्हणूनच षोडशविकार-रहित, त्रिगुणात्मक प्रकृतीच्या पलीकडे असलेला आदि व अंतरहित जो पुरुष वर्णन केला आहे, तो या श्रीदत्तात्रेयापेक्षां निराळा असा कोणीहि नाहीं. ॥ ६५ ॥

( ६६ )

**अन्वय:—**स एव अप्रमेयः (श्रीदत्तः) तपः तप्त्वा स्वाभिन्नशक्त्या अदः (विश्वम्) असृजत्। (पुनः) सद्धर्मगुप्त्यै अवतीर्णः मुनिजः (अभूत्) सद्गतिदान् तद्गुणान् कः वितीर्णः (न कः अपि)।

**अर्थ:—**पूर्वीं वर्णन केलेल्या त्याच इन्द्रियजन्य ज्ञानाला अविषय अशा श्रीदत्तात्रेयानें सृष्टि निर्माण करण्याचा विचार करून आत्म्याहून भिन्न नसलेलें विश्व निर्माण केलें, म्हणजे स्वतः जगद्रूप झाले. आणि पुनः साधूंच्या व धर्माच्या रक्षणाकरतां अत्रिमुनीच्या पोटीं अवतार धारण केला. त्या श्रीदत्त परमात्म्याच्या मोक्षदायक ज्या लीला त्यांचा पार कोण जाणूं शकेल ? तर कोणालाहि जाणतां येणार नाहीं. कारण त्यांच्या गुणांचा अंतच नाहीं. ॥ ६६ ॥

( ६७–६८ )

**अन्वय:—**प्रसन्नात् तस्मात् (श्रीदत्तात) सद्गतिदात् विमोहतः(त्वयां) प्राक् शुगास्पदः सुतः याचितः। यः पुरा चिरात् अजायमानः (अपि) पितरौ संक्लेशयेत्। च ततः परं प्रसवात्। जातः (अपि) ग्रहार्तैः परतः (बाल्य) मौर्ख्यात्। व्रती तु अविद्यः। अविबुधः अविवाहात् च युवा औपपत्यात् सुतवान् नैस्व्यात् (पितरौ संक्लेशयेत् एवम्) सदार्तिदेन पुत्रेण किं शर्म। (न किमपि)।

**अर्थः**—प्रसन्न व सद्गति देणाऱ्या त्या श्रीदत्तापासून मोहामुळें तूं दुःख देणारा पुत्र मागून घेतलास. जो जन्मापूर्वी पुष्कळ दिवस पुत्र न झाल्यामुळें आईबापांना कृच्छ्रादि तपश्चर्या करावी लागल्यानें कष्ट देणारा होतो, आणि नंतर प्रसूति-दुःखानें कष्ट होतात. ६७ जन्मल्यानंतरहि ग्रहादि पीडेनें, बालपणीं मूर्खपणामुळें, मौजीबंधनानंतर विद्या न आल्यामुळें, मूर्ख असा विवाह न झालेमुळें, तरुणपणीं जारकर्मामुळें आणि संततियुक्त असा दारिद्र्यामुळें दुःख देतो. याप्रमाणें सर्वदा दुःख देणाऱ्या पुत्रापासून सौख्य कोठून मिळणार? कोठूनहि मिळणार नाहीं. ॥ ६८ ॥

( ६९ )

**अन्वय**—नृहरिः इव पुत्रसंज्ञः गौणात्मा (अस्ति) च अत्र गात्रसंज्ञः घटः इव मिथ्यात्मा (जडत्वात्) च परतरचित् मुख्यात्मा सः एषः दत्तः (अबाधितत्वात्) तेन सख्या युक्तू खलु अप्रमत्तः भव।

**अर्थः**—पण "आत्मा वै पुत्रनाम" या श्रुतीवरून पुत्र आत्माच आहे, अनात्मा नव्हे अशी शंका घेऊन प्रहर्षिणीवृत्तानें सांगतातः—

सिंहासारखा पुरुष आहे असें म्हटलें असतां सिंहाचे संपूर्ण गुणधर्म पुरुषाचे ठिकाणीं येत नाहींत; परंतु क्रौर्य, शौर्य इत्यादि गुणांनीं युक्त आहे इतकाच त्यांतील आशय आहे. म्हणून या ठिकाणीं गौणीवृत्ति आहे. तसेंच पुत्र हा गौणात्मा आहे. मुख्यात्मा नव्हे. त्याप्रमाणें देहात्मा हाहि घटाप्रमाणें मिथ्यात्मा आहे. जसा घट जड असतो तसा हा सुद्धां जड आहे. तसेंच देहादि अहंकाराहून निराळा असलेला जो चैतन्यरूप आत्मा हाच मुख्यात्मा. तोच हा दत्तात्रेय होय. कारण तो त्रिकालाबाधित आहे. तोच नेहमीं उपकारक असल्यानें परमसखा आहे. त्याची प्राप्ति होण्याकरतां खरोखर सावधानचित्तानें त्याचें चिंतन कर. तरच त्याची प्राप्ति होईल. नाहींपेक्षां तो मिळणार नाहीं. ॥ ६९ ॥

( ७० )

**अन्वय:**—यतः यावत इष्टं तावत् ततः प्रेम (विद्यते) च सदा प्रेयसि आत्मनि तु शश्वत् प्रेम (एव) अतः अन्यतः (आत्मानम्) संविविच्य हे क्षत्रिय ! त्वं आशु दत्तात्मनि प्रियत्वं विधेहि ।

**अर्थ:**—पुत्र हा गौणात्मा असो, तथापि प्रेम करण्याचें तें स्थान आहे. म्हणून शोक कसा नाहींसा होणार ? अशी शंका घेऊन भुजंग-प्रयात वृत्तानें सांगतातः—

पुत्रदारादिक जोंपर्यन्त आपल्या मनाप्रमाणें वागतात तोंपर्यन्त त्यांच्या-वर प्रेम असतें. तेच प्रतिकूल झाले म्हणजे त्यांच्यापासून दुःख होऊं लागतें. म्हणून तें प्रेम व्यभिचारी आहे. परन्तु नेहमीं अतिशय प्रिय अशा आत्म्यावर मात्र निरंतर प्रेम असतें. कित्येक वेळां मला धिक्कार असो, असें मनुष्य म्हणतो तें त्याचें म्हणणें देहदुःख निमित्तानें असल्या-मुळें देहालाच उद्देशून असतें. कारण आपण नसावें, असें कोणांसहि कधींहि वाटत नाहीं. म्हणून पुत्रादिकांहून निराळा व देहादिकांहून निराळा असलेल्या आत्म्याचें सूक्ष्म बुद्धीनें विवेचन करून हे क्षत्रिय, म्हणजे दुःखापासून स्वतःचें रक्षण करण्याऱ्या राजा ! तूं देहपात होण्यापूर्वीं तात्काळ श्रीदत्तगुरुरूप आत्म्यावर प्रेम कर. म्हणजे त्याचें ज्ञान करून घे. त्याचें ज्ञान करून घेणें म्हणजेच त्याच्यावर प्रेम ठेवणें होय. ॥ ७० ॥

( ७१ )

**अन्वय:**—तत्र (श्रीदत्ताख्ये) आत्मनि इदं जगत् (अस्ति) च अत्र (साक्षिणि) (सः दत्तः) आत्मा (वर्तते) एवंविदः शोकमोहौ न एव हि । हे राजवर्य ! एवं विचार्य शोकं त्यज (च) स्वीयं अवश्यकार्यं कुरु ।

**अर्थ:**—आत्म्यावर प्रेम करणें हें बोधाचें लक्षण आहे. प्रियत्व म्ह. बोध व त्याचें फल हें इन्द्रवज्रा वृत्तानें सांगतातः—

त्या दत्तरूप आत्म्याचे ठिकाणीं हें प्रत्यक्षादि प्रमाणांनीं भासणारें भूतभौतिक विश्व आहे. आणि या स्वरूपभूत प्रत्यगात्म्याचे ठिकाणीं तो श्रीदत्तरूप आत्मा आहे. म्हणजे त्यांच्यामध्यें भेद नाहीं, असें जाणणाऱ्याला शोक व मोह होतच नाहींत, असा श्रुतिसिद्धान्त आहे. हे राजा ! असा विचार करून शोकाचा त्याग कर, आणि अवश्य असें स्वतःचें कर्तव्य भगवद्भजन कर, म्हणजे कृतार्थ होशील. ॥ ७१ ॥

( ७२ )

**अन्वयः**—हुण्डासुरेण नीतः अपि दत्तरक्षितः ते सुतः कस्यचित् ऋषेः गेहे अस्ति । सः तं दैत्यं हनिष्यति ।

**अर्थः**—श्रीदत्तात्रेयानें रक्षण केलेला तुझा पुत्र जरी हुण्डासुरानें नेला तरी कोणत्यातरी ऋषीच्या आश्रमांत कुशल आहे. तो त्या दैत्याचा नाश करील. ॥ ७२ ॥

( ७३ )

**अन्वयः**—तं अचिरेण एव (त्वम्) पश्यसि । इति निवेद्य मुनिपुंगवः (नारदः) तत्र पश्यतः नृपस्य (पुरतः) विद्युद्वत् तिरोदधे ।

**अर्थः**—व त्याला लवकरच तूं पाहशील, असें त्या आयुराजाला सांगून मुनिश्रेष्ठ नारद तेथें पाहणाऱ्या राजापुढें एकदम विजेप्रमाणें गुप्त झाले. ॥ ७३ ॥

( ७४ )

**अन्वयः**—शारदेन्दुवदनः सविवेकः (अत एव) गतशोकः सः (राजा) नारदेन गदितं (पुत्रवृत्तम्) पुनरुक्तं इव वल्लभां (इन्दुमतीम्) ऊचे । हापितशुच्हा आत्तमुत् सा (वक्ष्यमाणं उवाच) ।

**अर्थः**—नंतर शरत्कालीन स्वच्छ चन्द्राप्रमाणें प्रसन्नमुख व विवेकी म्हणूनच दुःख नष्ट झालेल्या त्या आयुराजानें नारदमुनीनें सांगितलेला पुत्रवृत्तान्त पुनः सांगितल्याप्रमाणेंच कीं काय इन्दुमतीला निवेदन केला. जिनें पुत्रविरहरूप दुःख सोडलें आहे, म्हणून आनंदित झालेली ती इन्दुमती पुढें श्लोकांत सांगितल्याप्रमाणें बोलली. ॥ ७४ ॥

( ७५ )

**अन्वयः**—हे समस्तेडित ! अकहन्त्रे समस्तेष्टदात्रे विहस्तेष्टकर्त्रे ते नमः । अत्रेः प्रियायाः (अनुसूयायाः) प्रभावात् इह तव उपलब्धिः (समजनि) हे क्रियाहीन ! अद्य ते (त्वया) मे (मह्याम्) उपलब्धिः (सद्बुधिः) अर्पिता (अस्ति) ।

**अर्थः**—हे सर्वदेवादिस्तुत श्रीदत्ता ! दुःख नष्ट करणाऱ्या, सर्वांच्या मनकामना पूर्ण करणाऱ्या, दुःखाकुलांना इच्छित देणाऱ्या अशा आपल्याला नमस्कार असो. अत्रिऋषिपत्नी अनुसूया तिच्या तपःसामर्थ्यानें आम्हांला आपली प्राप्ति झाली. हे चतुर्विध क्रियाफल-रहित अशा श्रीदत्ता ! आज आपण मला सद्बुद्धि दिली हें माझें मोठें सुदैव होय. ॥ ७५ ॥

( ७६ )

**अन्वयः**—हे ईड्य मे मानसहंसः मुदा एव अद्य ते अंघ्र्यम्बुज-पंजरे सदा एव अकम्पं अस्तु । इति अधिपं (श्रीदत्तात्रेयम्) ननाम । सकम्परोमाञ्चयुक् (इन्दुमती दत्तात्रेय दत्तात्रेय इति) नाम आह ।

**अर्थः**—हे स्तुत्य ! माझा मनरूपी राजहंस आनंदानेंच अद्य आपल्या चरणकमलरूपी पिंजऱ्यांत सर्वकाळ स्थिर होवो. असें श्रीदत्तगुरूंचें इन्दुमतीनें स्तवन करून त्यांना वंदन केलें. आणि कंप व रोमांचादि अष्ट सात्त्विक भावांनीं युक्त होऊन मोठमोठयानें दत्तात्रेय दत्तात्रेय असा नामघोष केला ॥ ७६ ॥

( ७७-७८ )

**अन्वयः**—(अथ) नृपालः (आयुः) जगौ। हे अखिलहेतुभूत! हे आद्य! हे विगौरव! हे अखिलसेतुभूत! (श्रीदत्त) इह ते लीलाः अनुवेलं अभूतपूर्वाः एव विभान्ति। (ताः) इह अलं आधिहराः (भवन्तु) ७७ हे देव! यत् सत् तव (धाम) योगवशीकृतेन चित्तेन योगी ईक्षते। तस्य धाम्नः जिज्ञासुः अस्मि। हे धीर! हे ईश्वर! (अहम्) मुमुक्षुः (सन्) तं त्वां शरणं प्रपद्ये ॥ ७८ ॥

**अर्थः**—नंतर आयुराजाहि इन्द्रवज्रावृत्तांनीं पुढील दोन श्लोकांनीं स्तवन करूं लागला:—

इन्दुमतीनें स्तुति केल्यानंतर आयुराजा स्तवन करूं लागला. हे सर्व स्थिर व चरादि विश्वाला आद्य कारणरूपा! हे सर्वांना कारण असून अभिमानरहिता! हे सर्वधर्मरूपा श्रीदत्ता! या लोकीं तुझ्या लीला प्रत्येक वेळीं नवीन नवीन असल्यासारख्याच वाटतात. त्या लीला आमच्या मानसिक व्यथा पूर्णपणें निवारण करोत! ॥ ७७ ॥ हे देवा! जें त्रिकालाबाधित तुझें स्वरूप वशीकारनामक वैराग्यपूर्वक अभ्यासानें स्वाधीन केलेल्या चित्तानें योगी लोक पाहतात, तें स्वरूप मी जाणण्याची इच्छा करितों. श्रीगुरूंना शरण जाऊन त्यांचेकडून समजून घ्यावें, असें म्हणाल तर हे बुद्धिप्रेरका दत्ता! आपण सर्व गुरूंचेहि गुरु आहां; म्हणून मुमुक्षु असा मी आपल्याला शरण आलों आहें. ॥ ७८ ॥

( ७९ )

**अन्वयः**—अतिसंतुष्टमानसः सः (आयुः) इति देवेशं सम्प्रार्थ्य सदा एव भगवत्कीर्तनप्रेमनिर्वृतः अभूत् ॥

**अर्थः**—ज्याचें मन अत्यंत सन्तुष्ट आहे असा तो आयुराजा याप्रमाणें श्रीदत्तगुरूंचें स्तवन करून सर्वकाल श्रीदत्तनामस्मरणानें लाभलेल्या निरतिशय प्रेमानें समाधान पावला. ॥ ७९ ॥

( ८० )

**अन्वयः**—एकदां अरण्ये मृगयां चरन् नहुषः आकाशवाण्या स्वोदन्तं शुश्राव। (च) सः तं गुरवे शशंस ॥

**अर्थः**—एकदां अरण्यांत शिकारीस गेलेल्या नहुषानें आकाशवाणीवरून आपलें वृत्त ऐकलें व तें त्यानें गुरुजींना सांगितलें. ॥ ८० ॥

( ८१ )

**अन्वयः**—वसिष्ठः अपि आदितः सर्वं (वृत्तम्) निवेद्य सुरदुर्हृदां वधाय तं आज्ञापयत्। सः (नहुषः) अपि गुरुं चिन्तयन् प्रतस्थे।

**अर्थः**—वसिष्ठमुनीनेंहि पूर्वींपासून घडलेली सर्व हकिकत त्याला सांगून देवशत्रु जे दैत्य त्यांच्या नाशाकरतां युद्धास आज्ञा दिली. तो नहुषहि गुरु वसिष्ठांचें चिंतन करून युद्धाकरतां निघाला. ॥ ८१ ॥

( ८२ )

**अन्वयः**—धीसारथिः देहरथः अर्थवाहः हृत्प्रग्रहः एक एव देवगुरूक्तिशक्तिः (सः नहुषः) महाबलानां सुरद्विषां हतये ज्ञानिवत् प्रतस्थे।

**अर्थः**—युद्धाकरितां केलेलें प्रस्थान-गमन उपजातिवृत्तानें सांगतात. दृढनिश्चयात्मक बुद्धि ज्याला सहाय्य करणारा सारथि आहे, आणि देह हाच ज्याचा रथ आहे, म्हणजे पायींच जाणारा, इंद्रियें ज्याचे घोडे आहेत, संकल्पात्मक मन ज्याचा लगाम आहे, असा एकटाच, देवस्वरूप जे गुरु त्यांची आज्ञा ही ज्याची शक्ति आहे, असा तो नहुष बलाढ्य, देवशत्रु दैत्यांना मारण्यासाठीं ज्ञानविवेकी मनुष्य सात्त्विक बुद्धि ही ज्याचा सारथि म्हणजे सहाय्यकर्ता आहे, कृच्छ्रादि तपांनीं कृश झालेला देह ज्याचा रथ आहे, इंद्रियनिग्रह हा ज्याचे घोडे आहेत, शांतहृदय ज्याचा लगाम आहे, असा एकटाच असणारा देवांहून भिन्न नसलेल्या सद्गुरूंचा उपदेश ही ज्याची शक्ति आहे, असा शम-दमादि हेच कोणी देव त्यांचा द्वेष करणारे रागद्वेषादि जे शत्रु त्यांच्या नाशाकरितां जसा प्रवृत्त होतो, त्याप्रमाणें निघाला. ॥ ८२ ॥

( ८३ )

**अन्वयः**—आजानुबाहुं शरचापहस्तं पद्भ्यां चरन्तं निजकार्यसक्तं रामं इव (वर्तमानं तम्) दृष्ट्वा ससूतं सास्त्रं रथं तस्मै (नहुषाय) आशु मघवा प्रेरयत्।

**अर्थः**—दीर्घबाहु हातांत धनुष्य व बाण घेणारा, रथाशिवाय पायांनींच जाणारा, देवकार्यामध्यें आसक्त अशा रावणवधाकरतां प्रवृत्त झालेल्या दाशरथि श्रीरामाप्रमाणें असलेल्या त्या नहुषाला पाहून सारथि व शस्त्रें यांनीं सज्ज असलेला रथ त्या नहुषाकरतां देवेन्द्रानें तत्काळ पाठविला. ॥ ८३ ॥

( ८४ )

**अन्वयः**—भूरथाय तस्मै (नहुषाय) उग्राय इव सः मातलिः सोपस्करं रथं प्रादात्। सः अपि सन्नद्धः (सन्) आरुरोह।

**अर्थः**—भूमि हाच ज्याचा रथ आहे असा पादचारी-पायींच जाणाऱ्या नहुषाला त्रिपुरवध करण्यासाठीं प्रवृत्त झालेल्या भूमि हाच रथ असलेल्या महेशाप्रमाणें त्या देवेन्द्रसारथ्यानें सर्व शस्त्रादि युद्धसाधनांनीं सज्ज असा रथ दिला. रथ मिळाल्यानंतर तो नहुषहि त्या त्या मंत्रांनीं कवचादि धारण करून तयार झालेला रथांत बसला. ॥ ८४ ॥

( ८५ )

**अन्वयः**—तत्सहायाय सन्नद्धाः देवाः स्वयं समागताः। तत्कोलाहलं आकर्ण्य महासुरः चकितः अभूत्।

**अर्थः**—त्या वेळीं त्या नहुषाला सहाय्य करण्याकरतां कवच शस्त्रादि धारण करून सर्व देव आपणहूनच तेथें आले. तेव्हां तो देवसेनेचा गलबला ऐकून एवढा मोठा कोण शत्रु आला आहे म्हणून हुण्डासुर आश्चर्यचकित झाला. ॥ ८५ ॥

( ८६ )

**अर्थः**—नंतर हुण्डासुरानें आपला दूत पाठवून कोण शत्रु आहे याची चौकशी केली. तो आयुराजाचा पुत्र नहुष युद्धासाठीं येत आहे असें ऐकून पूर्वी मारण्याकरितां दिलेला बालक मारला किंवा नाहीं, असें आपली स्त्री व दासी इत्यादिकांना पुनः पुनः विचारलें. तेव्हां त्यांनीं मरणाच्या भीतीनें आपण आणून दिला त्याच वेळीं त्याला मारून टाकलें असें खोटें त्या हुण्डासुराला सांगितलें. ॥ ८६ ॥

( ८७ )

**अर्थः**—मध्यंतरीं हुण्डासुराच्या बंदिशाळेंत ठेविलेली जी शुककन्या अशोकसुन्दरी तिनें मला येथून मुक्त करा असें नहुषाला सांगण्याकरितां रंभेला पाठविलें. तिनें नहुषाची भेट घेतली व अशोकसुंदरीची प्रार्थना त्याला कळविली. तेव्हां नहुषानें हुण्डासुराचा नाश केल्यानंतर तिची भेट होईल असें आश्वासन देऊन रंभेला परत पाठविलें. ॥ ८७ ॥

( ८८ )

**अन्वयः**—बली हुण्डासुरः अपि संशुष्यत्तुण्डः (सन्) चतुरं चतुरङ्गं असुरबलं राजपुत्राय (नहुषाय) अचोदयत्।

**अर्थः**—मोठा बलवान् असूनहि ज्याचें तोंड सुकून गेलें आहे, अशा त्या हुण्डासुरानें युद्धांत तरबेज असलेले हत्ती, घोडे, रथ व पदाति-पायदळ अशीं चार अंगें असलेलें दैत्यसैन्य युद्ध करण्यासाठीं नहुषावर पाठविलें. ॥ ८८ ॥

( ८९ )

**अन्वयः**—दैत्याः रणसीम्नि समेत्य (तत्र) अमृतान् अवेक्ष्य (च) मर्त्यं (नहुषम्) हि उपेक्ष्य सहसा अरिहृदः अभिलक्ष्य तुरां खरतरान् कृतान्तप्राणापहारकुशलान् बाणान् मुमुचुः । (च) नितान्तं युयुधुः ॥८९॥

